# नवभारत

मे-जून : २०१४

## पं. जवाहरलाल नेहरू



जन्म : १४/११/१८८९ मृत्यू : २७/५/१९६४







अनुक्रमणिका




नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका

प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ६७। अंक ८। मे-जून २०१४
वैशाख/ज्येष्ठ/आषाढ शके १९३६
वार्षिक वर्गणी ३००/- रुपये
या अंकाची किंमत रु.१००/-

या अंकातील लेखांत व्यक्त झालेल्या मतांशी संपादक व प्राज्ञपाठशाळा मंडळ सहमत असतीलच, असे नाही.

## नवभारतची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संगृहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक-मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोणानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा, या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील, अशी काळजी घेतली जाईल.

*नवभारत, ऑक्टोबर १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै. शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.



संपादकीय पत्रव्यवहार :
संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा).
फोन : (०२०) २५६७४०९३.

व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :
नीता गायकवाड
व्यवस्थापक, नवभारत मासिक
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५, गंगापुरी,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा)
फोन : (०२१६७) २२०००६.

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाने या नियतकालिकाला अनुदान दिले असले, तरी या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी मंडळ व राज्य-शासन सहमत असेलच, असे नाही.

अनुक्रमणिका








# नवभारत

## मे-जून २०१४

## अनुक्रमणिका

# संपादकीय

यंदाच्या मे महिन्याच्या २७ तारखेला जवाहरलाल नेहरू यांच्या निधनाला ५० वर्षे पुरी होत असून याच वर्षी नोव्हेंबरच्या १४ तारखेला नेहरूंची १२६ वी जयंती येत आहे. स्वातंत्र्य-लढ्यातील एक बिनीचे सरदार व स्वातंत्र्यानंतरचे पहिले पंतप्रधान या दोन्ही भूमिकांतून नेहरूंनी या देशाच्या इतिहासावर आपली अमिट मुद्रा उठवलेली आहे. त्यांच्या कार्याचे शक्य तितके यथार्थ मूल्यमापन करावे या उद्देशाने 'नवभारता'ने हा मे-जून २०१४ चा जोड अंक प्रसिद्ध केला आहे.

तथापि, नेहरूंच्या कारकिर्दीच्या अनेक भागांवर प्रकाश टाकणारे लेख या अंकात आलेले नाहीत. उदा., काश्मीरचा प्रश्न, गटनिरपेक्ष परराष्ट्र धोरण, नेहरूंच्या काळातील अन्नधान्य समस्या, त्यांच्या सरकारचे शिक्षणविषयक निर्णय अशा किती तरी बाबींना आम्ही न्याय देऊ शकलेलो नाही. त्या विषयी लेख लिहिण्याची विनंती आम्ही तज्ज्ञांना केली होती. पण ते लेख वेळेवर हाती आले नाहीत. या लेखांचा दुसरा विशेषांक आम्ही नोव्हेंबरात प्रसिद्ध करू.

सध्याचा अंक तयार करण्यात आम्हाला अनेकांचे सहाय्य झाले. कुसुमाग्रजांची 'पंतप्रधान' ही कविता प्रसिद्ध करण्यास कॉन्टिनेन्टल प्रकाशनचे श्री. ऋतुपर्ण कुलकर्णी व सौ. देवयानी अभ्यंकर यांनी तत्परतेने परवानगी दिली. आम्ही त्यांचे ऋणी आहोत. श्री. माधव गोडबोले यांचा लेख हा त्यांनी 'राजहंस प्रकाशन'साठी लिहिलेल्या 'जवाहरलाल नेहरूंचे नेतृत्व : एक सिंहावलोकन' या ग्रंथातील एक प्रकरण आहे. त्यावर काही संपादकीय संस्कार करून एक लेख म्हणून आम्ही छापत आहोत. ही अनुमती दिल्याबद्दल श्री. गोडबोले व राजहंस प्रकाशन यांचे मनापासून आभार. 'जवाहरलाल नेहरू व सुभाषचंद्र बोस' हा श्री आनंद हर्डीकर यांचा लेख देखील श्री. हर्डीकरांनी सुभाषचंद्र बोसांचे चरित्र लिहावयास घेतले आहे त्याचा एक भाग आहे. या सर्व मित्रांनी मन:पूर्वक सहाय्य केल्याने हा अंक सिद्धीस जाऊ शकला.

अंकातील इतर लेखांचे लेखक हे 'नवभारता'च्या परिवारापैकीच आहेत. त्यांचे स्नेहबंध इतके जवळचे आहेत की, त्यांचे आभार मानणे फारच औपचारिक होईल. त्या सर्वांनी मनापासून मदत केली व हा अंक तयार झाला.

अंकाची अक्षर-जुळणी करणाऱ्या सौ. गायकवाड व सौ. चंद्रचूड आणि छपाई करणारे 'सन प्रिन्टर्स' हे घरचेच आहेत. तथापि त्यांचा सदिच्छापूर्वक उल्लेख करणे उचित होईल.

## पंतप्रधान

- कुसुमाग्रज

इंद्राघरचे पिउनि रसायन प्रधान अमुचे आले
अलकेतिल चिरयौवन येथे रूप काश्मिरी ल्याले ।।१।।
चरण धरेवर शिर मेघावर कसरत कौतुकशाली
नक्षत्रांशी वरती चर्चा पद ठेचाळत खाली ।।२।।
मुलात काका, जगात स्नेही, गुरुजी भारत-देशी
छडी परजती कधी प्रजेवर मग्न कधी उपदेशी।।३।।
उड्या घालती सभा-सागरी पोलिस-खाते तंग
नाच जंगली जनात करती, मुक्त खेळती रंग।।४।।
गतीत रमती, देशोदेशी फिरते नित्य विमान,
निर्यातीच्या गटात यांचा केवळ पहिला मान.।।५।।
सूत कातती, पुकारती पण अणूयुगाची द्वाही
जनशाही स्थिर करण्यासाठी वरती नायक-शाही ।।६।।
थोडे पंडित, थोडे इंग्रज, थोडी मोगल शान
कवि, मीमांसक, समाजवादी, गांधींचा अभिमान।।७।।
दवा पहाडी, कस्तुरी, केशर, प्रवंग सोमल काही,
स्फटिकाचा घट, असे विलक्षण मिश्रण झाले नाही ।।८।।
ताइत कुठला गळ्यात आहे, कुणास ना हे कळले
मते घेउनि त्यांच्या मागे धावति पण मतवाले।।९।।
विशाल नयनी परंतु केव्हा पहा वेदना साचे,
शब्दावाचूनि त्यात उकलते मानस मानवतेचे।।१०।।
अतर्क्यतेतही एकच निश्चित-आज वादळी रात,
गहन तमी हा एकच जळतो नंदादीप जगात।।११।।

'हिमरेषा' या संग्रहातून, 'कॉन्टिनेंटल प्रकाशन, पुणे' यांच्या सौजन्याने.

## जवाहरलाल नेहरूंचा जीवनपट.

१८८९ : मोतीलाल व स्वरूपराणी नेहरू यांच्या पोटी १४ नोव्हेंबर रोजी अलाहाबाद येथे जन्म.

१९०५-०७ : 'हॅरो' या इंग्लंडमधील शाळेत शिक्षण

१९०७-१० : ट्रिनिटी कॉलेज, केंब्रिज येथे उच्च शिक्षण.

१९१०-१२ : 'इनर टेम्पल, लंडन' या संस्थेतून 'बार ॲट लॉ' ही उपाधी घेतली.

१९१२ : हिंदुस्थानात परत. अलाहाबाद उच्च न्यायालयात वकिली.

१९१३ : 'सेंट जॉन ॲम्ब्युलन्स ब्रिगेड' या संस्थेच्या अलाहाबाद शाखेचे सहसचिव.

१९१६ : ८ फेब्रुवारी कमला कौल यांच्याशी विवाह.

१९१७ : 'होमरूल लीग' या संघटनेचे सभासद. १९ नोव्हेंबरला इंदिरा या मुलीचा जन्म.

१९१८ : 'होमरूल लीग' या संघटनेचे सचिव.

१९१९ : मोतीलाल नेहरूंच्या सहकार्याने 'इन्डिपेन्डन्ट' हे वृत्तपत्र सुरू केले.

१९२० : अ-सहकार चळवळीत सामील झाले.

१९२१ : ६ डिसेंबर 'स्वयंसेवक चळवळीत' सामिल होऊन ब्रिटिश युवराजाच्या हिंदुस्थान भेटीवर बहिष्कार घालण्याचा प्रचार-करण्याबद्दल अटक करण्यात आली.

१९२२ : ३ मार्च कैदेतून सुटका. पण ११ मे ला परदेशी कपड्यांच्या दुकानांसमोर निदर्शने करण्याबद्दल अटक.

१९२३ : २६ जानेवारी रोजी सुटका. एप्रिलमध्ये अलाहाबाद नगरपालिकेचे अध्यक्ष म्हणून निवड. (जानेवारी १९२५ मध्ये पदाचा राजीनामा) नाभा संस्थानातील प्रवेश बंदी मोडली म्हणून १९ सप्टेंबरला अटक. (६ ऑक्टोबरला सुटका). संयुक्त प्रांताच्या बनारस येथील राजकीय परिषदेचे अध्यक्ष. डिसेंबरात 'हिंदुस्थानी सेवा दल' ही संस्था स्थापन केली. काँग्रेसचे सरचिटणीस म्हणून काम केले. १९२३-२५

१९२६-२७: युरोप व इंग्लंडला भेट. १० फेब्रुवारी १९२७ रोजी ब्रुसेल्स येथे अंकित राष्ट्रांची परिषद भरली होती. तीमध्ये सहभाग. नोव्हेंबर १९२७ मध्ये सोव्हिएट युनियनला भेट. डिसेंबर १९२७ मध्ये मद्रास येथे भरलेल्या काँग्रेसच्या अधिवेशनात 'संपूर्ण स्वातंत्र्या'चा ठराव मांडला. पण तो मंजूर होताना त्याची धार बोथट करण्यात आली. १९२७-२९ या काळात काँग्रेसचे प्रमुख सचिव.

१९२८ : एप्रिलमध्ये 'पंजाब प्रांतिक परिषदे'चे अध्यक्ष होते. ऑगस्टमध्ये 'इन्डिपेन्डन्स फॉर इंडिया लीग'ची स्थापना केली. सप्टेंबर मध्ये 'संपूर्ण बंगाल विद्यार्थी परिषदे'चे अध्यक्ष होते. सायमन-कमिशनच्या बहिष्कारात भाग घेतला. नोव्हेंबरमध्ये लखनौमध्ये झालेल्या 'सायमन चले जाव' या निदर्शनात लाठी हल्ला सोसला.

१९२९ : ३० नोव्हेंबरला नागपूर येथे भरलेल्या 'ऑल इंडिया ट्रेड युनियन काँग्रेस'च्या अधिवेशनाचे अध्यक्ष. २९ डिसेंबरपासून लाहोर येथे भरलेल्या काँग्रेस अधिवेशनाचे अध्यक्ष. 'संपूर्ण स्वातंत्र्या'चा उद्दिष्ट म्हणून स्वीकार करण्याचा ठराव मंजूर.

१९३० : मिठाच्या सत्याग्रहात भाग. १४ एप्रिलला अटक. (११ ऑक्टोबरला सुटका). पुनः १९ ऑक्टोबरला 'कर-नाकारणी'चा प्रचार करणारे भाषण केले, म्हणून अटक.

१९३१ : २६ जानेवारी रोजी सुटका. ६ फेब्रुवारीला मोतीलाल नेहरू यांचे निधन. अलाहाबाद शहराबाहेर जाण्याची बंदी करणारा हुकूम मोडला म्हणून २६ डिसेंबरला अटक. (३० ऑगस्ट १९३३ रोजी सुटका.)

अनुक्रमणिका

१९३३ : बिहारमधील भूकंपग्रस्तांच्या मदतीसाठी निधी व उपयोगी वस्तू जमा करण्याची मोहीम जानेवारीत हाती घेतली. कलकत्त्यात केलेल्या भाषणांसाठी १२ फेब्रुवारीला अटक (४ सप्टेंबर १९३५ रोजी सुटका.)

१९३६ : २८ फेब्रुवारीला कमला नेहरू यांचा मृत्यू स्वित्झर्लंडमध्ये झाला. नेहरू तिथे उपस्थित होते. २३ एप्रिलला लखनौला काँग्रेस अधिवेशन. त्याचे अध्यक्ष. १९३५ च्या कायद्यानुसार प्रांतिक कायदेमंडळांच्या निवडणुका होणार होत्या. एप्रिल ते डिसेंबर पर्यंत काँग्रेसच्या प्रचाराचे दौरे. २७ डिसेंबरला फैजपूर इथे काँग्रेसचे अधिवेशन भरले. त्याचे अध्यक्ष.

१९३७ : जुलै मुंबई, मद्रास, बंगाल, आसाम, बिहार, संयुक्त प्रांत, मध्य-भारत आणि वऱ्हाड व वायव्य सरहद्द प्रांत या आठ प्रांतात काँग्रेसची मंत्रिमंडळे स्थापन. एकाही प्रांतात मुस्लिम लीगचे मंत्रिमंडळ स्थापन होऊ शकले नाही.

१९३८ : जवाहरलाल यांची आई स्वरूपराणी यांचे निधन. स्पेन, फ्रान्स, इंग्लंड इत्यादी युरोपियन देशांना भेट. काँग्रेसचे अध्यक्ष सुभाषचंद्र बोस यांनी 'राष्ट्रीय नियोजन समिती' स्थापन केली होती. तिचे अध्यक्ष म्हणून नेमणूक.

१९३९ : सिलोन (आताची श्रीलंका) व चीन या देशांना भेट. ३ सप्टेंबर १९३९ ला दुसरे महायुद्ध सुरू. काँग्रेसने या विषयावर केलेल्या ठरावाचे निर्माते.

१९४० : वैयक्तिक सत्याग्रह चळवळीतील दुसरे सत्याग्रही. (पहिले सत्याग्रही विनोबा भावे.) गोरखपूर येथे केलेल्या युद्ध-विरोधी भाषणा-निमित्त ३१ ऑक्टोबरला अटक. (सुटका ४ डिसेंबर १९४१).

१९४२ : मार्च-एप्रिलमध्ये इंग्लंडचे इन सर स्टॅफर्ड क्रिप्स यांच्या बरोबर वाटाघाटी. अखिल भारतीय काँग्रेस समितीपुढे ७ ऑगस्ट रोजी 'भारत छोडो' हा ठराव मांडला. ८ ऑगस्टला ठराव मंजूर झाला. ९ ऑगस्टला पहाटे अटक. अहमदनगरच्या किल्ल्यात तयार केलेल्या तुरुंगात रवानगी.

१९४५ : १५ जूनला सुटका. २५ जून ते १४ जुलै सिमल्याला व्हॉइसरॉय वेव्हेल याने बोलावलेल्या परिषदेत सहभाग. १९४५ साली झालेल्या प्रांतिक कायदेमंडळांच्या निवडणुकीत काँग्रेसचा प्रचार. पुनः एकाही प्रांतात मुस्लिम-लीगला मंत्रिमंडळ स्थापता आले नाही.
नोव्हेंबर महिन्यात आझाद हिंद फौजेच्या तीन अधिकाऱ्यांवर खटला भरण्यात आला. त्यावेळी नेहरूंनी त्यांचे वकीलपत्र घेतले होते.

१९४६ : मार्चमध्ये अग्नेय आशियातील ब्रह्मदेश (म्यानमार), मलेशिया, इंडोनेशिया, सिलोन (श्रीलंका) या देशांना भेट. सिंगापूर इथे लॉर्ड व लेडी मौंटबॅटन यांच्याशी नेहरूंची ओळख झाली. एप्रिल ते जून ब्रिटिश मंत्रिमंडळाच्या समितीशी वाटाघाटी. मे महिन्यात काँग्रेसच्या अध्यक्षपदी निवड. (सप्टेंबरात राजीनामा दिला.) जूनमध्ये काश्मिरला गेले. तेथे अटक व लगेचच सुटका. दोन सप्टेंबरला मध्यावधी सरकारची स्थापना. व्हाइसरॉयच्या परिषदेत नेहरूंची उपाध्यक्ष आणि राष्ट्रकुल व परराष्ट्रमंत्री म्हणून नेमणूक. १३ डिसेंबरला नेहरूंनी घटनापरिषदेत 'ध्येय-धोरण विषयक' ठराव मांडला.

१९४७ : २३ मार्चला 'आशियाई संबंध परिषदे'चे दिल्लीत उद्‌घाटन केले. ३ जूनला देशाच्या फाळणीला मान्यता दिल्याचे आकाशवाणीवरून भाषण. १५ ऑगस्टला स्वातंत्र्य मिळाले व नेहरू पंतप्रधान झाले.

१९४८ : ३० जानेवारीला महात्मा गांधींचा खून. ऑक्टोबरात लंडन येथे भरलेल्या राष्ट्रकुल देशांच्या पंतप्रधानांच्या

बैठकीस हजर. ३ नोव्हेंबरला संयुक्त राष्ट्रांच्या पॅरिस येथे भरलेल्या सर्वसाधारण परिषदेसमोर भाषण.

१९४९ : इंडोनेशियावरील डच आक्रमणाच्या निषेधार्थ दिल्ली येथे १८ देशांची परिषद भरली. २० जानेवारीला नेहरूंनी परिषदेचे उद्घाटन केले. ऑक्टोबर-नोव्हेंबरमध्ये अमेरिका व कॅनडा या देशांना भेट.

१९५० : २६ जानेवारीला भारत हे प्रजासत्ताक राष्ट्र झाले. मार्चमध्ये 'योजना आयोगा'ची स्थापना. नेहरू या आयोगाचे अध्यक्ष झाले व शेवटपर्यंत अध्यक्ष राहिले.

१९५१ : काँग्रेसचे अध्यक्ष म्हणून निवडले गेले व १९५४ पर्यंत अध्यक्ष राहिले.

१९५२ : पहिल्या सार्वत्रिक निवडणुका पार पाडल्या. मे महिन्यात नव्याने सरकार स्थापन केले. दोन ऑक्टोबरला 'कम्युनिटी डेव्हलपमेंट प्रोग्रॅम'ची सुरुवात झाली.

१९५३ : नोव्हेंबर महिन्यात मुख्यमंत्र्यांची परिषद झाली. राज्य पुनर्रचना मंडळाची स्थापना केली. न्या. फाजलअली या मंडळाचे अध्यक्ष होते. कुंझरू व पाणिक्कर हे सभासद होते.

१९५४ : चीनचे पंतप्रधान चाऊ एन् लाय यांची जूनमध्ये भारताला भेट. भारत व चीन या देशांच्या पंतप्रधानांचे संयुक्त-पत्रक. या पत्रकात राष्ट्रा-राष्ट्रातील संबंधांना पायाभूत असणाऱ्या पाच तत्त्वांचा (पंचशील) समावेश.

१९५५ : जानेवारी. आवडी येथे काँग्रेसचे अधिवेशन. भारतात 'समाजवादी समाजरचना' करण्याचा ठराव. १५ ते २५ एप्रिल, बांडुंग (इंडोनेशिया) येथे आफ्रिका व आशियातील राष्ट्रांची परिषद.

१९५६ : १७-१८ जुलैला युगोस्लाव्हियातील ब्रियोनी येथे इजिप्तचे अध्यक्ष नासर व युगोस्लिव्हियाचे अध्यक्ष टिटो यांच्या समवेत बोलणी. नोव्हेंबर मध्ये दिल्लीत इंडोनेशिया, ब्रह्मदेश (आताचे म्यानमार), सिलोन (आताची श्रीलंका) व भारत या देशांच्या नेत्यांची परिषद.

१९५७ : दुसऱ्या सार्वत्रिक निवडणुका झाल्या. एप्रिलमध्ये नेहरूंनी नवे मंत्रिमंडळ स्थापन केले.

१९५९ : जानेवारीमध्ये नागपूरला काँग्रेसचे अधिवेशन. या अधिवेशनात सहकारी शेती व सरकारद्वारे अन्नधान्यांचा व्यापार या विषयीचे ठराव मंजूर.

१९६० : ३ ऑक्टोबरला न्यूयॉर्क येथे संयुक्त राष्ट्रांच्या सर्वसाधारण सभेपुढे भाषण.

१९६१ : सप्टेंबरमध्ये बेलग्रेड (युगोस्लाव्हिया) इथे गट-निरपेक्ष राष्ट्रांची परिषद.

१९६२ : तिसऱ्या सार्वत्रिक निवडणुका. एप्रिलमध्ये नेहरूंनी नवे सरकार स्थापन केले. जूनमध्ये राष्ट्रीय एकात्मता परिषदेची स्थापना झाली. नेहरू अध्यक्ष होते. ऑक्टोबरच्या २० तारखेला चीनचे आक्रमण. २६ ऑक्टोबरला राष्ट्रपती राधाकृष्णन यांनी आणीबाणी जाहीर केली.

१९६३ : 'कामराज योजने'ची घोषणा. काँग्रेस पक्षाची पुनर्रचना करून पक्षाला समर्थ करण्यासाठी अनेक मंत्र्यांनी राजीनामे दिले.

१९६४ : २७ मे रोजी मृत्यू.

## जवाहरलाल नेहरूंची ग्रंथसंपदा

१. ग्लिम्प्सेस ऑफ वर्ल्ड हिस्टरी. (१९२३)
२. लेटर्स फ्रॉम ए फादर टु हिज् डॉटर. (१९२९)
३. ॲन ऑटोबायोग्राफी विथ् म्युझिंग्ज ऑन रीसेंट ईव्हेन्ट्स् इन इंडिया (१९३६)
४. द डिस्कव्हरी ऑफ इंडिया. (१९४६)
५. ए बंच ऑफ ओल्ड लेटर्स. (१९५८)

या खेरीज जवाहरलाल नेहरूंची भाषणे, अधिकृत पत्रे इत्यादिकांचे अनेक खंड प्रसिद्ध आहेत.

# भारताचे पहिले पंतप्रधान-पंडित नेहरू

प. रा. दुभाषी

स्वतंत्र भारताचे पहिले पंतप्रधान पंडित जवाहरलाल नेहरू हे उत्तुंग, असामान्य, प्रभावी, लोकोत्तर व्यक्तिमत्त्व होते. भारताच्या स्वातंत्र्य लढ्याच्या अखेरच्या पर्वाचे नेतृत्व म. गांधींनी केले. स्वातंत्र्याची देशव्यापी चळवळ उभी करताना, त्यांनी राष्ट्रीय नेत्यांची मोठी फळी उभी केली. त्यात होते गुजरातचे सरदार वल्लभभाई पटेल, मद्रासचे सुभाष बोस व उत्तर प्रदेशचे पंडित मोतीलाल नेहरू व त्यांचे सुपुत्र पंडित जवाहरलाल नेहरू. जवाहरलाल नेहरूंना राष्ट्राच्या सर्व भागात विलक्षण लोकप्रियता लाभली. त्यांच्या सळसळत्या व्यक्तिमत्त्वाकडे तरुण आकर्षित झाले. त्यांनी दहा वर्षांपेक्षा अधिक काल ब्रिटिशांच्या कारागृहात शिक्षा भोगली. तुरुंगात शिक्षा भोगत असताना त्यांनी आपले मनोबल टिकवून ठेवले. इतकेच नव्हे तर 'ग्लिम्प्सेस् ऑफ वर्ल्ड हिस्टरी' व 'डिस्कवरी ऑफ इंडियां' या दोन मूल्यवान ग्रंथांची निर्मिती केली. या दोन ग्रंथांत व त्या आधी लिहिलेल्या ऑटोबायोग्राफी (आत्मचरित्र) या ग्रंथात नेहरूंचे अपार देशप्रेम व भारतीय संस्कृतीबद्दल आदर व अभिमान प्रकट होत होता. त्यांच्या वाचनाने साऱ्या भारतीयांनाच नव्हे तर स्वातंत्र्यासाठी झगडणाऱ्या सर्व देशांच्या लोकांना प्रेरणा मिळाली. माझ्या वडिलांकडे हे तीनही ग्रंथ होते. माझ्या विद्यार्थी दशेत ते मी वाचून काढले. त्याचा प्रभाव माझ्या मनावर पडला. पुण्यात नेहरूंच्या जाहीर सभा होत. काँग्रेस भवनच्या जवळच्या मोठ्या मैदानावर या सभा भरत. तो स्वातंत्र्यपूर्व काळ होता. सारे वातावरण 'इन्किलाब झिंदाबाद' या घोषणेने भरून जात होते. नेहरूंच्या जाहीर सभांना माझे वडील मला आवर्जून घेऊन जात. मला वाटते दोनदा मी त्यांच्याबरोबर या सभांना गेलो. उंच उभ्या केलेल्या व्यासपीठावर नेहरू झरझर, उड्या मारत पायऱ्या चढत. नेहरूंचे व्यासपीठावर आगमन होई, तेव्हा टाळ्यांच्या कडकडाटाने सारे वातावरण भरून जाई व चैतन्यमय होई. तो काळ वेगळाच होता.

स्वातंत्र्यप्राप्तीनंतर नेहरू देशाचे पंतप्रधान झाले. महात्मा गांधींना नेहरूंची विकासाविषयीची तळमळ व त्याबद्दलची चिंता यांची माहिती होती. शिवाय ते पटेल व अन्य नेत्यांपेक्षा तरुण होते म्हणूनच पंतप्रधानपदासाठी त्यांनी नेहरूंची निवड केली - त्यांचा दृष्टिकोण वेगळा असला तरी.

१९४६ साली मी बाँबे युनिव्हर्सिटीचा मॅट्रिक झालो. त्या परीक्षेत सर्व बाँबे प्रॉव्हिन्समध्ये मी पहिला आलो. माझ्या जीवनाच्या प्रारंभी मला मिळालेले ते असामान्य यश होते. मॅट्रिक परीक्षेनंतर मी फर्ग्युसन कॉलेजमध्ये प्रवेश मिळविला. आर्टस् शाखेसाठी. मला आर्टस् विषयांची आवड होती. विशेषतः इतिहासाची. त्या आवडीनुसार सायन्स ऐवजी आर्टस्‌ची निवड केली. वडिलांनी त्याला मान्यता दिली. कॉलेज सुरू झाले. पण थोड्याच वेळात वडिलांचे मित्र सांगू लागले की, सर्व प्रांतात पहिल्या आलेल्या तुमच्या मुलाला आर्टस् शाखेत घालून तुम्ही फार मोठी चूक केली. पुनः विचार करा. त्याला सायन्सला शिफ्ट करा. अजूनही वेळ गेली नाही. वडिलांना कळेना काय करावे. त्यांच्या मनात आले. भारत सरकारचे नेतृत्व करणाऱ्या पंतप्रधान नेहरूंचा सल्ला घ्यावा ! मीही लगेच त्यांना पत्र लिहिले. पण वाटले एवढ्या मोठ्या देशाच्या पंतप्रधानास माझे पत्र वाचण्यास कुठे वेळ मिळणार ? त्यातच त्यांनी युगोस्लाव्हियाला जाऊन मा. टिटो यांना भेटण्याचा कार्यक्रम आखला होता. पण काहीच दिवसांत नेहरूंचे पत्र आले. "Once you set your hand to the plough, do not look back" "एकदा नांगराला हात घातलास की मागे वळून पाहू नकोस. पुढेच जा." त्यांच्या या सल्ल्याने मला बळ मिळाले. त्यांचे हे शब्द तेव्हाच नव्हे तर पुढील जीवनातही मार्गदर्शक ठरले. माझ्या हेही लक्षात आले की, खरी मोठी माणसे छोट्या माणसाच्या पत्राचीही दखल घेतात व उत्तर पाठवतात. ते पत्र केराच्या टोपलीत टाकत नाहीत !

१९५२ साली मी पुणे विद्यापीठाच्या एम्ए. परीक्षेला फर्स्ट क्लास श्रेणी मिळवून उत्तीर्ण झालो. त्यानंतर मला








केंब्रिजला उच्च शिक्षणासाठी जावे असे वाटले, पण वडील म्हणाले, "आयएएस् परीक्षेला बस." मला त्यांचे म्हणणे पटले. दोन तीन महिन्यांच्या तयारीने परीक्षेला बसलो, उच्च क्रमांकाने उत्तीर्ण झालो व आय्एएस् ला निवडून आलो. १९५३ साली दिल्लीच्या मेटकाफ हाऊसस्थित आयएएस् स्कूलला प्रशिक्षणासाठी गेलो. या एक वर्षाच्या अखेरीस पंतप्रधानांच्या तीन मूर्ती मार्ग स्थित निवासस्थानी नेहरूंना भेटण्याचा कार्यक्रम ठरला. वेळ संध्याकाळी पाच वाजताची होती. नेहरू वेळेचे पक्के होते. पण आम्हाला पोचण्यास थोडा उशीर झाला. कारण या आधी म्हणजे त्या दिवशी सकाळी वायुसेनेच्या एकविसाव्या वाढदिवसानिमित्त दिल्ली बाहेरील तिलपत रेंजला लष्करी विमानांची प्रेक्षणीय प्रात्यक्षिके पाहेण्यासाठी ठरल्याप्रमाणे गेलो होतो. तेथून अतोनात गर्दीमुळे येण्यास विलंब झाला. वेळ झाला म्हणून घाबरत घाबरत आम्ही तीन मूर्ती भवनाच्या हॉलमध्ये प्रवेश केला. नेहरू शांतपणे सोफासेटवर बसून आमची वाट पाहत होते. त्यांना प्रिन्सिपल बापट यांनी उशीर होण्याचे कारण सांगितले होते. आम्ही सर्वजण खाली सतरंजीवर बसलो. सर्वजण आल्याची खात्री करून घेतल्यानंतर नेहरूंनी शांतपणे बोलण्यास सुरुवात केली. आम्ही २७ जण आयएएस्चे व पाचजण आय्एफएसचे असे एकूण ३२ जण होतो. पहिल्या प्रथम नेहरूंनी विचारले, 'के. एम्. पण्णीकर यांचे 'एशिया अँड वेस्टर्न डॉमिनेशन' हे पुस्तक वाचले आहे काय?' हे पुस्तक नुकतेच प्रसिद्ध झाले होते. आमच्यापैकी बहुतेकांनी ते वाचले नव्हते. त्या पुस्तकाचा धागा पकडून नेहरूंनी आजच्या बदलत्या जगात स्वतंत्र भारताचे अन्य देशांशी संबंध याविषयी विस्तृत विवेचन केले. हे आय्एफएस्साठी अधिक संबंधित होते. आय्एएस् साठी त्यांचे प्रशासनाविषयीचे विचार ऐकण्याची संधी मिळाली असती तर ते आवडले असते. पण ती पुढे मिळाली. दिल्लीच्या इंडियन इन्स्टिट्यूट ऑफ पब्लिक ॲडमिनिस्ट्रेशनच्या ॲन्युअल जनरल बोर्डाच्या सभेत नेहरूंच्या उत्स्फूर्त भाषणात त्यांचे प्रशासनाबाबतचे विचार ऐकावयास मिळाले.

१९६० व १९६१ या दोन वर्षांत इंडियन इन्स्टिट्यूट ऑफ पब्लिक ॲडमिनिस्ट्रेशनच्या वार्षिक निबंध स्पर्धेत मला पारितोषिक मिळाले. विषय होते अनुक्रमे 'स्कोप अँड इम्प्लिकेशन्स ऑफ डेमोक्रॅटिक डीसेंट्रलायझेशन' आणि 'ट्रेनिंग ऑफ ॲन्युअल जनरल मिटींगच्या वेळी पंडित नेहरूंच्या हस्ते पारितोषिक मिळाले. हे दोन्ही प्रसंग माझ्या जीवनातील आनंदाचे आणि अभिमानाचे होते. दुसऱ्या वेळी मला इन्स्टिट्यूटकडून पारितोषिक स्वीकारतानाचा फोटो मिळाला. तो मी नेहरूंच्या स्वाक्षरीसाठी पाठविला तोही मला नंतर वेडेपणा वाटला. पण पुन: एकदा नेहरूंच्या मोठेपणाचा अनुभव आला. त्यांनी लागलीच सही करून फोटो परत पाठवला!

**चिंतन, विकासाचे धोरण व कार्यक्रम**

स्वातंत्र्यपूर्व काळापासून नेहरूंनी स्वतंत्र भारताच्या विषयी खोल चिंतन केले होते. भारताच्या समस्या कोणत्या आहेत, त्या कशा सोडवाव्यात, सर्वसामान्यांचे जीवनमान सुधारण्यासाठी देशाची आर्थिक प्रगती साधण्यासाठी काय करावे, कोणते कार्यक्रम हाती घ्यावेत यासंबंधी त्यांचे निश्चित विचार होते. स्वातंत्र्यपूर्व काळात सुभाष बोस यांनी कॉंग्रेस अध्यक्ष या नात्याने नॅशनल प्लॅनिंग कमिटी नेमली, त्याचे ते अध्यक्ष होते. या सर्व सखोल चिंतनाच्या आधारावर ते काही निष्कर्षांपर्यंत पोचले होते. पहिले म्हणजे ब्रिटिश कालातील थिजलेल्या अर्थव्यवस्थेला चालना देण्यासाठी केवळ बाजारी अर्थव्यवस्थेवर अवलंबून राहाता येणार नाही. त्यासाठी सरकारने पुढाकार घेतला पाहिजे आणि योजनाबद्ध विकास साधला पाहिजे. त्यांनी १९२९ साली सोव्हिएट रशियाला भेट दिली होती आणि समाजवादाच्या रचनेतून या मागासलेल्या देशाने जी विस्मयजनक आर्थिक प्रगती साधली ते त्यांनी पाहिले होते. या देशाच्या पंचवार्षिक योजनेने ते प्रभावित झाले. परंतु जसेच्या तसे आंधळे अनुकरण केले नाही. कारण रशियातील कम्युनिस्ट पक्षाची हुकूमशाही नेहरूंना मान्य नव्हती. भारतात लोकशाही रुजवायची व वाढवावयाची होती. लोकशाहीच्या चौकटीतूनच विकास साधायचा होता. म्हणून त्यांनी डेमोक्रॅटिक प्लॅनिंगचा मार्ग चोखाळला, खाजगी क्षेत्राचे सरसकट राष्ट्रीयीकरण न करता मिश्र अर्थव्यवस्था आणली. यात सरकारी, खासगी व सहकारी या तीन सेक्टर्सना स्थान दिले. मूलभूत उद्योग सार्वजनिक क्षेत्रात स्थापन करण्याचे त्यांनी धोरण आरंभले. त्यातूनच

भिलाई, रूरकेला, दुर्गापूर हे पोलाद कारखाने त्यांनी उभे केले. पण ग्रामीण विकासासाठी त्यांनी सोव्हिएट रशियाप्रमाणे 'राष्ट्रीयीकरण न करता सहकार व सामूहिक विकास हे कार्यक्रम योजून ग्रामीण विकास कार्य अवलंबिले.' योजनाबद्ध विकासासाठी नेहरूंनी प्लॅनिंग कमिशनची स्थापना केली. त्याचबरोबर केंद्र व राज्य यांच्या सहकारातून विकासाचे नियोजन व कार्यक्रम पुढे यावेत यासाठी नॅशनल डेव्हलपमेंट काउन्सिलची स्थापना केली. या काउन्सिलमध्ये सर्व मुख्यमंत्री व केंद्रसरकारचे प्रमुख मंत्री यांचा समावेश होता. या काउन्सिलच्या मिटींगस् दिल्लीत होत. कर्नाटकचे तत्कालिन मुख्यमंत्री बी. डी. जत्ती यांनी त्यांच्याबरोबर अधिकारी म्हणून जाण्यासाठी माझी निवड केली. खरं तर मी डमी डेप्युटी डेव्हलपमेंट कमिशनर होतो. प्लॅनिंग सेक्रेटरियटला जायला हवे होते. परंतु माझी इन्फ्लेशन वरील नोट आवडल्यामुळे त्यांनी मला नेले. मिटिंग विज्ञान भवनमध्ये सकाळी दहा वाजता होती. मी मुख्यमंत्र्याबरोबर दहाच्या आधी पोचलो. बरोबर दहा वाजता नेहरूंचे आगमन झाले. नेहरू वेळेचे अगदी पक्के होते. वक्तशीरपणा हा त्यांचा गुण होता. त्यांचे उद्घाटनपर भाषण झाले. आजकाल लिहून दिलेली भाषणे वाचली जातात. नेहरू उत्स्फूर्तपणे बोलत. त्यामुळे त्यांच्या बोलण्यात नेहमी नावीन्य व ताजेपणा असे. नेहरू उपस्थित असलेल्या इतर अन्य मिटिंगला मग ती आय्आय्पीए जनरल बॉडीची असो किंवा कम्युनिटी डेव्हलपमेंट नॅशनल कॉन्फरन्स असो, तोच अनुभव आला.

**विज्ञान**

विकासाचा आधार विज्ञान आहे अशी नेहरूंची धारणा होती. त्यांनी थोर वैज्ञानिक डॉ. होमी भाभा यांच्या नेतृत्वाखाली ॲटोमिक एनर्जी रिसर्च सेंटर व ॲटोमिक एनर्जी डेव्हलपमेंट, डॉ. भटनागर यांच्या नेतृत्वाखाली देशभरच्या वेगवेगळ्या विज्ञानशाखेतील नॅशनल सायन्स लॅबोरेटरीज, आयआयटीज् इत्यादी संस्था स्थापन केल्या. त्या भारताच्या वैज्ञानिक विकासाला पायाभूत ठरल्या. नेहरूंना लोकांत 'वैज्ञानिक दृष्टिकोन - सायन्टिफिक टेंपरामेंट' पसरावा व लोकांनी अंध विश्वासातून बाहेर पडावे असे वाटे व त्यासाठी त्यांनी लोकशिक्षण केले.

**निधर्मी दृष्टिकोण**

त्यांनी मुस्लिमांसाठी हिंदुस्थानचा वेगळा भाग तोडून देण्यास विरोध केला. पण शेवटी जीनांच्या दुराग्रहामुळे (मुसलमान त्यांच्या मागे गेले. मौलाना आझादांच्या नव्हे.) त्यांना फाळणी मान्य करावी लागली. फाळणीवेळी मोठे दंगे झाले. रक्तपात झाला. लोकांची मोठ्या संख्येत अदलाबदली झाली. जेव्हा दिल्लीत मुसलमानांवर हल्ले झाले तेव्हा नेहरू स्वतः त्यांच्या मदतीला धावले. अल्पसंख्यांकांच्या जातीवादापेक्षा बहुसंख्यांचा जातीयवाद अधिक धोकादायक ठरू शकतो असे त्यांना वाटे. पुढील घटनांनी शिखांचे शिरकाण (१९८४), गुजरातचे दंगे (२००२), हे खरे ठरले. नेहरू धार्मिक नव्हते. देवालयांना जाऊन पूजा, अर्चना करत नसत. ते विवेकवादी होते. सोमनाथ मंदिराची पुर्नस्थापना झाल्यानंतर राष्ट्रपती डॉ. राजेंद्र प्रसाद यांनी त्याचे उद्घाटन करू नये असा त्यांचा सल्ला होता. भारतीय संविधानाने राज्यांची स्थापना केली होती. राज्याला धर्म नाही, लोक आपापल्या धर्माचे पालन करू शकतील. परंतु राष्ट्र सर्व धर्मियांना समान वागणूक देईल असे संविधानातच नमूद केले आहे. नेहरूंनी अल्पसंख्यांकांसाठी (विशेषतः मुसलमान) आजच्या सारखा कोणताही विशेष कार्यक्रम आखला नाही. सर्व धर्मियांनी मिळून मिसळून भारतीय नागरिक म्हणून एक भावनेने काम करावे असे त्यांना वाटे.

**चिंतनशील प्रशासक**

देशासमोर असलेल्या प्रश्नांचे विश्लेषण व ते सोडविण्यासाठीचे उपाय, धोरणे व कार्यक्रम हे सर्व राज्यांच्या मुख्यमंत्र्यांबरोबर आपल्या फोर्ट नाइटली लेटर्सच्या माध्यमातून ते शेअर करत. या पत्रांचे दोन खंड प्रसिद्ध झाले आहेत. ही पत्रे सर्वसामान्य नागरिकांसाठी सुद्धा अतिशय उद्बोधक आहेत. आपले प्रधानमंत्री देशापुढील समस्यांचा इतका सर्वंकष कथन यांचा अभिमान वाटावा अशी ही पत्रे आहेत. ते चिंतनशील प्रशासक होते. हे पत्रांच्या परिशीलनातून स्पष्ट होते. अनेक वेळा असे म्हटले जात असे की, पटेल खंदे व खंबीर प्रशासक होते. केवळ स्वप्न पाहणारे परंतु प्रश्नांचा सांगोपांग विचार करणे व त्याला अनुसरून धोरण ठरविणे हे उत्तम प्रशासकाचे निदर्शक असेल तर नेहरू पूर्णपणे या








कसोटीला उतरत होते, असे म्हटले पाहिजे. नेहरूंनंतर दुसऱ्या कोणत्याच प्रधानमंत्र्यांनी अशा तऱ्हेची पत्रे नियमितपणे मुख्यमंत्र्यांना पाठविण्याची तसदी घेतली नाही. इतकेच नव्हे तर कॅनडा, ऑस्ट्रेलिया इत्यादी संघराज्यांच्या पंतप्रधानांनीही तसे केल्याचे उदाहरण नाही. नेहरू त्यादृष्टीने एकमेवाद्वितीय नेते होते असे म्हटले पाहिजे.

**लोकशाही संस्थांचे संगोपन**

योजनाबद्ध विकास साधायचा, विकासाला सार्वजनिक क्षेत्राला 'कमांडिंग हाईटस्'चे स्थान द्यायचे असे नेहरूंचे धोरण असले तरी विकास लोकशाहीच्या चौकटीतूनच साधायचा यावर त्यांची अढळ श्रद्धा होती. इंडोनेशिया-सारख्या आशियाई देशात व अनेक आफ्रिकन देशात एकाधिकारशाही आली, नेहरूंना विलक्षण लोकप्रियता होती. हवे तर ते तो मार्ग अनुसरू शकले असते. परंतु त्यांनी जाणीवपूर्वक ते अव्हेरले व लोकशाहीची मुळे भारतात खोलवर रुजवावी म्हणून ते सतत प्रयत्नशील होते. भारताची राज्यघटना तयार झाली तेव्हा स्वातंत्र्य, समता व बंधुता यांचा उद्घोष करणारा प्रिअँबल असो किंवा मूलभूत अधिकारांबद्दलचा अध्याय असो किंवा देशाच्या धोरणाला दिशा देणाऱ्या मार्गदर्शक तत्त्वाचा अध्याय असो, नेहरूंनी त्यात महत्त्वाचा भाग घेतला. सर्व भारतीयांना पैसा, संपत्ती, शिक्षण इत्यादी कोणताही मतभेद न ठेवता, मतदानाचा हक्क हा भारतीय संविधानाचा पाया पाहिजे यावर ते ठाम होते. कारण भारतीयांवर त्यांचा विश्वास होता.

राज्य घटनेनुसार १९५२, १९५७ व १९६२ साली झालेल्या निवडणुकीत प्रचार करण्यासाठी त्यांनी देशव्यापी दौरे केले. पंतप्रधान झाल्यानंतर संसदेचा त्यांनी नेहमीच आदर केला. अधिकारी या नात्याने ऑफिसर्स गॅलरीमध्ये बसून पंतप्रधान नेहरू कसे वागतात, हे मी अनेक वेळा पाहिले होते. ते संसद गृहात प्रवेश करताना अध्यक्षांना लवून नमस्कार करत. त्यातून त्यांचा संसदेबद्दलचा आदर व्यक्त करत. त्यांच्या प्रश्नोत्तरांचा तास असताना ते स्वतः उपस्थित असत व उत्तरे देत. तसेच प्रतिपक्षाच्या नेत्यांनी घणाघाती टीका केली तरी त्यास शांतपणे उत्तरे देत. त्यांच्या काळात संसद वर्षातून जवळपास दोनशे दिवस काम करी. नंतरच्या काळात असे कधीच घडले नाही. आज तर संसदेचा गोंधळ व रुकावटीमुळे पुरता बोजवारा उडाला आहे. अशावेळी नेहरूंच्या काळातील संसदेची आठवण होते व आजच्या अधःपाताचे अतीव दुःख होते.

नेहरू संसदेत बोलतच परंतु वेळ काढून देशभर दौरे करीत व आपल्या भाषणांतून लोकांशी संवाद करीत. सरकारी धोरण व कार्यक्रम समजावून सांगत. त्यावेळी टीव्ही नव्हता. पण रेडिओवर त्यांची भाषणे ऐकली. घटना परिषदेतील त्यांचे 'Tryst with destiny' 'ट्रिस्ट विथ डेस्टिनी' हे भाषण किंवा महात्मा गांधींच्या हत्येनंतर 'The light has gone out of life,' 'आयुष्यातून प्रकाश हरपला आहे.' हा शोकसंदेश संस्मरणीय होते.

**परराष्ट्र धोरण**

स्वतंत्र भारताचे परराष्ट्रधोरण आखण्यात नेहरूंनी पुढाकार घेतला. प्रधान मंत्र्यांच्या जबाबदारीबरोबर त्यांनी परराष्ट्र मंत्रालयाचा कारभारही सांभाळला. नेहरूंनी अलिप्ततावादी परराष्ट्रधोरणाचा पुरस्कार केला. दुसऱ्या महायुद्धानंतर अमेरिकेच्या नेतृत्वाखालील भांडवलशाही पश्चिम युरोपियन देश व सोव्हिएट युनियनच्या नेतृत्वाखाली साम्यवादी पूर्व युरोपियन देश असे दोन परस्परविरोधी गट तयार झाले. त्यांच्यात शीतयुद्ध चालू राहिले. भारतासारख्या नवीनच स्वतंत्र झालेल्या देशाला जर शांतताप्रिय मार्गाने विकासाचा मार्ग चोखाळावयाचा असेल तर या दोन गटांचे शीतयुद्ध भारताला परवडण्यासारखे नाही म्हणूनच नेहरूंनी अलिप्ततावादाचे धोरण आखले. नव्याने स्वतंत्र झालेले किंवा होण्याच्या मार्गावर असलेल्या आफ्रिका व आशिया खंडातील देशांना नेहरूंनी अलिप्ततावादी संघटनेत आणले. या संघटनेच्या दरवर्षी सभा भरत. शांततावादी संघटना अशी ओळख निर्माण करण्याचा त्यांचा प्रयत्न होता. परंतु अमेरिकेला ते रुचले नाही. नेहरू सोव्हिएट युनियनच्या कह्यात गेले असा त्यांचा आरोप होता.

दुर्दैवाने नेहरूंच्या शांतताप्रिय परराष्ट्रधोरणाला शेजारच्या देशांनीच धक्का दिला. महंमद अली जीनांना वाटत होते की, काश्मीरने पाकिस्तानात विलीन व्हावे. काश्मीर महाराजा तसे करेनात. म्हणून त्यांनी पाकिस्तानातून टोळीवाल्यांना घुसवले. ते जेव्हा जाळपोळ,

अनुक्रमणिका

लुटालूट करत श्रीनगरच्या वेशीवर आले तेव्हा घाबरलेल्या काश्मीरच्या महाराजाने भारतात सामील होण्याचा निर्णय घेतला. लागलीच पाकिस्तानी आक्रमण हटवण्यासाठी भारतीय विमान श्रीनगर विमानतळावर उतरले. त्यांनी काश्मीर खोऱ्यातून पाकिस्तानी टोळ्यांना व सैनिकांना पिटाळून लावले. परंतु सर्व काश्मीर विमुक्त करण्याआधीच नेहरूंनी गव्हर्नर जनरल माउंटबॅटन यांच्या आग्रहाखातर संयुक्त राष्ट्राकडे तक्रार केली. परंतु पाकिस्तानला सैन्य मागे घेण्यास सांगण्याऐवजी ब्रिटन व अमेरिका यांनी काश्मीर हा भारत व पाकिस्तान यांनी दावा केलेला वादग्रस्त भाग आहे असे वळण दिले. त्या काळी वादग्रस्त ठरलेला काश्मीर आजही वादग्रस्तच राहिलेला आहे. सरदार पटेलांनी ज्या खंबीरपणे हैदराबाद व अन्य संस्थानांचे प्रश्न हाताळले त्या खंबीरपणे नेहरूंनी काश्मीर प्रश्न हाताळला नाही. काश्मीर पटेलांनी हाताळले असते तर काश्मीरचे घोंगडे आजतागायत भिजत राहिले नसते, अशी नेहरूंवर टीका झाली. काश्मीर प्रश्नामुळे पाकिस्तानशी भारताचे संबंध कधीच मित्रत्वाचे राहिले नाहीत.

चीन जेव्हा साम्यवादी पक्षाच्या आहारी गेला तेव्हा, भांडवलशाही अमेरिकेने चीनवर बहिष्कार घातला. नेहरूंच्या मध्यस्थीने चीनला युनो संघटनेत प्रवेश मिळाला. नेहरूंनी चीनचे पंतप्रधान चौ एन् लाय यांच्याशी बोलणी करून चीनबरोबर मित्रत्वाचे संबंध प्रस्थापित केले. 'पंचशील करार' झाला. परंतु ही मैत्री फार काळ टिकली नाही. चीनने उत्तर सीमेवर आक्रमण करण्यास सुरुवात केली. नेहरूंनी चिनी चौक्या हटवण्याचे सैन्याला आदेश दिले. त्या नुसार भारताने कारवाई सुरू केल्यानंतर उत्तरादाखल चीनने भारतीय हद्दीत आपले सैन्य घुसविले. आसामपर्यंत पोचलेल्या चीनचे आक्रमण भारतीय सैन्य रोखू शकले नाही. सैन्याची पुरेशी तयारी नव्हती. त्याला तत्कालीन संरक्षण मंत्री वी. के. कृष्णमेनन जबाबदार होते. त्यांना तत्काळ हटवा अशी मागणी काँग्रेस खासदारांनीच केली. ते नेहरूंच्या मर्जीतले असल्याने त्यांनी टाळाटाळ केली. परंतु शेवटी दबावाखाली मेनन यांना हटविण्यास नेहरूंना भाग पडले.

चीनने भारतावर हल्ला केला तेव्हा, मी लंडन स्कूल ऑफ इकॉनॉमिक्समध्ये पोस्ट ग्रॅज्युएट डिप्लोमा कोर्स करत होतो. बीबीसी टेलिव्हिजनवर ही बातमी दाखविली. "I was out of touch with reality" "वास्तिविकतेशी माझा संबंध तुटला होता", असे खाली मान घातलेले नेहरू म्लान वदनाने म्हणताना ऐकून मला फार दु:ख झाले. मी मुंबईत राहणाऱ्या माझ्या वडिलांना त्याबद्दल लिहिले. वडिलांनी लिहिले, "काळजी करू नकोस. सारा भारत नेहरूंच्या मागे उभा आहे." त्यांच्या या लिहिण्याने मला दिलासा मिळाला.

या कठीण परिस्थितीत नेहरूंनी सोव्हिएट युनियनची मदत मागितली. परंतु चीन आपला मित्र देश आहे असे सांगून सोव्हिएट युनियनने अंग काढून घेतले. शेवटी नेहरूंना अमेरिकेचे अध्यक्ष जॉन एफ् केनेडी यांच्याकडे मदतीची याचना करावी लागली.

बाहेर कितीही धैर्य दाखविले तरीही या सर्व घटनांमुळे नेहरू आतल्या आत खचून गेले असे वाटते. १९६३ साली साउथ ब्लॉकमध्ये आफ्रिकन देशातील राजदूतांची मिटिंग होती. त्या मिटिंगला माझ्या मिनिस्ट्रीच्या वतीने मला जावे लागले. नेहरू त्या मिटिंगपुढे बोलणार होते. ते जेव्हा आले तेव्हा त्यांना पाहून मला धक्काच बसला. शारिरीक व मानसिकदृष्ट्या ते खंगलेले दिसले. चैतन्याने सळसळणारे त्यांचे व्यक्तिमत्त्व दीनदुबळे झाल्यासारखे दिसले. मला वाईट वाटले. लवकरच २७ मे १९६४ रोजी ते देशाला सोडून गेले. ते गेले तेव्हा मी दिल्लीतच होतो. तीन मूर्ती मार्गावरील त्यांच्या निवासस्थानी अंत्यदर्शनासाठी गेलो आणि त्यांना श्रद्धांजली वाहिली.

संयुक्त महाराष्ट्र चळवळीच्या वेळी नेहरूंवर घणाघाती टीका करणाऱ्या प्र. के. अत्र्यांनी 'सूर्यास्त' या मथळ्याखाली अग्रलेख लिहून शेवटची मानवंदना दिली. नेहरू गेले परंतु त्यांचा वारसा कायम आहे. अजूनही लोकशाहीच्या मार्गाने विकासाची वाट धरणारा देश अशी भारताची ओळख आहे. नेहरू १७ वर्षे पंतप्रधान होते. ते संसदेचे नेते होते, काँग्रेस पक्षाचे नेते होते व लोकनेतेही होते. त्या वेळच्या व आजच्या परिस्थितीत जमीन-अस्मानाचा फरक आहे.



# जवाहरलाल नेहरू आणि सुभाषचंद्र बोस

आनंद हर्डीकर

**एक :**

पंडित जवाहरलाल नेहरू यांच्या पन्नासाव्या स्मृतिदिनाच्यानिमित्ताने त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचे, त्यांच्या नेतृत्वाचे विविध पैलू पुन्हा एकदा कमी -अधिक प्रकाशात येणे अगदी स्वाभाविक आहे. काही नवे मुद्दे आजवर दुर्लक्षित राहिलेल्या पुराव्यांसह मांडले जाणेही अपरिहार्य आहे. ते हयात असतानाचे तेजोवलय काळाच्या ओघात विरून गेल्यावर त्यांच्या व्यक्तिमत्त्वाची, त्यांच्या नेतृत्वशैलीची परखड चिकित्सा होऊ लागली. तर तिचेसुद्धा स्वागतच करायला हवे.

पंडित जवाहरलाल नेहरूंचे भारतीय इतिहासातील स्थानमाहात्म्य त्यांच्या राष्ट्रीय स्वातंत्र्यलढ्यातील योगदानामुळे निर्माण झालेले आहे आणि त्यांच्या पंतप्रधानपदाच्या प्रदीर्घ कारकीर्दिने त्या माहात्म्यात भरच घातली गेली आहे. आता मात्र त्या स्वातंत्र्यलढ्यामधील महात्मा गांधी किंवा सरदार वल्लभभाई पटेल यांच्यासारख्या अन्य प्रभावी नेत्यांबरोबरचे त्यांचे संबंध कसे होते; काँग्रेससारख्या एकाच पक्षसंघटनेच्या छत्रछायेखाली 'राष्ट्रीय स्वातंत्र्य' या एका समान ध्येयाने प्रेरित होऊन हे नेते गुण्यागोविंदाने नांदत होते की ते स्वातंत्र्य प्रत्यक्ष नजरेच्या टप्प्यात येण्यापूर्वीपासूनच त्यांच्यात सत्तासंघर्ष सुरू झाला होता; त्या संघर्षात यशस्वी होता यावे म्हणून त्या नेत्यांपैकी कुणी कोणते मार्ग अनुसरले आणि कुणी कोणत्या तडजोडी केल्या.... यांसारख्या प्रश्नांच्या अनुरोधाने साधकबाधक चर्चा केली जाणे आवश्यक ठरले आहे.

अशा विविधांगी व बहुस्तरीय चर्चेतील एक महत्त्वाचा ठरू शकणारा व उपविषय म्हणजे जवाहरलाल नेहरू आणि सुभाषचंद्र बोस या दोघांमधील संबंध. हे दोघेही आपापल्या परीने प्रचंड लोकप्रिय ठरलेले नेते होते, यात शंकाच नाही. दोघेही विलायतेहून उच्च विद्याविभूषित होऊन मायदेशी परतले होते, लौकिक वैभव मिळवून देणाऱ्या मार्गाकडे पाठ फिरवून दोघांनीही देशसेवेचे व्रत अंगीकारले होते. जवाहरलाल सुभाषचंद्रांपेक्षा सुमारे सव्वासात वर्षांनी मोठे होते. (जवाहरलाल यांचा जन्म १४ नोव्हेंबर १८८९ चा, तर सुभाषचंद्रांचा जन्म २३ जानेवारी १८९७चा.) तरीदेखील काँग्रेस संघटनेच्या कामकाजातील दोघांचा सहभाग सामान्य प्रतिनिधींच्या नजरेत भरला आणि त्यांच्यामार्फत सर्वसामान्य देशबांधवांपर्यंत पोचला, तेव्हा ते दोघेही एकाच वयोगटातील नेते मानले गेले. अशा दोन नेत्यांमधील संबंधांचा परिपूर्ण आढावा घ्यायचा झाला, तर एक स्वतंत्र पुस्तकच लिहावे लागेल. तथापि त्या दोघांची एकमेकांना वारंवार छेदून जाणारी आयुष्ये लक्षात घेऊन मी या छोटेखानी लेखाच्या मर्यादेत केवळ दोन मुद्द्यांचाच सविस्तर परामर्श घ्यायचे ठरवले आहे.

पहिला मुद्दा आहे – राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या ध्येयाशी असणारी बांधिलकी या निकषावर जवाहरलाल नेहरू आणि सुभाषचंद्र बोस यांच्या नेतृत्वाची तुलना....

अणि दुसरा मुद्दा आहे - १८ ऑगस्ट १९४५ रोजी विमान अपघातात सुभाषचंद्र बोस मरण पावले, या बातमीच्या सत्यासत्यतेची शहानिशा करण्याबाबत नेहरूंनी स्विकारलेल्या भूमिकेची चिकित्सा.

**दोन :**

१९२० मध्ये लोकमान्य टिळकांचे निधन झाल्यानंतर १९४७ पर्यंतचा काळ गांधीयुग म्हणून ओळखला जातो. त्या युगाच्या प्रारंभीच्या दशकात काँग्रेस संघटनेतील विविध गट आपल्या संघटनेचे ध्येय कोणते असावे, हे निश्चित करण्याच्या प्रयत्नात होते, असे इतिहास सांगतो. एकीकडे 'भारतीय लोकांमध्ये आपल्या देशाची राज्यघटना तयार करण्याची कुवतच नाही', 'अशा एखाद्या राज्यघटनेच्या स्वरूपाबाबत भारतीयांमध्ये एकमत होण्याची सुतराम

अनुक्रमणिका








शक्यताच नाही,' असे ब्रिटिश राज्यकर्ते म्हणत होते. भारतीयांची प्रातिनिधिक सरकारची मागणी टप्प्याटप्याने मान्य करीत साम्राज्यांतर्गत स्वायत्तता प्रदान करण्यापर्यंत आपले औदार्य वाढवत नेण्याची त्यांची तयारी होती. भारतीयांमधील वाढत्या अस्वस्थतेची दखल घेऊन सर जॉन सायमन यांच्या नेतृत्वाखालील सात सदस्यांच्या आयोगाची नियुक्ती केली जात होती, तथापि भारताबद्दलच्या संभाव्य तरतुदींचा विचार करण्यासाठी नेमलेल्या त्या आयोगावर एकाही भारतीयाची नियुक्ती न करता मदोन्मत्त साम्राज्यवादी धोरणच पुढे रेटले जात होते. दुसरीकडे सारा देश खवळून उठला होता. 'सायमन, गो बॅक!'ची घोषणा देशात सर्वत्र निनादत होती. अशा पार्श्वभूमीवर मोतीलाल नेहरू यांच्या अध्यक्षतेखालील सर्वपक्षीय समितीने तयार केलेल्या अहवालात 'डोमिनियन स्टेट'ची म्हणजे ब्रिटीश साम्राज्यांतर्गत (राष्ट्रकुलांतर्गत) स्वायत्ततेची मागणी समाविष्ट करण्यात आली होती. काँग्रेसमधील ज्या तरुण कार्यकर्त्यांना स्वायत्ततेचे ते ध्येय खटकले होते, त्यांच्यात जवाहरलाल नेहरू आणि सुभाषचंद्र बोस ही दोन नावे अग्रभागी होती. 'कॅनडा, ऑस्ट्रेलिया, न्यूझीलंड, दक्षिण आफ्रिका वगैरे देशांनी मागणी करावी, त्याप्रमाणे आपण सुद्धा साम्राज्यांतर्गत स्वायत्ततेचीच मागणी करावी,' याचा जवाहरलालजींना प्रचंड राग आला होता' आणि अखिल भारतीय क्रॉंग्रेसच्या मद्रासपासून लाहोरपर्यंत भरलेल्या अधिवेशनांमध्ये 'संपूर्ण स्वातंत्र्य हे आपले ध्येय असल्याचे काँग्रेसने जाहीर करावे,' यासाठी ते हिरीरीने प्रयत्नही करीत होते. कधी त्याबद्दलचा ठराव मांडून, तर कधी अनुमोदन देऊन त्यांनी गांधीजींबरोबरचे आपले मतभेद अगदी स्पष्ट केले होते.[१]

गांधीजींना 'संपूर्ण स्वातंत्र्याचे ध्येय अव्यवहार्य वाटत होते. काँग्रेस अधिवेशनात त्याबद्दलचा ठराव मांडण्यात तरुण नेते घाई करीत आहेत, तसे ध्येय जाहीर करताना ते मागचा-पुढचा कसलाही विचार करीत नाहीत,' अशी त्यांची तक्रार होती. 'एक वर्षात स्वराज्य मिळवून देण्याचे' आश्वासन देताना आणि 'तसे स्वराज्य मिळाले नाही, तर मग मात्र स्वातंत्र्याचे ध्येय मान्य करायची' तयारी दर्शवतानाही त्यांचे याबाबतचे विचार स्पष्ट होते.

आणि आता इतक्या वर्षांनी मागे वळून पाहताना असे जाणवते की, पुढे काय करावयाचे, याबद्दलची व्यूहरचनाही त्यांनी मनात पक्की ठरवली होती.

संपूर्ण स्वातंत्र्य हे ध्येय मानू इच्छिणाऱ्या तरुणांच्या गोटात फूट पाडायची, त्या ध्येयाचे समर्थन करू पाहणाऱ्या नेत्यांना पक्षसंघटनेत फारसे महत्त्व मिळू द्यायचे नाही आणि हळूहळू काँग्रेस पुन्हा साम्राज्यांतर्गत स्वायत्ततेच्याच ध्येयापाशी येऊन थांबेल, असे धोरण अनुसरायचे. ही होती त्यांची व्यूहरचना.

या व्यूहरचनेची अंमलबजावणी करताना आधी त्यांनी नेहरू पितापुत्रांमधील संबंधाचा आणि त्यातही विशेषत्वाने मोतीलालजींच्या मनात जवाहरलालजींबद्दल असणाऱ्या हळव्या भावनांचा उपयोग करून घेतला. गांधीजींच्या या संदर्भातील प्रयत्नांचा जवाहरलालजींना जेव्हा अगदी प्रारंभी सुगावा लागला, तेव्हा आपली ध्येयनिष्ठा अबाधित राखण्याचा त्यांचा विचार होता. जवाहरलालजींना काँग्रेसअध्यक्ष बनवण्याबद्दल मोतीलालजींच्या विनंतीला गांधीजींनी आधी विरोध केला होता. त्यामुळे हिरमुसलेल्या सईद महमूद यांच्यासारख्या मित्राला दि. ३० जून १९२८ रोजी पत्र पाठवून जवाहरलालजींनी आपला तो निर्धार नोंदवलाही होता. त्यांनी या पत्रात म्हटले होते, "मला काँग्रेसचे अध्यक्षपद मिळेल किंवा मिळणारही नाही. मित्रा, तू त्याबद्दल कसलीही काळजी करू नकोस. मी बहुधा अध्यक्ष होणार नाही. मी अध्यक्ष व्हायला विरोध आहे, तो माझ्या तरुण वयामुळे नव्हे किंवा माझ्याबद्दलच्या असूयेमुळेही नव्हे; तो आहे माझ्या जहाल मतांच्या भीतीमुळे. पण काँग्रेसचा अध्यक्ष व्हायला मिळावे म्हणून मी माझ्या कल्पना सौम्य करायला मुळीच तयार नाही."[२]

एवढे नव्हे, तर लाहोरच्या अधिवेशनासाठी जवाहरलाल यांना अध्यक्ष बनवण्यास गांधीजींनी परवानगी दिल्यानंतरही, त्यामुळे हूरळून न जाता संपूर्ण स्वातंत्र्याच्या ध्येयाचा उच्चार त्यांनी रावी नदीच्या तीरावरून केलाच! काँग्रेसच्या इतिहासात आवर्जून नोंदवली जावी, अशी ती घटना.... परंतु गांधीजींनी 'त्या' संमतीपूर्वी मोतीलालजी आणि जवाहरलाल या दोघांशीही केलेला पत्रव्यवहार (जो अलिकडे उपलब्ध झाला आहे) [३] आणि काँग्रेस संघटनेत- विशेषतः कार्यकरिणीत- जहाल मताच्या

स्वातंत्र्यवादी कार्यकर्त्यांना न घेण्याबाबत दिसून आलेले एकमत ही काँग्रेस इतिहासातील फारशी चर्चिली न जाणारी महत्त्वपूर्ण बाब आहे. सत्तासंघर्षाच्या 'त्या' पर्वावर स्पष्ट प्रकाशझोत जेव्हा केव्हा पडायचा असेल, तेव्हा पडो, एक गोष्ट मात्र सूर्यप्रकाशासारखी स्पष्ट आहे आणि ती म्हणजे लाहोर अधिवेशनात उच्च रवाने उद्घोषित केलेले ध्येय म्हणजे संपूर्ण स्वातंत्र्य साध्य करण्यासाठी प्रयत्न करण्याबाबत जवाहरलालजींचा मावळत गेलेला उत्साह! पुन्हा कधी त्या ध्येयाचा पाठपुरावा नाही की त्यासाठी प्रयत्न करीत राहिलेल्या सुभाषबाबूंसारख्या सहकाऱ्याशी हातमिळवणी नाही. देशाचे भवितव्य कसे घडवावे, या मूलभूत प्रश्नांबाबत ज्यांची मते पटण्यासारखी नाहीत आणि आपण कधीही अनुसरणार नाही, त्या गांधीजींची काँग्रेसबाबतची एकाधिकारशाही मात्र जवाहरलालजींनी बिनबोभाट मान्य केलेली दिसते. विचारांबाबत बरीचशी एकवाक्यता निर्माण होऊ शकेल, अशा सुभाषबाबूंची साथसंगत सोडलेली दिसते. काँग्रेसमधील गांधीपर्वाच्या उत्तरार्धात जवाहरलालजींनी अनेक बाबतीत गांधीजींना डावलले. आपले म्हणणे खरे करण्यासाठी त्यांनी इतर सहकाऱ्यांची कमी-अधिक प्रमाणात मदत घेतली आणि गांधीजींना निष्प्रभ करून टाकले; पण 'संपूर्ण स्वातंत्र्य' या ध्येयाचा पुनरुच्चार मात्र त्यांनी केला नाही. 'साम्राज्यांतर्गत स्वायत्तता' स्वीकारण्यात आपण कुठेतरी ध्येयच्युत झालो आहोत, असे त्यांना वाटलेसुद्धा नाही.

१५ ऑगस्ट १९४७ रोजी आपला देश स्वतंत्र झाला, असे मानणाऱ्या असंख्य लोकांना नेहरूंनी साम्राज्यांतर्गत स्वायत्तता मान्य केली, हे माझे विधान आक्षेपार्ह वाटण्याची शक्यता आहे. त्यांच्या विचारार्थ मी ३ जून १९४७ रोजी ब्रिटनने प्रस्तुत केलेल्या बादशाही पत्रकातील विसावे कलम उद्धृत करू इच्छितो.

"The major political parties have repeatedly emphasised their desire that there should be the earliest transfer of power in India. With this desire His Majesty's Governmemt are in full sympathy and they are willing to anticipate the date of June 1948 for the handing of power by the setting up of an Independant Indian Government or Government at even an earlier date. Accordingly,as the most expeditious and indeed the only practicable way of meeting their desire, His Majesty's Government propose to introduce legislation during the current session for the transfer of power this year on a **Dominion Status basis** to one or two successor Authorities according to decisions taken as a result of this announcement. This will be without prejudice to the right of the Indian Constituent Assemblies to decide in due course whether or not the part of India in respect of which they have authority will remain within the British Commonwealth."

पुढे ब्रिटिश पार्लमेंटमध्ये १८ जुलै १९४७ रोजी जे 'स्वातंत्र्य विधेयक' पारित केले गेले आणि १५ ऑगस्ट पासून ज्या कायद्याची अंमलबजावणी होण्याची घोषणा झाली, ते विधेयक आणि तो कायदा 'वसाहतींच्या स्वराज्या' बद्दल होता, संपूर्ण स्वतंत्र व सार्वभौम भारताबद्दल नव्हता. त्या कायद्याच्या प्राक्कथनामध्ये (preamble) स्पष्टपणे म्हटले होते,

'An Act to make provision for the setting up in India of two Independent Dominions' [४]

ब्रिटिश कागदपत्रांमधील या आंशिक उद्धरणांनी ज्यांचे समाधान होणार नाही, त्यांनी व्ही. पी. मेनन या ज्येष्ठ सनदी अधिकाऱ्यांनी लिहिलेले संपूर्ण 'Transfer of Power'हे पुस्तक अवश्य पाहावे. 'स्वातंत्र्याच्या कायद्याचा टंकलिखित मसुदा' त्या पुस्तकात छापलाआहे, त्यात जवाहरलालजींनी आपल्या हस्ताक्षरात केलेल्या काही दुरुस्त्या स्पष्ट दिसतात. पण 'वसाहतीच्या दर्जा' बद्दलचा मजकूर जेथे जेथे आहे, तेथे तेथे मात्र जवाहरलालजींच्या लेखणीचा साधा स्पर्शही झालेला आढळत नाही. त्या मसुद्यावर त्यांनी संमतीदर्शक स्वाक्षरी केलेलीही आढळते. ३/७/४७ ही तारीखही घातलेली आहे. [५]

जवाहरलाल नेहरूंच्या ध्येयच्युतीचा हा पुरावा जरी

अनुक्रमणिका

फारसा चर्चिला गेला नसला, तरी पंतप्रधान झाल्यावरही ब्रिटिश राजाकडे छोट्यामोठ्या बाबींसाठी विनंती अर्ज करावे लागतात, हे लक्षात आल्यानंतर जवाहरलाल नेहरू उद्विग्न झाले होते, हे मात्र एम. ओ. मथाई यांच्यामुळे खूप पूर्वीच स्पष्ट झाले होते. दि. २ सप्टेंबर १९४६ रोजी हंगामी मंत्रिमंडळाचे नेते या नात्याने जवाहरलालजींनी जी शपथ घेतली होती, ती ब्रिटिश सम्राट सहावे जॉर्ज यांच्याबद्दलची निष्ठा व्यक्त करून मग घेतली होती. 'आपल्या सार्वभौम राजाची प्रामाणिकपणे चांगली सेवा करण्याचे' आश्वासन त्यांना त्यावेळी द्यावे लागले होते. त्यानंतर कित्येक दिवस नेहरू आपली व्यथा व्यक्त करीत राहिल्याचे मथाईंनी आपल्या आत्मचरित्रात नमूद केले आहे. (He lamented, "I had not bargained for these'.)

आणि तरीसुद्धा प्रत्यक्ष सत्तांतराच्या वेळी 'भारताला वसाहतीचा दर्जा न देता संपूर्ण स्वातंत्र्यच द्या,' अशी मागणी रेटून धरण्याइतकी कडवी ध्येयनिष्ठा जवाहरलालजींना दाखविता आली नाही ती नाहीच, ही मुद्दाम दखल घ्यावी, अशी बाब आहे.

भारताचे पहिले भारतीय गव्हर्नर जनरल म्हणून श्री. चक्रवर्ती राजगोपालाचारी यांची नियुक्ती करण्याची वेळ आली, तेव्हा नेहरूंना अर्ज करून परवानगी मागावी लागली होती, ती ब्रिटिश सम्राट सहावे जॉर्ज यांचीच. १५ ऑगस्ट १९४७ ला जे स्वातंत्र्य भारताला मिळाले, ते कोणत्या दर्जाचे होते, हे स्पष्ट करणारा नेहरूंचा तो विनंती अर्ज मुद्दाम या लेखासोबत छापला आहे. त्या अर्जातील भाषा तर पाहावीच, पण जवाहरलालजींच्या सहीखालचा त्यांचा हुद्दाही अवश्य पाहावा.[६] २८ एप्रिल १९४८ च्या त्या अर्जावरील ती सही आणि तो हुद्दा पाहिल्यानंतर कुठल्याही स्वातंत्र्यप्रिय देशभक्त भारतीयाच्या मनात अगदी स्वाभाविकपणे प्रश्न उमटेल- 'याचसाठी केला होता का अट्टहास?'

आणि त्या प्रश्नाच्या नकारार्थी उत्तरातच जवाहरलालजींच्या ध्येयच्युतीच्या शोकांतिकेचे प्रतिबिंब पडलेले दिसेल.

२८ नोव्हेंबर १९४९ रोजी घटना परिषदेने नवी राज्यघटना मंजूर केली, तेव्हा कुठे भारत सार्वभौम प्रजासत्ताक झाला; १९३५ च्या कायद्याचा अंमल तोपर्यंत चालूच होता - असे होऊ नये म्हणून पंडित जवाहरलाल नेहरूंनी प्रयत्न केल्याचे, आंदोलन उभारल्याचे, ब्रिटिश राज्यकर्त्यांबरोबर घटनात्मक युक्तिवादाची लढाई खेळल्याचे आजपर्यंत तरी कुठे ऐकायला मिळालेले नाही आणि त्यामुळेच राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या ध्येयावरील अविचल निष्ठेच्या निकषावर त्यांचे नेतृत्व बावनकशी ठरत नाही, असे म्हणणे क्रमप्राप्त आहे.

**तीन :**

सुभाषचंद्र बोस यांच्या आयुष्याकडे जरी अगदी ओझरता कटाक्ष टाकला, तरी राष्ट्रीय स्वातंत्र्याबद्दलची त्यांची प्रचंड तळमळ अगदी सहज लक्षात येते. 'साधनानां अनेकता।' या लोकमान्य टिळकांनी अनुसरलेल्या धोरणाचे गांधीयुगातील ते खरेखुरे वारसदार होते. त्यांच्या दृष्टीने राष्ट्रीय स्वातंत्र्यसंपादनाच्या ध्येयाला सर्वाधिक महत्त्व होते; ते साध्य करण्यासाठी कोणताही मार्ग अनुसरण्याची किंवा कोणतेही साधन वापरण्याची त्यांची तयारी होती. अहिंसक मार्गाने मिळेल, तेच स्वातंत्र्य स्वीकारायला गांधीजी तयार होते. हिंसेच्या मार्गाने जाऊन भारत स्वतंत्र झाला, तर त्या तशा भारतात राहायला आपण फारसे उत्सुक असणार नाही, असे जाहीर करण्यापर्यंत त्यांची मजल गेली होती. गांधीजींचे नेतृत्व मान्य करून काँग्रेस पक्षाच्या संघटनेत वावरणाऱ्या अगदी जवाहरलाल नेहरूंसारख्याही अनेक नेत्यांना अहिंसेबाबतचे गांधीजींचे हे प्रेम मात्र मान्य नव्हते. १९४० नंतरच्या काळात काँग्रेसच्या अधिवेशनांमधूनही त्या मतभेदाचे पडसाद उमटले होते आणि गांधीजी एकटे पडल्याचे चित्र निर्माण झाले होते.

तथापि सशस्त्र क्रांतीच्या मार्गाने जाण्याचे प्रयत्न त्या नेत्यांनी चालवले होते, असा त्याचा अर्थ नाही. भारताचे लष्करीकरण आणि लष्कराचे भारतीयीकरण या संदर्भात त्या नेत्यांनी काही विशिष्ट भूमिका स्वीकारली आणि त्या दृष्टीने काही नियोजनपूर्वक पावले उचलली, असे दिसले नाही. दुसऱ्या महायुद्धातील भारताचा सहभाग दोस्त राष्ट्रांच्या बाजूने असावा, याबद्दल काँग्रेसच्या नेत्यांमध्ये मतभेद नव्हते; मतभेद स्पष्ट झाले, ते ब्रिटनने भारताची भूमिका परस्पर जाहीर केली, त्या नेत्यांशी

विचारविनिमय केला नाही म्हणून! जवाहरलाल नेहरूंनी तर त्यामुळेच संतापून काँग्रेसच्या विविध प्रांतांत स्थापन झालेल्या सरकारांना राजीनामा देण्यास भाग पाडले होते. तथापि त्या महायुद्धाच्या पूर्वार्धात ब्रिटनसमोर स्वसंरक्षणाची समस्या आ वासून उभी राहिलेली असताना भारतात ब्रिटिश राजवटीविरुद्ध अहिंसकच, पण सार्वत्रिक उठाव करावा, अशी कल्पना त्यांना सुचली नाही. अगदी १९४२ सालच्या 'चले जाव' आंदोलनाच्या वेळीही तसे कोणतेही पूर्वनियोजन त्यांनी केलेले नव्हते.

सुभाषबाबूंनी मात्र सनदशीर राजकारणाबरोबरच कायदेभंगाच्या आंदोलनातही सहभाग घेतला. देशबंधू चित्तरंजन दास यांचे अनुयायित्व त्यांनी स्वीकारले होते. कायदेमंडळांत प्रवेश मिळवण्यासाठी निवडणुका लढवाव्यात की लढवू नयेत, या प्रश्नावर गांधीजींबरोबर मतभेद झाल्यामुळे देशबंधू दास आणि मोतीलाल नेहरू यांनी जेव्हा स्वराज्य पक्ष काढला, तेव्हा सुभाषबाबू त्या पक्षाचे कार्यकर्ते झाले. त्या दोन ज्येष्ठ नेत्यांच्या मृत्यूनंतर आणि कायदेमंडळातील प्रवेशाबद्दलचा गांधीजींचा विरोध मावळल्यानंतर ते पुन्हा काँग्रेस पक्षाचे काम पाहू लागले. त्या पक्षाचे काम पाहताना, त्या कामाचाच एक भाग म्हणून देशभरातील युवकांना संघटित करीत असताना सुभाषबाबूंनी संपूर्ण स्वातंत्र्याच्या ध्येयावरील निष्ठा कायम ठेवली.

'युगांतर' किंवा 'अनुशीलन समिती' यांसारख्या संघटनांमधील हताश क्रांतिकारकांना काँग्रेसच्या प्रवाहात सामावून घेण्याचे त्यांनी केलेले प्रयत्न...

मोतीलाल नेहरू कलकत्ता अधिवेशनाचे अध्यक्ष म्हणून त्या शहरात येताच एखाद्या स्वतंत्र देशाच्या राज्यप्रमुखाचे स्वागत व्हावे तसे त्यांचे जंगी स्वागत करण्यासाठी त्यांनी अल्पावधीत उभारलेले हजारो स्वयंसेवकांचे दल....

मद्रासपासून लाहोरपर्यंतच्या विविध अधिवेशनांमध्ये संपूर्ण स्वातंत्र्य हे ध्येय म्हणून निश्चित होण्यासाठी त्यांनी केलेली प्रयत्नांची पराकाष्ठा....

भारतीय स्वातंत्र्याचा प्रश्न आंतरराष्ट्रीय स्तरावर धसाला लावण्यासाठी परदेशांत प्रचारयंत्रणा उभारण्याची ज्येष्ठ काँग्रेस नेते विठ्ठलभाई पटेल यांच्यासारख्या वडीलधाऱ्याच्या मदतीने त्यांनी आखलेली योजना आणि ती अमलात आणण्यासाठी आपल्या मृत्युपत्रात विठ्ठलभाईंनी विशिष्ट रक्कम सुभाषचंद्रांकडे सोपविली जावी, अशी तरतूद करण्याइतका त्यांनी कमावलेला विश्वास.....

गांधीजींच्या लहरी स्वभावाबद्दल आणि आपण घेतलेले अनाकलनीय निर्णय इतरांवर जबरदस्तीने लादण्याच्या त्यांच्या प्रवृत्तीबद्दल राष्ट्रीय स्वातंत्र्यलढ्याच्या प्रगतीच्या एकमेव निकषावर स्पष्ट मते त्या त्या वेळीच जाहीरपणे मांडत राहण्याचे त्यांनी दाखवलेले दुर्मीळ धाडस.....

गांधीजींची नाराजी आणि रोष पत्करुनही त्यांनी पक्षसंघटनेत मिळवलेली वादातीत लोकप्रियता, त्यापाठोपाठ लाभलेले पक्षाचे अध्यक्षपद, त्या पदावर आरूढ झाल्यानंतर सर्वंकष राष्ट्रउभारणीची त्यांनी मांडलेली तर्कशुद्ध निकड आणि जवाहरलाल नेहरूंबरोबरचे वैयक्तिक मतभेद बाजूला ठेवून स्वतंत्र भारताच्या आर्थिक व औद्योगिक विकासाचा विचारपूर्वक आराखडा तयार करण्यासाठी नेमलेल्या समितीचे अध्यक्षपद स्वतःकडे न घेता नेहरूंकडे सोपविण्याची त्यांनी दाखवलेली उदारमनस्कता.....

पक्षाध्यक्षपद सलग दुसऱ्या वर्षीही त्यांच्याकडे राहू नये म्हणून आपली पतप्रतिष्ठा पणाला लावून गांधीजींनी उभ्या केलेल्या पट्टाभी सीतारामय्या यांच्यासारख्या नेत्याचा लोकशाही मार्गाने त्यांनी केलेला निर्णायक पराभव.....

तो पराभव म्हणजे वर्मी बसलेला घाव मानून महात्माजींनी आणि जवाहरलालजींसारख्या त्यांच्या अनुयायांनी अडवणुकीचे धोरण स्वीकारल्यामुळे सुभाषबाबूंना पक्षाध्यक्षपदाचा द्यावा लागलेला राजीनामा....

'त्या' विधिनिषेधशून्य सत्तासंघर्षात पराभव पत्करावा लागल्यानंतरही नाउमेद न होता त्यांनी केलेली 'फॉरवर्ड ब्लॉक' या नव्या पक्षाची स्थापना ....

दुसरे महासुद्ध सुरू झाल्यानंतर आणि विशेषतः खुद्द ब्रिटनवर जर्मन हल्ल्याचे सावट घोंगावू लागल्यानंतर आपले स्वातंत्र्य मिळवण्याची ती संधी साधावी म्हणून त्यांनी सुरू केलेले विविध प्रयत्न...

'निव्वळ सविनय कायदेभंगाची चळवळ उभारून ब्रिटिश सरकार नमणार नाही, त्यासाठी संपूर्ण असहकाराचे राष्ट्रव्यापी आंदोलन उभारण्याची आवश्यकता आहे,' हे आपले मत गांधीजींना पटवून देण्यासाठी वैयक्तिक

मानापमान बाजूला ठेवून त्यांनी केलेली पराकाष्ठा...

ब्रिटिशांविरुद्ध देशांतर्गत लढा उभारण्याबाबतची काँग्रेसची कचखाऊ प्रवृत्ती आणि पर्यायी नेतृत्वाला वाव देण्याबाबतचा आडमुठेपणा लक्षात आल्यानंतर त्यांनी देश सोडून जाण्याची केलेली तयारी....

ब्रिटिश गुप्तहेरयंत्रणेला गाफील ठेवून राहत्या घरातून त्यांनी केलेले पलायन आणि जिवावर उदार होऊन, पठाणाच्या वेशात अफगाणिस्तानपर्यंत मारलेली मजल...

देशोदेशीच्या - प्रामुख्याने सोव्हिएत युनियनच्या, इटलीच्या आणि जर्मनीच्या-वकिलातींशी संपर्क साधून भारतीय स्वातंत्र्यलढ्याला राजनैतिक पाठिंबा मिळवण्याचा त्यांनी केलेला प्रयत्न....

रशियामार्गे जर्मनीत पोचण्यामध्ये यशस्वी झाल्यानंतर तेथे नाझी सरकारकडून सहकार्य मिळवण्यासाठी त्यांनी केलेली धडपड आणि त्या सर्व प्रक्रियेत राष्ट्रीय स्वाभिमान जपण्याचा व स्वायत्तता राखण्याचा त्यांनी दाखवलेला बाणेदारपणा.....

नभोवाणीसारख्या प्रसारमाध्यमाचा उपयोग करून, परदेशातून देशबांधवांशी संपर्क साधण्यात आणि त्यांना संपूर्ण स्वातंत्र्यासाठी लढायला प्रवृत्त करण्यात सुभाषबाबूंनी दाखविलेली कल्पकता....

जर्मनीत राहून भारतीय स्वातंत्र्यलढ्याला अपेक्षित गती देता येत नाही, याची जाणीव झाल्यामुळे त्यांनी जपानकडून सहकार्य मिळवण्याच्या अपेक्षेने आग्नेय आशियाकडे घेतलेली धाव...

'विप्लवी महानायक' म्हणून ओळखल्या जाणाऱ्या रासबिहारी बोस आणि कॅप्टन मोहनसिंग यांच्यासारख्या जुन्याजाणत्या नेत्यांनी दिलेल्या आमंत्रणाचा स्वीकार करून सुभाषबाबूंनी आग्नेय आशियातील भारतीयांचे स्वीकारलेले नेतृत्व...

सिंगापूरसारखा लष्करी दृष्ट्या महत्त्वाचा असणारा ब्रिटिशांचा तळ जपानसारख्या एका चिमुकल्या आशियाई देशाने हस्तगत केल्यानंतर ब्रिटिश इंडियन आर्मीमधील जे भारतीय सैनिक जपानच्या हातांत पडले, त्यांना राष्ट्रीय स्वातंत्र्याची किंमत पटवून देऊन ब्रिटनच्या भारतामधील राजवटीविरुद्ध सशस्त्र लढा देण्यासाठी सुभाषबाबूंनी उभी केलेली आझाद हिंद फौज....

भारताचे स्वातंत्र्य घोषित करून विस्थापित सरकारची स्थापना करण्यात, त्या सरकारला विविध देशांकडून राजनैतिक मान्यता मिळवण्यात 'नेताजीं'नी दाखवलेली दूरदर्शी परिपक्वता....

आग्नेय आशियामधील वेगवेगळ्या देशांमध्ये विखुरलेल्या भारतीय नगरिकांमधील सुप्त देशप्रेमाला साद घालून त्यांनी उभी केलेली आर्थिक यंत्रणा आणि 'जपानकडून मदत घेत असलो, तरी आपण त्या देशाचे मिंधे होणार नाही,' हे स्पष्ट करून त्यांनी त्या देशाच्या राजकीय व लष्करी नेतृत्वाकडून कमावलेला प्रचंड आदर....

जपानी सेनेच्या मदतीने त्यांनी भारताच्या पूर्व सीमेवर चढवलेला हल्ला, मिळवलेले प्रारंभिक यश, अंदमान-निकोबार द्वीपसमूहासारखा भारतीय प्रदेश ताब्यात आल्यावर तेथे भारतीय प्रशासन लागू करण्याबाबत त्यांनी आखलेली तपशीलवार योजना आणि 'स्वराज्य' व 'शहीद' असे त्या द्वीपसमूहाचे नामांतर करण्याबाबत त्यांनी घेतलेला बाणेदार निर्णय....

जपानकडून मिळणारी रसद कमी होऊ लागल्यानंतर आणि जपानी सेनाविभागांमधील सत्तासंघर्षाचा भारतीय मोहिमेवर प्रतिकूल परिणाम होत असल्याची जाणीव झाल्यानंतर लगेच सोव्हिएत रशियाशी संधान बांधून त्या देशाकडून मदत मिळवण्याचा नेताजींनी आरंभलेला प्रयत्न...

हिरोशिमा आणि नागासाकी या दोन जपानी शहरांवर अमेरिकेने अणुबाँब टाकल्यानंतर अल्पावधीतच जपानला शरणागती पत्करणे अटळ ठरणार आहे आणि नाइलाजाने आझाद हिंद फौजेच्या सैनिकांनाही तोच मार्ग अनुसरावा लागणार आहे, हे लक्षात आल्यावर खचून न जाता नव्या उमेदीने मांचुरियामार्गे रशियात जाण्याचा सुभाषबाबूंनी आखलेला बेत....

आणि 'ती' योजना अमलात आणत असतानाच फोर्मोसा बेटावरील तैहोकू विमानतळावर झालेल्या अपघातात नेताजींचा झालेला मृत्यू...

सुभाषचंद्रांच्या जीवनातील अगदी ठळक, लक्षणीय अशा काही मोजक्याच बाबींचा हा धावता आढावा. त्यावरून एक गोष्ट स्पष्ट होते की, राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या







ध्येयावर त्यांची अव्यभिचारी निष्ठा होती. ते साध्य करण्यासाठी वाटेल तो धोका पत्करण्याची, पडेल तो त्याग करण्याची त्यांची तयारी होती. हिंदू राजबंद्यांच्या धार्मिक हक्कांचा प्रश्न धसाला लावण्यासाठी अन्नसत्याग्रह करून तुरुंगाधिकाऱ्यांकडून बेदम मार खाल्ल्यावरही त्यांचा निर्धार ढळला नाही किंवा तुरुंगात खितपत पडण्याऐवजी आपल्या घरी स्थानबद्धतेत राहून पलायनाचा बेत नीट आखता यावा म्हणून उपोषण करून तब्येत खालावून घेताना त्या मार्गाच्या साधनशुचितेचा विचार मनात येऊन ते गोंधळले नाहीत. युरोपमधून निघून आग्नेय आशियापर्यंत पोचताना पाणबुडीतून प्रवास करायला ते डगमगले नाहीत किंवा पुढे आझाद हिंद फौजेच्या लष्करी मोहिमेत दोस्तांच्या विमान हल्ल्यांना तोंड देताना त्यांनी सैनिकांना वाऱ्यावर सोडले आहे आणि स्वतः मात्र सुरक्षित जागेचा आश्रय घेतला आहे, असे कधी घडले नाही. देशावर राज्य गाजविणाऱ्या ब्रिटिशांविरुद्ध असो, किंवा काँग्रेसबाहेर राहून त्या संघटनेतील नेत्यांना कळसूत्री बाहुल्यांप्रमाणे नाचवू पाहणाऱ्या गांधीजींविरुद्ध असो, स्पष्ट भूमिका घेताना सुभाषबाबू कधी कचरले नाहीत, त्या परखडपणाचा जो काही परिणाम होईल, तो भोगायची त्यांनी सदैव तयारी ठेवली. देशाची फाळणी करण्याची योजना घेऊन ब्रिटिश राज्यकर्ते वाटाघाटींचे आवाहन करू लागले, तेव्हा जवाहरलालजींसारख्या अनेक काँग्रेस नेत्यांमध्ये त्या योजनेला विरोध करण्याचे, त्याविरुद्ध आंदोलन करून पुन्हा तुरुंगात जाण्याचे बळच उरले नव्हते. मनाने आणि शरीराने ते खचले होते आणि नजरेच्या टप्प्यात आलेल्या सत्तेचा त्यांना मोह पडला होता. सुभाषबाबू मात्र एका प्रतिकूलतेकडून दुसऱ्या प्रतिकूलतेकडे जाणाऱ्या अग्निपथावरून सतत चालत राहिले. पण त्यांच्या अंतःकरणातील स्वातंत्र्याकांक्षा यत्किंचितही कमी झाली नाही. दुसऱ्या महायुद्धातील जपानसारखा एक सहकारी देश पराभूत झाला म्हणून हातपाय गाळून स्वस्थ बसण्याऐवजी किंवा सरळ ब्रिटिशांना शरण जाण्याऐवजी महायुद्धोत्तर काळात ब्रिटनबरोबर ज्या महासत्तेचे वितुष्टच राहण्याची दाट शक्यता त्यांना जाणवत होती, त्या सोव्हिएत युनियनमध्ये जाऊन स्वातंत्र्यलढ्याच्या नव्या पर्वाची नव्या उमेदीने तयारी करायला ते उत्सुकच होते. तशा प्रयत्नात असतानाच ते 'मरण पावले'....'

या साऱ्या छोट्यामोठ्या गोष्टी लक्षात घेतल्या म्हणजे सुभाषचंद्र बोस जवाहरलाल नेहरू यांच्यापेक्षा कितीतरी पटींनी अधिक ध्येयनिष्ठ स्वातंत्र्यसेनानी होते असे स्पष्टपणे जाणवते.

**चार :**

जवाहरलाल आणि सुभाषचंद्र या दोन लोकप्रिय नेत्यांच्या परस्परसंबंधांमधील आणखी एकच मुद्दा मी वाचकांसमोर ठेवू इच्छितो आणि तोसुद्धा अगदी संक्षेपाने. तो मुद्दा आहे, सुभाषचंद्रांच्या ऑगस्ट १९४५ मध्ये झालेल्या कथित (विमान) अपघाती निधनाबद्दलचा आणि जवाहरलालजींनी त्या संदर्भात स्वीकारलेल्या वादग्रस्त भूमिकेबद्दलचा.

२३ ऑगस्ट १९४५ रोजी लंडनहून अशी एक बातमी प्रसिद्ध झाली की, 'आझाद हिंद सरकारचे हंगामी प्रमुख सुभाषचंद्र बोस जपानी सरकारबरोबर वाटाघाटी करण्यासाठी १६ ऑगस्ट रोजी सिंगापूरहून निघाले होते. १८ ऑगस्ट रोजी दुपारी २ वाजण्याच्या सुमारास तैहोकू विमानतळावर विमान कोसळून झालेल्या अपघातात त्यांचे निधन झाले.'

ही बातमी देशात पसरली, तेव्हा सर्वत्र दुःखाचे वातावरण निर्माण झाले; परंतु सुभाषबाबूंचा पूर्वेतिहास आठवल्यासनंतर त्या दुःखाची जागा संशयाने घेतली गांधीजींपासून आझादांपर्यंत अनेक काँग्रेस नेत्यांचा त्या बातमीवर मुळीच विश्वास बसला नाही. 'जोपर्यंत बातमीची नीट शहानिशा होत नाही, तोपर्यंत सुभाषचे श्राद्ध घालण्याची घाई करू नये,' असा गांधीजींनी बोस कुटुंबियांना सल्ला दिला. ती बातमी खोटी असावी. मुद्दाम पसरवलेली असावी, असे असंख्य भारतीयांनाही वाटत होते, कारण सुभाषबाबूंनी राहत्या घरी आजारी असल्याचे नाटक करून ब्रिटिश गुप्तहेरांची अहोरात्र पाळत असतानाही त्यांच्या हातावर तुरी देऊन पळून जाण्यात यश संपादन केले होते, ती घटना सर्वांच्याच मनात ताजी होती.

त्याशिवाय आणखी एकदा विमानअपघातात भारतीय नेते मरण पावल्याची बातमी आग्नेय आशियातून प्रसिद्ध झाली होती. प्रारंभी सुभाषचंद्रांचाही त्या मृतांमध्ये समावेश

असल्याचे वृत्त होते, पण नंतर ते चुकीचे असल्याचे स्पष्ट झाले होते.

दुसऱ्या महायुद्धाच्या अखेरीस जपानने शरणागती पत्करल्यानंतर प्रातिनिधिक स्वरूपात का होईना, युद्धगुन्हेगारीच्या त्या देशाच्या लष्करी अधिकाऱ्यांविरुद्ध आरोपाखाली खटले भरले जाणार, हे अटळ होते. युरोपमध्ये युद्ध थांबल्यावर म्हणजेच नाझी जर्मनीने शरणागती स्वीकारल्यानंतर न्यूरोबर्ग खटले भरले गेले होते. तसेच जपानी अधिकाऱ्यांवर खटले भरले जाणार आणि बहुसंख्य आरोपींना दोषी ठरवून मृत्युदंडाची शिक्षा ठोठावली जाणार, हे स्पष्टपणे दिसत होते. आझाद हिंद फौजेच्या वतीने नेताजी सुभाषचंद्र बोस यांनी शरणागती पत्करली असती, तर ब्रिटिश सरकारने त्यांच्यावरही खटला भरलाच असता आणि युद्धगुन्हेगार ठरवून त्यांना ठार मारलेच असते. सुभाषचंद्र मृत्यूला भीत होते म्हणून नव्हे, तर स्वातंत्र्यलढा पुढे नेण्याची जबाबदारी त्यांना सर्वाधिक महत्त्वाची वाटत होती म्हणून त्यांनी तो अपघाताचा बनाव घडवून आणला असावा, असा संशय वाटणे स्वाभाविक होते. अँग्लोअमेरिकन विजेत्यांनासुद्धा तीच शंका भेडसावत होती. जर्मन हुकुमशहा अ‍ॅडॉल्फ हिटलरचा मृतदेह सोव्हिएत युनियनच्या सैनिकांच्या हाती पडल्याचे जरी एप्रिल १९४५ अखेरीस जाहीर झाले होते, तरी तो मूठभर विश्वासू सहकाऱ्यांसह लॅटिन अमेरिकेत पळून गेल्याच्या बातम्यासुद्धा प्रसिद्ध झाल्या होत्या आणि त्यांच्या खरेखोटेपणाची शहानिशा पूर्ण होण्यापूर्वीच सुभाषचंद्र बोस यांच्या मृत्यूचे गूढ उकलण्याचे आव्हान विजेत्यांसमोर उभे राहिले होते. वेगवेगळ्या यंत्रणांकडून तपासपथके पाठवून चौकशी केली जात होती. [८]

या पार्श्वभूमीवर जवाहरलालजींची भूमिका कोणती होती? 'ती' बातमी पत्रकारांकडून त्यांना समजली. तेव्हा ते अबोताबाद येथे होते. 'एक थोर निःस्वार्थी नेता मरण पावल्याबद्दलचे दुःख' त्यांनी व्यक्त केले आणि 'त्या शूर माणसाला वीराला साजेसे आणि एका झटक्यात मरण आले याबद्दल'ची एक प्रकारची सुटकेची भावनाही त्यांनी व्यक्त केली. तथापि अल्पावधीतच तेसुद्धा सुभाषचंद्रांच्या मृत्यूबद्दल शंका व्यक्त करू लागले. 'नेताजी सायगावामध्ये दिसले असून योग्य वेळी भारतात येऊन दाखल होतील,' अशा आशयाच्या बातम्या त्याच सुमारास जगभरातील विविध वृत्तपत्रांतून प्रसिद्ध होत होत्या. त्यांची नोंद ठेवून जवाहरलालजी काँग्रेसतर्फे, पुढे हंगामी सरकारची सूत्रे हाती आल्यानंतर त्या संधिप्रकाशी सरकारतर्फे किंवा पुढे १९४७ नंतर भारतीय डोमिनियनचे पंतप्रधान म्हणून सुभाषचंद्रांच्या अपघाती निधनाची स्वतंत्रपणे चौकशी करू शकत होते, किंबहुना त्यांच्याकडून तशी अपेक्षा होती. राज्यघटना तयार होऊन प्रजासत्ताक स्थापन झाले, पुढे सार्वत्रिक निवडणुका होऊन, काँग्रेसचे सरकारही सत्तेवर आले आणि पंतप्रधानपदी जवाहरलाल आरूढ झाले, तेव्हा तरी त्यांनी तशा चौकशीचा आदेश द्यायला हवा होता.

जवाहरलाल नेहरू यांच्याबद्दल तशी अपेक्षा निर्माण होणे स्वाभाविक होते, कारण एकेकाळी सुभाषचंद्रांच्या आझाद हिंद फौजेविरुद्ध सशस्त्र लढा द्यायला उत्सुक असणारे जवाहरलाल प्रत्यक्ष युद्धसमाप्तीनंतर त्या फौजेच्या तिघा अधिकाऱ्यांविरुद्ध दिल्लीच्या लाल किल्ल्यात जेव्हा खटला सुरू झाला होता, तेव्हा वकिलाचा काळा डगला घालून त्यांच्या बचावासाठी उभे राहिले होते. 'जपानी सेनेच्या मदतीने सुभाषचंद्र भारतावर चाल करून आले तर त्यांच्याविरुद्ध गनिमी काव्याने लढायला जाणारा पहिला सैनिक मी असेन!' असे आपण म्हणालो होतो, हे विसरून त्यांनी तो नवा पवित्रा घेतला होता; कारण आझाद हिंद फौजेला भारत स्वतंत्र करण्यास अपयश आले असले, तरी त्या फौजेतील सैनिकांनी 'नेताजीं'च्या नेतृत्वाखाली गाजवलेल्या पराक्रमाची माहिती त्या खटल्यामुळे भारतीय जनसामान्यांना समजली होती आणि 'त्या बंडखोर सेनेला अद्दल घडवण्यासाठी' त्या खटल्याचे नाटक उभे करणाऱ्या ब्रिटिश अधिकाऱ्यांच्या अनपेक्षित पद्धतीने ते तिघे अधिकारी जनतेच्या गळ्यातले ईत बनले होते. त्यांना शिक्षा ठोठावण्याचा वि॰॰॰ सोडून द्यावा लागेल, अशी स्पष्ट चिन्हे दिसू लागली होती. त्या तिघांच्या कायदेशीर बचावासाठी उत्स्फूर्तपणे निधी जमवला जाऊ लागला होता. वातावरणातील या बदलाची चाहूल लागल्यामुळेच काँग्रेस संघटनेने पुढाकार घेऊन नामांकित वकिलांचे एक पथक त्या खटल्यातील आरोपींच्या






बचावासाठी स्थापन केले होते. त्या खटल्यातील कामकाजाच्या वेळी जवाहरलालजींनी वकिलाचा काळा डगला चढवून त्या पथकातील त्यांचा सहभाग सूचित केला होता. त्यामुळे सत्तासूत्रे हाती आल्यावर 'त्या' अपघाती निधनाच्या बातमीचा छडा लावण्यासाठी ते आकाशपाताळ एक करतील अशी स्वाभाविक अपेक्षा होती.

प्रत्यक्षात मात्र जवाहरलालजींनी तसे काहीही केले नाही. त्या खटल्यामध्ये सुद्धा त्यांचा सहभाग केवळ दाखवण्यापुरताच होता. भुलाभाई देसाई यांनी सुभाषचंद्रांबरोबरचे आपले सारे जुने मतभेद बाजूला सारून राष्ट्रीय कर्तव्य म्हणून ज्या पद्धतीने आझाद हिंद फौजेच्या त्या तिघा अधिकाऱ्यांचा - शाहनवाझ खान, जी एस धिल्लाँ आणि प्रेम सहगल यांचा बचाव केला, तो प्रभावी तर होताच, पण आंतरराष्ट्रीय कायद्याचा कीस काढून, आझाद हिंद फौजेने पुकारलेले युद्ध म्हणजे साम्राज्यवादी ब्रिटनविरुद्धची बंडखोरी नव्हती, तर आपल्या देशाचे स्वातंत्र्य कमावण्यासाठी उभारलेला न्याय्य लढा होता, हे सिद्ध करणारा तो एक ऐतिहासिक पराक्रमच होता. आपल्या ढासळत्या तब्येतीची पर्वा न करता भुलाभाईंनी पार पाडलेल्या त्या कामगिरीच्या पार्श्वभूमीवर जवाहरलालजींचा दिखाऊ सहभाग खटकण्यासारखाच होता.[१]

सुभाषचंद्रांचे विमान कोसळले त्या ठिकाणी प्रत्यक्ष भारतीय चौकशीपथक पाठवण्यात अडचणी होत्या म्हणे! कोणत्या, तर फोर्मोसा बेटावर ज्या राष्ट्रीय चीनचा ताबा होता, त्याच्या सरकारबरोबर आपल्या भारताचे राजनैतिक संबंधच नव्हते. ते होते साम्यवादी चीनशी. तथापि जपानमार्फत वा अँग्लो- अमेरिकन मित्रांमार्फत तरी तशी चौकशी करवणे आणि न्यायवैद्यक शास्त्रातील तज्ज्ञ व्यक्तींची मदत घेऊन 'त्या' घटनेच्या सत्यासत्यतेची पारख करणे त्यांना शक्य होते. सुभाषचंद्र हयात असण्याची शक्यता लक्षात घेऊन तपास केला जाण्याचीही गरज होती. मांचुरियामार्गे सोव्हिएत युनियनमध्ये जाण्याचा त्यांचा इरादा होता, या उपलब्ध माहितीच्या आधारे वस्तुस्थितीचे धागेदोरे उलगडत जाण्याचीही आवश्यकता होती. तथापि असा काही तपास करणे, 'तो' अपघात खरोखरच झाला असेल, तर नेताजींच्या जपानमध्ये ठेवलेल्या अस्थी सन्मानपूर्वक भारतात आणणे आणि जर तो अपघात झाला नसेल, तर नेताजींचे पुढे काय झाले, याचा शोध घेऊन ते जिथे कुठे असतील, तिथून त्यांना सन्मानपूर्वक भारतात आणणे या विविध कर्तव्यांपैकी जवाहरलालजींनी कशाचेच पालन केले नाही; उलट अधिकृतपणे या वादाला पूर्णविराम देण्याची तत्परता मात्र दाखवली. भारतीय संसदेत या प्रकरणी वेळोवेळी विचारल्या गेलेल्या प्रश्नांना उत्तर देताना त्यांनी "सुभाषचंद्र बोस 'त्या' अपघातात निधन पावल्याबद्दल आपल्या मनात कोणतीही शंका राहिलेली नाही आणि त्याबद्दल कसल्याही प्रकारची चौकशी केली जाऊ शकणार नाही," असे स्पष्टपणे सांगितले होते.

तथापि हा विषय जनतेच्या मनातून दूर सारला जाणे कठीणच होते. नेताजी हयात असल्याबद्दलच्या बातम्या अधूनमधून प्रसिद्ध होतच राहिल्यामुळे त्यांच्या 'त्या' अपघाती मृत्यूबद्दलचे गूढ अधिकाधिक गडदगहिरे होत चालले होते. सुभाषबाबूंच्या चाहत्यांच्या कलकत्त्यामधील एका सभेमध्ये 'सरकारतर्फे नसेल तर नसेल, निदान एखाद्या बिगरसरकारी चौकशी समितीतर्फे तरी नेताजींच्या गूढ मृत्यूची चौकशी केली जावी,' असा ठराव संमत झाला. नेताजी स्मारक समितीतर्फे डॉ. राधाविनोद पाल या आंतरराष्ट्रीय ख्यातीच्या न्यायविशारदांची मदत घेतली जाईल, अशी चिन्हे दिसू लागली. युद्धोत्तर काळात जपानी सेनानींविरुद्ध भरलेल्या, 'टोकियो ट्रायल्स' म्हणून गाजलेल्या खटल्यात न्यायपीठावर बसलेले डॉ. पाल हे एकमेव न्यायाधीश असे होते की, दोस्तांना हवा असणारा निकाल त्याच पद्धतीने जाहीर करायला त्यांनी ठामपणे नकार दिला होता. 'ते जपानी सेनानी युद्धगुन्हेगार नाहीत आणि जर त्यांना तसे मानायचे असेल, तर अनेक देशांमध्ये वसाहती स्थापून तेथे बेकायदेशीरपणे राज्य करणाऱ्या युरोपीय साम्राज्यवादी देशांच्या सेनानींनासुद्धा, युद्धगुन्हेगारच मानावे लागेल,' असे त्यांनी स्पष्ट केल्यामुळे जपानमध्ये त्यांची लोकप्रियता शिगेला पोचली होती. त्यांच्याच अध्यक्षतेखाली बिगरसरकारी चौकशी समिती नेमली गेली, तर जपानी सरकारकडून तिला सर्व प्रकारचे सहकार्य मिळेल, हे

स्पष्ट होते. स्मारक समितीच्या त्या सभेचे अध्यक्षस्थान शाहनवाझ खान यांनीच भूषवले होते. ते त्यावेळपर्यंत जवाहरलालजींच्या गोटात जाऊन सामील झाले होते.त्यांच्याकडून जेव्हा जवाहरलालजींना बिगरसरकारी चौकशी समिती नेमली जाण्याची शक्यता समजली, तेव्हा मात्र त्यांनी तातडीने पावले उचलली आणि सरकारी स्तरावर चौकशी समिती नेमण्याची तयारी आरंभली.

जवाहरलालजींचे हे मतपरिवर्तन झाले तरी कसे? बिनसरकारी चौकशी समिती नेमली जाऊ नये आणि तिच्याकडून सत्य शोधले जाऊ नये, या अंतस्थ हेतूनेच त्यांनी सरकारी समिती नेमण्याचा तो घाट घातलाअसावा. कारण त्यांनी शाहनवाझ खान यांनाच त्या समितीचे अध्यक्ष बनवले. एच. एन. मैत्र या एका सनदी अधिकाऱ्याला त्या समितीवर नेमले आणि बोस घराण्याचे प्रतिनिधी म्हणून नेताजींचे बंधू सुरेशचंद्र बोस यांची नियुक्ती करण्यात आली. वरवर पाहता चौकशी समिती नेमण्याचा हा सारा खटाटोप यशस्वी झाला आणि जवाहरलालजींना जसे पूर्वीपासूनच वाटत होते, त्याप्रमाणे सुभाषबाबू 'त्या' अपघातात खरोखरच मरण पावले, असा निष्कर्ष त्या समितीने काढल्यामुळे प्रकरणावर कायमचा पडदा पडला, असे चित्र निर्माण झाले.

तथापि अल्पावधीतच त्या त्रिसदस्यीय समितीचे एक सभासद आणि बोस कुटुंबाचे समितीवरील प्रतिनिधी असणाऱ्या सुरेशचंद्रांनी आपले भिन्न मत व्यक्त करणारा अहवाल प्रसिद्ध केला आणि जवाहरलालजींच्या प्रेरणेने व प्रोत्साहनाने केला गेलेला चौकशीचा फार्स सपशेल फसल्याचे उघडकीस आले. सुरेशचंद्रांना चौकशी समितीने सदस्यत्व स्वीकारण्याची विनंती करणाऱ्या पत्रात 'नेताजींच्या अदृश्य होण्याच्या परिस्थितीची चौकशी अपेक्षित असल्याचा' उल्लेख होता, परंतु जेमतेम दीड महिन्याने पाठवलेल्या पत्रात 'नेताजींच्या मृत्यूबद्दलची चौकशी अपेक्षित असल्याचे' म्हटले होते. 'नेताजी मरण पावले आहेत,' या सरकारी निष्कर्षाला पुष्टी देणारे तेवढेच पुरावे गोळा करण्याचे आणि त्या पुराव्यांच्या आधारे एक पूरक अहवाल तयार करण्याचे काम या चौकशी समितीने पार पाडावे, अशीच जवाहरलालजींची अपेक्षा होती. शाहनवाझ खान आणि एस. एन. मैत्र या दोघांनी ती पुरी करायचे ठरवले असावे; पण सुरेशचंद्र बोस हे या फार्समध्ये सहभागी व्हायला तयार नाहीत, हे स्पष्ट झाल्यावर भारत सरकारने त्यांना किती आणि कसकसा त्रास दिला, ते त्यांनी आपल्या स्वतंत्र अहवालात अगदी तपशीलवार नोंदवले असल्यामुळे [१०] जवाहरलालजींच्या प्रतिष्ठेचे काचपात्र चांगलेच तडकले. पुढे कधीही ते सांधले गेले नाहीच.

देशबाह्य शत्रूंशी सौजन्याने वागणाऱ्या जवाहरलालजींनी देशांतर्गत सत्तास्पर्धेत प्रतिस्पर्धी ठरू शकणाऱ्या सुभाषचंद्रांबाबत मात्र अनाकलनीय दुस्वास बाळगला. 'ते स्टालिनच्या कैदेत, सायबेरियातील एका तुरुंगात खितपत पडले आहेत, अशी बातमी कानांवर आल्यानंतरही अस्वस्थ झाले नाहीत, त्यांना सोडवून आणण्यासाठी राजनैतिक स्तरावर शक्य ते सर्व प्रयत्न करण्याची तत्परताही त्यांनी दाखवली नाही. 'जयहिंद' या नेताजींनी लोकप्रिय केलेल्या घोषणेचे एका परीने त्यांनी अपहरण केले; ती स्वीकारली, आपल्या सार्वजनिक भाषणानंतर तिचा सामूहिक उद्घोष करवून घेण्यात त्यांनी कधी कमीपणा मानला नाही; पण त्या घोषणेच्या मूळच्या उद्गात्याला मात्र त्यांनी वाळीत टाकले. आझाद हिंद फौजेच्या सैनिकांना स्वातंत्र्यसैनिक मानायलासुद्धा नकार दिला, मग त्यांना स्वतंत्र भारताच्या सैन्यात सामावून घेणे तर दूरच राहिले पुढे १९७२ साली त्यांच्या कन्येने-प्रियदर्शिनी इंदिरा गांधींनी- आझाद हिंद फौजेतील माजी सैनिकांना स्वातंत्र्यसैनिक म्हणून मान्यता दिली, तेव्हा त्या अन्यायाचे अंशतः परिमार्जन झाले. पण...

पण जवाहरलालजींच्या गुलाबी व्यक्तिमत्त्वाची ती काटेरी बोच देशबांधवांना छळत राहिली, ती कायमचीच! जवाहरलालजींच्या भूमिकेचे समर्थन करणे अशक्य व्हावे, असेच हे सुभाषबाबूंच्या मृत्यूचे अजूनही नीट न उलगडले गेलेले गूढ आहे, हे मात्र निःसंशय!

**संदर्भ :**

1. Nehru: the Making of India--M.J.Akbar, P. 202.

2. तत्रैव.

३. गांधीजी आणि नेहरू पितापुत्र यांच्यात आधी असणारा अंतर्विरोध हळूहळू कसा मावळत गेला, त्यांच्यात सख्य





कसे निर्माण झाले, मोतीलालजींच्या निधनानंतर जवाहरलालजींना आपल्या गोटात खेचण्यासाठी गांधीजींबद्दलच्या इतरही अनेक प्रश्नांची उत्तरे देणारा पत्रव्यवहार अगदी प्रारंभी गुलदस्त्यात होता; तथापि हळूहळू या ना त्या निमित्ताने तो प्रकाशात येत गेला. अकबर यांनी लिहिलेल्या नेहरूंच्या किंवा सीतांशू दास यांनी लिहिलेल्या सुभाषचंद्र बोस यांच्या चरित्रग्रंथांमध्ये तर त्या पत्रव्यवहाराचे असंख्य संदर्भ सापडतातच, परंतु 'Fragments of History: India's Freedom Movement And After' या एच. एन. पंडितांसारख्या पत्रकाराने लिहिलेल्या पुस्तकातील 'Conflict over Nehru's Socialism' आणि 'When Gandhi punished Nehru' यांसारख्या प्रकरणांमधूनही त्या पत्रव्यवहाराचे दाखले देत काँग्रेसमधील सत्तासंघर्षावर प्रकाशझोत टाकलेला आढळतो. (पृष्ठे ३६ ते ४२ व ५७ ते ६६).

४. 'वल्लभभाई पटेल : चरित्र व काळ' त्र्यं. र. देवगिरीकर यांच्या भारत ग्रंथमालेने प्रकाशित केलेल्या या पुस्तकातील ५१ व्या प्रकरणाचे शीर्षकच मुळी 'विधेयकाला नाव स्वातंत्र्य; पण होते वसाहत स्वराज्य'असे आहे. पृ. ३०७ ते ३१८.

५. तत्रैव. पृ. ३१३.

६. जवाहरलाल नेहरूंच्या सहीचे ते पत्र मथाई यांच्या 'Reminiscences of the Nehru Age' या पुस्तकात जसे उल्लेखलेले आढळते, तसेच इतरही अनेक पुस्तकांमध्येही त्याबद्दलची सविस्तर चर्चा आढळते. उदा., 'Partition, Bengal and After : The Great Tragedy of India' या कालिप्रसाद मुखोपाध्याय यांच्या पुस्तकात परिशिष्ट सातवे म्हणून त्या पत्राची छायाप्रत छापलेली आढळते. माझ्या लेखासोबत दिलेली प्रत त्या परिशिष्टावरूनच घेतलेली आहे. शिवाय भारतातील सत्तांतराचे स्वरूप ठरवले जात असताना ब्रिटिश राष्ट्रकुलातील एक सदस्य म्हणूनच या देशाने पुढेही राहावे, यासाठी लॉर्ड माउंटबॅटन यांच्यापासून क्लीमंट ॲटली यांच्यापर्यंत सारे ब्रिटिश मुत्सद्दी कसे प्रयत्नशील होते आणि काँग्रेस कार्यकारिणीतील संपूर्ण सार्वभौमत्व जाहीर करू इच्छिणाऱ्या गटाला शह देण्यासाठी त्यांनी जवाहरलाल नेहरूंचा कसा उपयोग करून घेतला, याबद्दल सविस्तर, सप्रमाण विवेचन करणारी पुस्तकेही तीस-चाळीस वर्षांपूर्वीपासून उपलब्ध आहेतच. उदा., 'Making The New Commenwealth' , 'Escape from Empire : The Attlee Government and the Indian problem' ही आर. जे. मूर यांची पुस्तके.

७. सुभाषचंद्र बोस यांच्या जीवनातील या घडामोडी विस्ताराने समजून घ्यायच्या असतील, तर त्यांची चरित्रे पाहावी लागतात. साधारणतः त्यांच्या कोणत्याही विस्तृत चरित्रात या बाबींचा तपशीलवार उल्लेख असतोच. आणि यातल्या एकेका घडामोडीबाबतही वेगवेगळ्या पुस्तकांमधून भरपूर माहिती मिळू शकते. 'सुभाषकथा' (आचार्य अत्रे), 'नेताजी' (वि. स. वाळिंबे), 'कथा सुभाषचंद्रांची' आणि 'कथा नेताजींची' (य. दि. फडके) ही उदाहरणादाखल काही नावे.

८. सुभाषचंद्रांच्या अपघाती मृत्यूबद्दलची माहिती जशी त्यांच्या चरित्रांमधून मिळते, तशीच ती त्या मृत्यूची चौकशी करण्यासाठी नेमलेल्या नील चौकशी समित्यांच्या आयोगांच्या अहवालांवरूनही मिळते. शिवाय 'India's Biggest Cover-up' किंवा 'Back from the Dead' यांसारख्या अनुज धर यांच्या पुस्तकांमधूनही धक्कादायक तपशील सापडतात. नेहरूंच्या कारकीर्दीपासून सुरू झालेल्या लपवाछपवीच्या बड्या कारस्थानाचा, कागदपत्रांमधील अफरातफरीचा, फायली गायब होण्याचा किंवा जाळल्या जाण्याचा, देशी अभ्यासकांना परदेशी अभिलेखागारांमध्ये मुक्त प्रवेश मिळवून देण्याबाबतच्या सरकारी अनास्थेचा पाढा वाचता येतो.

९. लाल किल्ल्यातील त्या खटल्याबद्दलची हिंदी-इंग्रजी पुस्तके चाळली, तर भुलाभाई देसाई यांच्या युक्तिवादाच्या भाषणांचा भरपूर तपशील मिळतो. जवाहरलालजींनी कधी त्या तिघा आरोपींच्या बचावासाठी न्यायालयात युक्तिवाद केल्याचे मात्र आढळत नाही. त्यांच्या संकलित वाङ्मयाच्या खंडांमध्येही तशी भाषणे आढळत नाहीत.

१०. सुरेशचंद्र बोस यांचा भिन्न निष्कर्ष मांडणारा अहवाल १९५६ साली त्यांना स्वतःलाच प्रकाशित करावा लागला होता. जवाहरलालजींचे संशयास्पद व आक्षेपार्ह धोरण जगाच्या वेशीवर टांगणाऱ्या या दुर्मीळ अहवालाच्या

परिशिष्ट 'ए' मध्ये सुरेशचंद्रांनी जवाहरलालजींना २ एप्रिल १९५६ रोजी पाठवलेले संपूर्ण पत्र छापले आहे. तेवढे वाचले, तरी सरकारचे हितसंबंध स्पष्ट होतात आणि ते स्वच्छ, सरळ व पारदर्शी नसल्याचे जाणवल्यामुळे जवाहरलालजींच्या प्रतिमेला तडा जातो.



# नेहरूंचे डिस्कवरी ऑफ इंडिया

अशोक कृष्णाजी जोशी

पंडित जवाहरलाल नेहरू हे भारताचे पहिले पंतप्रधान. वैश्विक व भविष्यवेधी दृष्टी असणारे, उज्ज्वल भारताचा ध्यास घेतलेले दूरदर्शी राजकारणी, बऱ्याच विषयात रस व गती असणारे, अगदी क्वचित हे गुण ज्यांच्यात एकवटलेले होते असे दुर्मीळ व्यक्तिमत्त्व असलेले म्हणून नेहरू प्रसिद्ध आहेत. संस्कारक्षम वयातच त्यांना अनेक वर्षे पाश्चिमात्य देशांत शिक्षण मिळाले. पाश्चात्त्य जीवनशैलीची जवळून ओळख झाली. भारतीयांतले दारिद्र्य, अज्ञान, अंधश्रद्धा वगैरे अनिष्ट गोष्टी दूर व्हाव्यात असे त्यांना मनापासून वाटत होते. भारताला स्वातंत्र्य मिळावे यासाठी त्यांनी अथक प्रयत्न केले व नवभारताच्या उभारणीसाठी पंतप्रधान म्हणून त्यांनी विज्ञान, कला, संस्कृती या सर्वच गोष्टींची पायाभरणी केली हे सर्वमान्यच आहे.

भारताची अस्मिता, एकता, इथे इतिहासकालात झालेल्या कला व संस्कृती क्षेत्रातील घटना, इथली बौद्धिक परंपरा, इथल्या समाजाची धार्मिक रचना या सर्व गोष्टींचा सम्यक् व गंभीर विचार नेहरूंनी केला होता. भारताचे अत्यंत जबाबदार पुढारी, भाग्यविधाता म्हणून आपण हे करीत आहोत याची त्यांना जाणीव होती. भारताला विज्ञान-तंत्रज्ञानात, कला व सांस्कृतिक क्षेत्रात भविष्यात फार प्रगती करायची आहे याचीही त्यांना जाणीव होती. स्वातंत्र्यपूर्वकाळात ते स्वातंत्र्यसैनिक म्हणून कार्यरत होते. गर्भश्रीमंत असूनही चैनीत आयुष्य न घालवता आपले सारे आयुष्य त्यांनी देशाकरिता घालवले. नऊ वर्षे ते तुरुंगात राहिले. मग स्वतंत्र भारताचे ते पहिले पंतप्रधान झाले. भारताचे भविष्य सर्वच क्षेत्रात उज्ज्वल व्हावे असा ध्यास आयुष्यभर त्यांनी घेतला होता. ते इंग्रजीत उत्तम लिखाण करू शकत होते. पण त्यांना मोकळा वेळ फारच कमी मिळत होता. त्यांचे सारे लिखाण तुरुंगातच झाले. त्यांची तिन्ही पुस्तके तुरुंगातच लिहिली गेली.

*द डिस्कवरी ऑफ इंडिया* हे प्रस्तुतचे पुस्तक अहमदनगर किल्ल्यातल्या तुरुंगवासात त्यांनी लिहिले व डिसेंबर १९४५ मध्ये ते प्रसिद्ध झाले. त्यांच्याबरोबर फार मोठे व्यक्तिमत्त्व असलेले मौलाना अबुल कलाम आझाद, गोविंद वल्लभ पंत, नरेंद्र देव, असफ अली असे अनेक मोठे पुढारी राजकीय कैदी होते; तसेच अगदी सामान्य राजकीय कैदीपण त्यांच्याबरोबर होते. त्या सर्वांच्या सहवासाचा नेहरूंना हे पुस्तक लिहिताना उपयोग झाला.

नेहरूंनी आधी राजकीय कैदी म्हणून दुसऱ्या जेल मध्ये असताना दोन पुस्तके लिहिली होती. *ग्लिंप्सेस ऑफ वर्ल्ड हिस्टरी* व *ॲन ऑटोबायोग्राफी* ही ती पुस्तके होत. या पैकी *ग्लिंप्सेस ऑफ वर्ल्ड हिस्टरी* हे त्यांचे पुस्तक लहान इंदिरेला जगाच्या इतिहासाची नीट ओळख व्हावी या उद्देशाने प्रेमळ पित्याने मुलीला लिहिलेल्या पत्रांच्या रूपात लिहिलेले आहे. तर *ॲन ऑटोबायोग्राफी* हे पुस्तक १९३६ पर्यंतची त्यांची जीवनकहाणी त्यांच्याच शब्दांत सांगणारे आहे.

*द डिस्कव्हरी ऑफ इंडिया* हे पुस्तक तुरुंगात जसे लिहिले होते, अगदी तसेच प्रकाशित स्वरूपात ठेवण्यात आले आहे. अनेकदा त्याच्या संहितेत बदल करावे असे नेहरूंना वाटले, पण त्यात कुठलेही बदल करण्यात आले नाहीत. पुस्तक लिहून झाल्यावर ते पुन्हा वाचताना त्यांना वाटले की हे पुस्तक लिहिणारा मी नाही, तर कोणीतरी मला जवळून ओळखणाऱ्या व मला नीट जाणणाऱ्या माणसाने हे लिहिले आहे, त्यातील अनुभव ओळखीचे वाटतात, आपलेच हे जुने रूप असावे असे त्यांना वाटते.

या पुस्तकाला इंदिरा गांधींनी प्रस्तावना लिहिली आहे. त्यावर संस्कार त्यांनीच केले व मुद्रितेही त्यांनीच तपासली. त्यांना नेहरूंविषयी अपार आदर वाटत होता. नेहरूंना वेगळीच आत्मशक्ती होती व ती आत्मशक्ती

अनुक्रमणिका

प्रकाशमान होती असे त्या म्हणतात.

भारताच्या इतिहासाबरोबर या पुस्तकात नेहरूंनी भारताच्या राष्ट्रीय व्यक्तिमत्त्वाचा शोध घेतला आहे असे त्या म्हणतात. मे २००४ मध्ये प्रसिद्ध झालेल्या पुस्तकाच्या प्रस्तुत आवृत्तीला सोनिया गांधींची प्रस्तावना आहे. त्यांनीही नेहरूंची त्यांच्या प्रभावाबद्दल व त्यांच्या कर्तबगारीबद्दल स्तुतीच केली आहे.

संपादक सुनील खिलनानी यांचे २२ पानांचे प्रास्ताविक नेहरूंच्या आत्मकथनानंतर व इंदिरा गांधींच्या फोरवर्ड नंतर असून त्यांनी भारतीय माणसांचे शिक्षण, भारताची एकता, अस्मिता, इतिहास, भारतीय राष्ट्रवाद, भारतीय परंपरा, भारतीयांची कलासक्ती, स्वातंत्र्याची ओढ व या पुस्तकाचे वैशिष्ट्य या सर्वच गोष्टींवर महत्त्वपूर्ण विवेचन केले आहे. ही प्रस्तावना व पुस्तकाविषयी सर्वसाधारण निरीक्षणे इथे नोंदवणे योग्य होईल.

वयाच्या एकोणतिसाव्या वर्षी नेहरू प्रखर राष्ट्रवादी झाले, त्यावेळी ते इंग्लंडमध्ये बॅरिस्टर होऊन भारतात परतले होते. संस्कारक्षम वयातच त्यांचे पंधरा वर्षे इंग्लंडमध्ये वास्तव्य होते. दक्षिण आफ्रिकेत वीस वर्षे राहून १९१५ साली गांधी भारतात परतले होते. महात्मा गांधी व नेहरू या दोघांची व्यक्तिमत्त्वे व विचार मात्र वेगळे होते. गांधींना प्राचीन भारतीय अस्मिता महत्त्वाची वाटत होती, तर नेहरूंना विज्ञानयुग, तंत्रज्ञान, आधुनिकता व बुद्धिप्राधान्यता आवडत होती. असा फरक असतांनाही नेहरूंनी गांधींचे शिष्यत्व पत्करले कारण गांधींची आध्यात्मिकता, धार्मिकता, भारताविषयीची तळमळ वेगळी व उच्च प्रतीची होती. भारतातल्या अनेकतेत एकता पाहाणे हे दोघांनाही श्रेयस्कर वाटत होते. अनेक प्रदेश, अनेक धर्म व अनेक संस्कृतींच्या या देशात जी एकता आहे ती दोघांना विलोभनीय वाटत होती. भारतीय अस्मिता व भारताची एकता म्हणजे काय याचा शोध नेहरूंनी या पुस्तकात घेतला आहे, तसाच शोध गांधींनी आयुष्यभर प्रत्यक्ष जीवनात घेतला होता.

गांधींप्रमाणेच रवींद्रनाथ टागोर हे वैश्विक दृष्टीचे होते व सौंदर्यपूजक म्हणून त्या काळातच ते प्रसिद्ध होते. नेहरूंवर त्या दोघांच्या जीवनदृष्टीचा परिणाम झाला होता. विचार व कृती यांचा संगम राजकारणात आहे असे नेहरू मानत होते. भारताची एक प्रतिमा त्यांच्या मनात होती. वसाहतवादानंतरचा भारत कसा असावा याचे स्वप्न ते मनात ठेवत होते. वसाहतवाद व वंशवाद संपत आला असून मानवता, वैश्विकता या जागतिक संदर्भातच भारतीय राष्ट्रीयत्व व भारतीय स्वातंत्र्याचा विचार होणे आवश्यक आहे याचे भान त्यांना होते. भारताला आपणच राजकीय एकता बहाल केली असेही काही ब्रिटिश राज्यकर्त्यांचे मत होते. भौगोलिक एकता भारतात नांदण्याचे कारण त्यांचीच राजवट होय असे त्यांना वाटत होते (व काही प्रमाणात आजही त्यातल्या काहींचे तेच मत आहे). नेहरूंनी ते मत सप्रमाण खोडले व भारताची एकता फार प्राचीन आहे हा दावा केला. पण हे करताना भारताच्या अखंडतेच्या आड येणाऱ्या विषम सामाजिक व्यवस्थेचे, जातव्यवस्थेचे, निर्मितीक्षमता व जिज्ञासाविरोधी अकार्यक्षम घटकांचे त्यांना विस्मरण झाले नाही. सांस्कृतिक, बौद्धिक, सामाजिक व आर्थिक प्रगतीआड येणाऱ्या या गोष्टींवर त्यांनी टीका केली आहे.

आधुनिक भारताचा धागा प्राचीन भारतीय संस्कृतीशी जोडलेला आहे. अगदी प्राचीन सिंधुसंस्कृतीशी आपण जोडलेले आहोत अशी स्वागतार्ह जाणीव नेहरूंच्या लिखाणात, बोलण्यात व वागण्यात आढळत होती याचेच प्रत्यंतर हे पुस्तक देते. नेहरूंची दृष्टी एक्स्क्लुझिविस्ट नव्हती - म्हणजे हे टाळावे, हे आमचे लोक नाहीत, हे आमचे विचार नाहीत — असे त्यांना वाटत नव्हते. भारतातल्या सर्व परंपरा, श्रद्धा, कल्पना विचारात घेऊन, त्यातल्या बऱ्या-वाईट गोष्टींचे विश्लेषण करून योग्य ते घ्यायचे अशी त्यांची भूमिका होती. भारतातले वैविध्य त्यांना स्वागतार्ह वाटत होते, त्याला एका पुडीत किंवा एका वेष्टणात बांधून एक काल्पनिक एकता तयार करणे त्यांना मानवणारे नव्हते. भारत हा अनेक व्यक्तींचा व समूहांचा, अनेक संस्कृतींचा बनलेला देश आहे, त्यात विचारांची व भावनांची अनेक विश्वेच सामावलेली आहेत, अनेक नद्यांचा तो समुद्र आहे अशी जाणीव त्यांना होती. भारतात एकाच वेळी जुनाट कल्पना व उदारमतवाद नांदत आहे व अशा भारताला आधुनिक बनवायचे आहे; हे काम फारच अवघड आहे हे त्यांना

नीट समजले होते.

पाश्चात्त्यकल्पनाकेंद्रित दृष्टी न घेता त्यांनी भारतकेंद्रित दृष्टी अवलंबली हे खरे असले तरी भारतातले सर्व समर्थनीय होते व आहे असे ते मानत नव्हते. परंपरांचे गुणावगुण पारखून घेऊनच बरे-वाईट ठरवता येते असे ते मानत होते. सर्व चांगल्या गोष्टी ग्रीक परंपरेतून आल्या आहेत असा ग्रीक संस्कृतीचा पाश्चात्त्यांनी केलेला उदो उदो त्यांना मान्य नव्हता. भारतीय संस्कृतीची प्राचीनता, विविधता, तीमधले श्रेष्ठ सांस्कृतिक, बौद्धिक व कलात्मक अंश त्यांना विलोभनीय वाटत होते. प्राचीन ग्रीकसंस्कृती प्रमाणेच प्राचीन भारतीय संस्कृती श्रेष्ठ संस्कृती आहे, असे मत त्यांनी व्यक्त केले आहे. वैश्विक दृष्टी असलेल्या नेहरूंना असे वाटत होते हे स्वागतार्ह होते.

या पुस्तकाच्या स्वरूपाविषयी लिहिताना संपादक सुनील खिलनानी म्हणतात की हे पुस्तक अनेक वाङ्मय प्रकारांचे मिश्रण आहे; त्यात वैयक्तिक, स्मृतिपर, राजकीय भाष्याच्या स्वरूपाचा भाग, तात्त्विक व चिंतनात्मक भाग आहेत; तसे वाङ्मयीन चिंतनाने भरलेले अनेक भाग आहेत. पुस्तकाची शैली प्रसन्न असून भारतीय इंग्रजी साहित्यातले हे महत्त्वाचे पुस्तक मानावे लागेल.

*द डिस्कव्हरी ऑफ इंडिया*मध्ये नेहरूंनी अगदी प्राचीन काळापासून ते पुस्तक लिहिले गेले त्या काळापर्यंतचा भारताचा इतिहास दिला आहे व भारतीय अस्मिता या गूढाचा त्यात शोध घेतला आहे. अगदी सुरुवातीला इंग्लंडहून परतल्यावर समकालीन भारत व भारतीय परंपरा त्यांना पुरेशी ओळखीची न वाटणे अगदी स्वाभाविक होते. भारताची नीट ओळख करून घेणे, नव्याने ओळख करून घेणे आवश्यक आहे असे त्यांना ब्रिटन मधून परतल्यावर वाटणे स्वाभाविकच होते. पाश्चिमात्य जीवनशैली संस्कारक्षम वयात बरीच वर्षे अंगवळणी पडल्यावर भारताचा, भारतीय अस्मितेचा नव्याने शोध घेणे योग्यच होते. शिवाय नेहरू घराणे कश्मिरी होते, कश्मीरचा मुख्य भारतीय उपखंडाशी संपर्क मर्यादितच होता. नेहरू घराणे अलाहाबाद मध्ये स्थायिक झाले असले तरी या श्रीमंत घराण्याचा, प्रथितयश वकील घराचा संबंध सर्वसामान्य भारतीय संस्कृतीशी व भारतीय परंपरेशी किती असेल हा विचार करण्यासारखा प्रश्न आहे.

आपल्या वाचनाने व अनेक जाणत्या लोकांकडून माहिती घेऊन, चर्चा करून, प्रवास करून नेहरूंनी हा शोध घेतला आहे. तुरुंगातल्या त्यांच्या ९ वर्षांच्या कारावासात त्यांना अनेक जाणकार साथी भेटले व भारताची ओळख त्यांना नीट झाली. ह्या पुस्तकात ती ओळख स्पष्ट होते, व्यक्त होते.

अगदी सिंधू संस्कृतीपासून त्यांनी प्राचीन भारताचा विचार केला आहे. परिस्थितीशी, वातावरणाशी जुळवून व बिकट परिस्थितीत टिकून राहणे हे भारतीय संस्कृतीचे विशेष आहेत असे त्यांना वाटते. गंगा, हरिद्वार, कुंभमेळा यांच्या आठवणीने ते सद्‌गदित होतात. आपण या भारताचे भाग आहोत ही जाणीव असतानाच, पाश्चिमात्य संस्कृतीशी असलेली आपली प्रदीर्घ ओळख, पाश्चिमात्य शिक्षण व संस्कार हे घटक आपल्या भारताच्या ओळखीला जसे वस्तुनिष्ठ वळण देतात, तसे काही प्रमाणात ते घटक अडथळाही ठरतात हे त्यांना नीट समजले आहे. भारताची ही ५-६ हजार वर्षे जुनी व मोहेंजोदारो व हराप्पा पासून सातत्य असलेली संस्कृती टिकून राहिली आहे व प्रदीर्घ काळ टिकलेली ती एकमेव संस्कृती आहे याची जाणीव नेहरूंना आहे. या संस्कृतीचे बळ, तिचे बलस्थान समजावून घेणे त्यांना महत्त्वाचे वाटते. एक नवा दृष्टिकोनच त्यांना प्राप्त होतो. भारताकडे नव्याने पाहायची दृष्टी त्यांना मिळते. असा प्रबुद्धतेचा अनुभव फार क्वचित ठिकाणी आढळतो.

नेहरू स्वातंत्र्यसैनिक होते, पण त्यांचा भारतीय राष्ट्रवाद संकुचित नव्हता. त्या राष्ट्रवादाला नैतिक व आध्यात्मिक बाजू होती. त्यांच्या कल्पनेतली भारतीय परंपरा जागतिक परंपरेचा भाग होती, तिचे एक अविभाज्य अंग होती. सर्व भारतीयांत एक प्रकारची एकता आहे अशी त्यांची धारणा होती. भारताचा भूतकाळ शोधत असताना भारताचे भविष्य नेहमीच त्यांच्यासमोर होते. भूतकाळाच्या बंधनात व त्याच्या रंजक आठवणीत भारतीयांनी अडकून पडावे असे त्यांना वाटत नव्हते.

आंतरराष्ट्रीय संदर्भातच भारतीय राष्ट्रवाद पाहिला पाहिजे व आंतरराष्ट्रीय संदर्भातच भारतीय अस्मिता

शोधली पाहिजे, व्याख्यित केली पाहिजे असे त्यांचे मत होते. त्यांचा आशियन अस्मितेचा मुद्दा याच दृष्टीने पाहिला पाहिजे. नासर, सुकार्नो किंवा सुकर्ण यांच्या बरोबर अलिप्त राष्ट्रांची फळी उभी करण्याचा त्यांचा प्रयत्न व शीतयुद्धाच्या त्या काळात चीन बरोबर मैत्री करण्याचा त्यांचा फसलेला प्रयोग या संदर्भातच पाहिला पाहिजे. साम्यवादाचे व त्यातल्या मानवतावादी व समतावादी विचारांचे त्यांचे आकर्षण भारतातल्या व आशिया, आफ्रिका खंडातल्या देशातल्या लोकांच्या दारिद्र्यासंदर्भात पाहणे आवश्यक आहे

(२)

**भारताचा प्राचीन इतिहास व नेहरू**

माझ्यासमोर २०१० मध्य पेन्विन प्रकाशनाने दिल्लीला प्रसिद्ध केलेली भारतीय आवृत्ती आहे. पुस्तकाच्या या आवृत्तीला ६३४ पाने आहेत. त्यातील ३८९ पाने नेहरूंनी न पाहिलेल्या भारताच्या भूतकाळाविषयी आहेत, तर २४५ पाने नेहरूंनी प्रत्यक्ष भाग घेतलेल्या काळाविषयी व त्यातील घटनांविषयी आहेत.

नेहरूंनी भारताच्या गतैतिहासाकडे पाहताना तीन गोष्टींच्या संदर्भात जी भूमिका घेतली आहे तीवर टीका झाली आहे.

१) बुद्ध धर्म, २) मोगल काल व एकूणच मुस्लीम शासनकाल, ३) सम्राट अशोक व अकबर यांचे त्यांना असलेले आकर्षण.

या तीनही संदर्भाचा इथे अगदी थोडक्यात विचार करू.

१) बुद्ध धर्माचे त्यांना महत्त्व वाटत होते याचे कारण बुद्धाने शांततेचा संदेश दिला होता व शीतयुद्धाच्या वातावरणात तो संदेश योग्यच होता. दुसरे कारण असे असावे की बुद्धधर्माचा जो सर्वदूर प्रसार झाला तो तलवारीच्या बळावर झाला नाही. तो मन वळवण्याच्या मार्गाने व शांततेने झाला. तिसरे कारण असे असावे की बुद्धाने समतेची, इहवादाची, समृद्धीची व प्रेमाची शिकवण दिली; जीवनातल्या स्वयंशिस्त व चांगुलपणावर भर दिला; वास्तव स्थिर नसते, ते सतत बदलत असते असे मांडल. बुद्धतत्त्वज्ञानात माणसाची एकता हीच भ्रमस्वरूप आहे असे म्हटले आहे, माणसाने मुक्ती या कल्पनेमागे लागू नये असे आग्रहाने सांगितले आहे. नेहरूंना हे तत्त्वज्ञान आकर्षक वाटणे स्वाभाविकच होते.ते नेहरूंच्या काळात विशेष लोकप्रिय असणाऱ्या अस्तित्ववादी तत्त्वज्ञानाला अगदी जवळचे आहे. (नेहरूंना बुद्ध धर्मातला निराशावाद व अकर्मण्यता आवडत नव्हती हे इथे नमूद करणे आवश्यक आहे.)

२) मोगल काल व मुस्लिम शासनकाल यांच्याविषयी नेहरूंनी घेतलेली भूमिका काही लोकांनी टीकेचा विषय बनवली आहे. मध्ययुगातली शासनव्यवस्था, युद्धविजय, त्यावेळी स्वाऱ्या कशा होत होत्या, माणसांचे स्थलांतर कसे होत असे याची इतिहास अभ्यासक नेहरूंना नीट माहिती होती. ते अभिनिवेश असणारेही नव्हते. इतिहासात धर्मांतरे कशी झाली याचे नीट आकलन त्यांना होते. आपण या धर्माचे का त्या धर्माचे हे कसे ठरवले जात होते याची ऐतिहासिक माहिती असल्याने नेहरूंनी मुस्लिम शासन व मोगल शासन या विषयी एक ठाम भूमिका घेतली होती.

३) बळ असूनही बळाचा वापर धार्मिक गोष्टींसाठी अशोक व अकबर या सम्राटांनी केला नाही याचे नेहरूंना विशेष कौतुक होते. प्राचीन काळ व मध्ययुगातल्या व्यवहाराला धरून त्या सम्राटाचे वागणे नव्हते हे तर त्यांना विशेष आवडले होते. अशोक व अकबर या सम्राटांचे त्यांना असलेले आकर्षण असे निर्माण झाले होते.

(३)

**प्राचीन भारतीय संस्कृती**

भारताला फार मोठी सांस्कृतिक परंपरा असून मोहेनजोदारो, हराप्पा इथले उत्खनन स्पष्ट करते की भारतीय संस्कृती पाच हजार वर्षे जुनी असून सर्वच क्षेत्रात ती संस्कृती समृद्ध होती असे नेहरू ठासून म्हणतात. पाश्चात्त्य देश आपल्याला ग्रीक संस्कृतीची पार्श्वभूमी आहे याबद्दल गर्व बाळगतात. नेहरू भारतीय संस्कृती त्यापेक्षाही जुनी असून ती सर्वच क्षेत्रात समृद्ध होती हे दाखवून देतात. म्हणजे ग्रीक संस्कृतीचा जसा पाश्चात्त्यांना अभिमान आहे, तसाच अभिमान व गर्व भारतीयांना आपल्या प्राचीन संस्कृतीबद्दल वाटावा असे नेहरूंना म्हणायचे आहे. *द डिस्कव्हरी ऑफ इंडिया* या पुस्तकात नेहरूंनी भारताचा इतिहास जसा सांगितला आहे व

भारताचा शोध जसा घेतला आहे, तसेच भारतीयांना आवाहन केले आहे की तुम्ही आपल्या इतिहासाबद्दल अभिमान बाळगला पाहिजे.

भारताची संस्कृती मोहेनजोदारो व हराप्पा इथे उत्खनन केल्याप्रमाणे (बऱ्याच जागी उत्खनन झाले तर त्या संस्कृतीचे आणखी अवशेष मिळतील व आणखीही पुरावे मिळतील) ही संस्कृती मेसपोटेमिअन, इजिप्शिअन व सुमेरिअन संस्कृतीपेक्षा जुनी होती; ती समृद्ध होती; तिचा धर्म प्रगत होता; तिचा इतर संस्कृतींशी संबंध होता; त्यांच्याशी व्यापार होता, ती संस्कृती नांदत होती तिथे दुकाने होती; श्रीमंत व्यापारी होते; कुठल्यातरी मोठ्या नैसर्गिक आपत्तीमुळे ही समृद्ध संस्कृती नष्ट झाली असावी असे नेहरू म्हणतात.

भारतात आर्य या सिंधूसंस्कृतीकाळानंतर आले. त्यांचे स्थानिक असलेल्या द्रविडांबरोबर मिश्रण झाले. वेदनिर्मिती, उपनिषद निर्मिती झाली. मग बुद्धधर्म निर्माण झाला. जैन धर्मही निर्माण झाला. आर्यांच्या षट्दर्शनात आता इतर दशनांची भर पडली होती. बुद्ध व जैन तत्त्वज्ञानही तयार झाले होते.भौतिक तत्त्वज्ञानही निर्माण झाले होते. चार्वाक हा मोठा भौतिकवादी तत्त्वज्ञ याच काळात झाला. कर्माधारित वर्णाश्रम धर्माच्या जागी याच काळात जन्माधारित जात ही संकल्पना येत होती. मग महाकाव्यांचा रामायणकाल व नंतरचा महाभारत काल आला. कुरुक्षेत्रावरच्या कृष्णार्जुनसंवादाची व कर्मवाद सांगणाऱ्या भगवदगीतेची निर्मिती झाली. नंतर पुराणकालही आला. इसवी सन पूर्व ४ थ्या शतकात चंद्रगुप्ताला राजा बनण्यास कौटिल्याने किंवा चाणक्याने मदत केली. चाणक्याने किंवा कौटिल्याने अर्थशास्त्र या प्रसिद्ध ग्रंथाची निर्मिती केली. जातककथा किंवा बुद्धजन्मकथा याच वेळी तयार होत होत्या. हा सगळा निर्मितीचा कालखंड होता व नेहरूंनी या कालाविषयी डिस्कव्हरीमध्ये भरभरून लिहिले आहे.

नेहरूंनी मग भारताच्या या काहीशा ज्ञात असलेल्या प्राचीन इतिहासाविषयी (म्हणजे ज्या काळाविषयी काहीतरी लिखित व ऐतिहासिक पुरावे मिळतात व केवळ तर्कावर अवलंबून न राहता काही ठाम विधाने ज्या काळाविषयी करता येतात असा काळ) सविस्तर लिहिले आहे. मौर्य साम्राज्य, त्या काळातल्या बौद्ध धर्माचा उदय, शुंग साम्राज्य, शक, कुशाण यांचे भारतातले आगमन, हूणांचे भारतात येणे, भारतात आलेले परदेशी प्रवासी व त्यांनी भारताविषयी जे लिहून ठेवले आहे त्याची दखल त्यांनी घेतली आहे. त्यावर भाष्य केले आहे. ग्रीक संस्कृतीची वैशिष्ट्ये, भारत व ग्रीस या मधली त्या काळातली देवघेव या सर्व गोष्टींची नोंद नेहरूंनी घेतली आहे. भारतात प्रतिमापूजन ग्रीकांमुळे आले किंवा ग्रीक संस्कृतीतून आले व देवळांची निर्मिती त्या नंतर झाली हा तपशील (१६१) उल्लेखनीय वाटतो.

भारतातली संस्कृत नाट्यनिर्मिती, नृत्य, वेगवेगळ्या कलांची भारतीयांनी केलेली जोपासना, भरत मुनीचे नाट्यशास्त्र या विषयी त्यांना असलेला अभिमान रास्त आहे. प्राचीन भारतातील न्याय, वैशेषिक, सांख्य, योग, मीमांसा, वेदांत ही षट्दर्शने व बौद्ध आणि जैन तत्त्वज्ञान या भारताच्या समृद्ध वारशाविषयी त्यांना समाधान वाटते. इसवी सनाच्या आधीचा बुद्धधर्म हिंदू किंवा त्यावेळच्या वैदिक धर्माला जवळचा होता हे पण नेहरू नमूद करतात.

मौर्य व गुप्त साम्राज्ये आणि त्यांची वैशिष्ट्ये; हर्षवर्धनाचे साम्राज्य, त्याने मिळवलेले विजय, कलेला त्याने दिलेले उत्तेजन त्यांना प्रशंसनीय वाटते.

शंकराचार्यांबद्दल त्यांनी सविस्तर लिहिले आहे. शंकराचार्यांनी या जगाला माया असे संबोधले तरी स्वतः ते क्रियाशील होते, त्यांनी भारतभर प्रवास केला, भारताच्या चार कोपऱ्यात चार मठ स्थापन केले, भारताची अखंडता त्यांनी जोपासली. संस्कृत भाषा भारतात ज्ञानभाषा कशी होती व भारताची एकता राखण्याचे, भारतीयांत संवाद घडविण्याचे ऐतिहासिक महत्त्वाचे काम तिने कसे केले हे त्यांनी स्पष्ट केले आहे.

भारत व चीनमध्ये व्यापाराबरोबरच सांस्कृतिक देवघेव होत होती याचे पुरावे चिनी प्रवाशांच्या भारत वर्णनातून आपल्याला मिळतात हे सांगून नेहरू भारतातूनच बुद्धधर्म सर्व पूर्व आशियात व चीन सारख्या मोठ्या देशांत गेला हे ऐतिहासिक सत्य आपल्या या पुस्तकात मांडतात.

दक्षिणेतली चोल, पाड्यांची साम्राज्ये, शैलेंद्राचे साम्राज्य यांची दखल घेऊन आठव्या शतकात दक्षिणेतले

राजे कसे समुद्रमार्गे गेले व मलेशिया, श्रीलंका, कंबौडिआ, जावा, सुमात्रा, बोर्निओ, चंपा इत्यादी ठिकाणी त्यांनी आपले साम्राज्य उभारण्याबरोबरच, धर्म व संस्कृतीप्रसार कसा केला होता हे नेहरूंनी दाखवले आहे. अंकोरवटचे मंदिर आजही या सर्वांची साक्ष देते.

भारतीय कलेचे संवर्धन या दक्षिणी राजवटींनी केले. नटराज हे भारतीय कलेतले मध्यवर्ती प्रतीक दक्षिणेतून घेतले आहे. आर्यभट्ट, वराहमिहिर, ब्रह्मगुप्त, भास्कराचार्य, नारायण; त्यांच्या आधी झालेले पाणिनी, पतंजली, आपस्तंभ, कात्यायन हे विद्वान; आयुर्वेद जोपासणारे चरक व सुश्रुत सारखे विद्वान यांचा उल्लेख व त्यांच्या कार्याचे विवेचन नेहरूंनी भारतीय बौद्धिक वारशाचे जतन करणारे सर्व भारतातले विद्वान म्हणून आग्रहाने केला आहे. नेहरूंची भारतीय वारशाची जाणीव कशी विशाल दृष्टीची व सजग होती हे इथे स्पष्ट होते.

धार्मिक, सांस्कृतिक, कलाक्षेत्राबरोबरच विज्ञान-क्षेत्रातही या काळात बरेच सृजनात्मक घडत होते याची दखल नेहरूंनी घेतली आहे. सातव्या शतकात हर्षवर्धनाने या प्राचीन भारतीय संस्कृतीला उर्जितावस्थेस आणले. पण त्याचा प्रयत्न अल्पजीवी ठरला. आता ही संस्कृती वृद्ध झाली होती, ती दुबळी झाली होती, थकली होती, नवीन करण्याची, नवनिर्मिती करण्याची तिची क्षमता क्षीण झाली होती, नवीन प्रवाह व नवीन कल्पनांच्या अभावी तिला पुरेसे खतपाणी मिळेनासे झाले होते. तिचा गुप्तकालाच्या अखेरीस अपरिहार्य असा ऱ्हास सुरू झाला. नेहरूंनी या सर्वच घटनांविषयी फार जिव्हाळ्याने लिहिले आहे. (१९० ते २४१)

(४)

### भारतावरचे मुस्लिम शासन

महम्मदाने इस्लामची स्थापना केल्यावर धर्मप्रसार व राज्यप्रसार यासाठी अरबांनी युरोपवर स्वारी केली. आठव्या शतकातच मुस्लिमांनी काश्मिरवर राज्य स्थापन केले. महम्मद बिन कासिमने दाहीर राजाचा पराभव करून सिंध व कश्मीर घेतले.

इ. स. १००० मध्ये महम्मद गझनीने भारतावर पहिली स्वारी केली व एकूण १७ स्वाऱ्या केल्या. १०२५ मध्ये त्याने सोमनाथाची स्वारी केली. या सर्व स्वाऱ्या लूटीसाठी व धर्मप्रसारासाठी होत्या.

त्यानंतर महम्मद घोरीने भारतावर अनेक स्वाऱ्या केल्या. ११९१ च्या स्वारीत पृथ्वीराज चौहानने त्याला पराजित केले. पण दुसऱ्याच वर्षी राजपुतांच्या आपसातल्या मतभेदांचा फायदा घेऊन त्याने पृथ्वीराज चौहानचा पराजय केला व दिल्लीच्या तख्तावर तो बसला. पण लवकरच तो परत गेला व जाताना त्याने कुतुबुद्दिन ऐबक याला दिल्लीचा शास्ता बनवले. मुस्लिम शासन दिल्लीवर सुरू झाले होते.

गुलाम, खिलजी, सय्यद, सूरी व लोदी हे दिल्लीचे मुगलपूर्व शासनकर्ते ११९४ ते १५२६ या तीन शतकाच्या प्रदीर्घ काळात झाले.

बाबर हा मोगल शासन भारतात सुरू करणारा पहिला बादशाह म्हणून प्रसिद्ध आहे. १५२६ मध्ये त्याने इब्राहिम खान लोदीला पानिपतच्या पहिल्या युद्धात हरवले व मोगल शासन दिल्लीत सुरू झाले. बाबरानंतर त्याचा मुलगा हूमायून राज्यावर आला. त्याला शेरशहा सूरीने हरवले व ५ वर्षांच्या अल्प राज्यकारभारात शेरशहाने सुराज्यकर्ता व कल्पक राज्यकर्ता म्हणून आपली छाप पाडली.

बाबराचा नातू अकबर याने दीर्घकाळ राज्य केले. त्याचा राज्यकाळ ५० वर्षांचा १५५६ ते १६०५ असा होता. साम्राज्यविस्तार, स्वाऱ्या या सम्राटाला शोभेशा गोष्टी त्याने केल्याच पण त्याचबरोबर त्याने सुशासन दिले, कला व संस्कृतीची तसेच विद्वत्तेची कदर केली. त्याच्या दरबारात नवरत्ने म्हणजे नऊ श्रेष्ठ दर्जाचे लोक होते व ते सर्व महत्त्वाच्या गोष्टींचे प्रतिनिधित्व करीत होते. अकबर बिरबलाच्या कथा जनमानसात व लहान मुलांत प्रसिद्ध आहेत. हा अकबर बादशहा सर्वधर्म-विचाराबद्दल प्रसिद्ध आहे. धार्मिक असूनही त्याने सर्व धर्मांची तत्त्वे असणारा दिने इलाही हा पंथ स्थापन केला होता हा त्याचा विशेष नेहरूंना आवडला होता.

अकबरानंतर त्याचा मुलगा सलीम किंवा जहांगीर बादशाह झाला. नंतर अकबराचा नातू शहाजहान हा कलाप्रेमी बादशहा राज्यावर आला, त्याने ताजमहाल ही जगातले एक आश्चर्य मानली जात असलेली वास्तू बांधवली. नंतर राज्यावर आलेला औरंगजेब बादशाहा

आपल्या कट्टर धार्मिकतेबद्दल व सत्तालोभाबद्दलच प्रसिद्ध आहे. त्याने दीर्घकाळ राज्य केले तरी त्याच्या काळातच मोगल सत्ता अशक्त झाली. मराठ्यांनी या सत्तेला जोरदार आव्हान दिले हा इतिहास आहे.

औरंगजेबानंतर मोगल सत्ता नाममात्र स्वरूपात राहिली. दिल्लीचे तख्त भूषविण्याइतपतच मोगल सत्तेचे महत्त्व राहिले. खरे कारभारी मराठे व अगदी काही वेळा सैन्यबळ असणारे रजपूत, रणजीत सिंहासारखे शीख राज्यकर्ते होते. शिवाजी या मराठा सरदाराने मराठी राज्य औरंगजेबाच्या कारकीर्दीतच स्थापले होते व पुढे पेशव्यांच्या राज्यकाळात मराठे साऱ्या भारतावर सैनिक शासन करू लागले.

(५)

### इंग्रज शासन

राजा रणजीतसिंह व सवाई जयसिंग हे मोगल सत्ता व इंग्रज शासनकाळ या मधल्या काळात झालेले नाव घेण्यासारखे राजे. पण यापैकी रणजीत सिंहाची सत्ता पंजाबवर होती तर सवाई जयसिंग जयपूरचा सत्ताधीश होता. मराठे मात्र १७०७ पासून जवळजवळ ९० ते १०० वर्षे भारताच्या बऱ्याच भागावर सैनिक शासन करत होते. १७५७ मध्ये प्लासीच्या लढाईनंतर बंगाल मध्ये इंग्रज सत्ता- ईस्ट इंडिया कंपनी - शासन करू लागली. १८०२ मध्ये मराठी सत्ता पराभूत झाली व १८१८ मध्ये तर महाराष्ट्रावर कंपनी शासन लागू झाले. त्याआधी भारतातली इतर राज्ये कंपनी शासनाखाली आली होती. १८१८ ते १८५८ या काळात कंपनी सरकारचे भारतावर राज्य होते. याच काळात इंग्रजांनी आपण श्रेष्ठ, आपला वंश श्रेष्ठ असे मिथक निर्माण केले. सर्वसामान्य भारतीय व राजसत्तेला सामील असलेले लोक या मिथकावर विश्वास ठेवू लागले. (आपण जर कंपनी सरकारचा भारतावरचा अंमल सुरू होण्यापूर्वीचे उल्लेख व पुरावे पाहिले तर ब्रिटिश कंपनी चालक आपल्याला भारतीय सत्ताधीशांच्या तुलनेत दुय्यम स्थान मिळाले तर समाधानी होते असे आढळेल). १८५७ च्या अपयशी स्वातंत्र्ययुद्धानंतर १८५८ मध्ये इंग्रजी पार्लमेंटची व इंग्रज राणीची थेट सत्ता इथे आली. नफ्यावर आधारलेली कंपनीची सत्ता भारतात राहिली नाही. वसाहतवाद, साम्राज्यवाद व वंशवाद आता म्हणजे १८५८ ला जोरात सुरू झाला असे ठामपणे म्हणता येईल. युरोपियन वंशाचे श्रेष्ठत्व ही कल्पनाही याच वेळी उदयास आली.

पण या काळातच काही चांगल्या गोष्टीही घडल्या. भारतीयांना बुद्धीच्या पुनरूज्जीवन काळाची, बुद्धिवादाची, शास्त्रयुगाची, समाजसुधारणेची, आधुनिकतेची, फ्रेंच राज्यक्रांतीतल्या समता, स्वातंत्र्य, न्याय, बंधुता या तत्त्वांची व आधुनिक उच्च शिक्षणाची तसेच औद्योगिकीकरणाची तोंडओळख झाली. बंगालमध्ये हे नवे वातावरण निर्माण होणे अगदी स्वाभाविक होते. राजा राममोहन रॉय, केशवचंद्र सेन हे त्यात आघाडीवर होते. ब्राह्मोसमाज, प्रार्थना समाज स्थापना हे नव्या वातावरणाची दिशा दाखवतात.

महाराष्ट्रात इंग्रजी शासन १८१८ साली आले. महात्मा फुले व लोकहितवादी हे त्या काळातले महत्त्वाचे पुढारी होते. बहुजनसमाजाचा आवाज फुल्यांच्या रूपाने उमटला. सत्यशोधक समाजाची स्थापना या काळात झाली व समाजाच्या खऱ्या गरजांचा आविष्कार या काळातच झाला. इंग्रजी शासन हे अधिक न्यायबुद्धीचे आहे, माणसाची माणूस म्हणून कदर करणारे आहे असे शूद्रातीशूद्र, दलित व स्त्रियांना त्यावेळी वाटणे अगदी स्वाभाविक होते. जुन्या न्यायकल्पनेवर आधारलेल्या आधी असलेल्या मुस्लिम, मराठा व इतर भारतीय राजवटींपेक्षा ही आधुनिक विचारावर आधारलेली, प्रबोधन काळानंतरची राजवट चांगली आहे असे इंग्रजी राजवटीच्या आरंभीच्या कालात लोकांना वाटणे समर्थनीय होते.

१८५७ चा उठाव हा सरंजामशाही किंवा फ्यूडल उठाव होता हे नेहरूंचे निरीक्षण या पार्श्वभूमीवर पाहिले पाहिजे. एक स्वातंत्र्य सैनिक असे निरीक्षण नोंदवतो तेव्हा त्याच्याकडे गांभीर्यानेच पाहणे आवश्यक ठरते.

१८५८ नंतर भारत ब्रिटिश साम्राज्याचा एक भाग बनला. रेल्वे, रस्ते, पोस्ट, गिरण्या, नवेनवे उद्योग, व्यापार, मुंबई, कलकत्ता, मद्रास, दिल्लीसारखी मोठी शहरे ब्रिटिश राजवटीत उदयास आली. याच वेळी अनेकांच्या मनात स्वातंत्र्याची उर्मी निर्माण झाली होती. १८८५ मध्ये काँग्रेसची झालेली स्थापना या वातावरणाचे

फल होते. रानडे, गोखले, टिळक, लाला लजपतराय, सुरेंद्रनाथ पाल व त्यांच्या आधीच्या काळात काँग्रेसची स्थापना करणारे दादाभाई नवरोजी, तसेच सर अलेक्झांडर ह्यूम सारखे ती संस्था स्थापन करण्यात पुढाकार घेणारे ब्रिटिश नागरीक हे सगळेच ह्या नव्या वातावरणाच्या पार्श्वभूमीवरच आपले वेगळ्या स्वरूपाचे काम करीत होते.

नेहरूंनी हा काळ पाहिला नव्हता. पण १९१७ नंतरच्या काळातल्या सर्व राजकीय घडामोडींचे ते साक्षीदार होते. राजकीय स्वातंत्र्याची मागणी अनेक मार्गाने पुढे रेटताना नेहरूंचे सांस्कृतिक व बौद्धिक भान सतत जागृत राहिले हे विशेष आहे. प्रबोधन काळात जी मूल्ये समोर ठेवली होती ती जागतिक मूल्ये आहेत व आधुनिक मूल्ये आहेत याचे नेहरूंना भान राहिले. व्यक्तिस्वातंत्र्य, समता ही मूल्ये त्यांना प्रिय होती. भारताची अखंडता, लोकशाही व एकता त्यांना हवी होती. हिंदू-मुस्लिम प्रश्न जेव्हा उभा राहिला तेव्हा नेहरूंना दुःख वाटणे स्वाभाविक होते. मुसलमानांचे अलग राष्ट्र ही भूमिका १९२० च्या दशकात जेव्हा बॅरिस्टर महमद अली जिनांनी घेतली तेव्हा नेहरूंनी त्याला विरोध केला. गांधींच्या नेतृत्वाखालील काँग्रेसला ही दोन राष्ट्र कल्पना मान्यच नव्हती.

दुसरे महायुद्ध सुरू झाले व सहभागाची हाक इंग्लंडने हिंदुस्तानला दिली. भारताला म्हणजे हिंदुस्तानला स्वातंत्र्य देण्याच्या पक्क्या आश्वासनावरच हे सहकार्य असेल असे काँग्रेसने ठरवले. असहकारावर ठाम असणाऱ्या सर्व काँग्रेस पुढाऱ्यांना इंग्रज सरकारने तुरुंगात डांबले. गांधी, नेहरू, पटेल व इतर बड्या पुढाऱ्यांबरोबरच दुसऱ्या फळीतले पुढारीही तुरुंगात डांबले गेले. ८ ऑगस्टच्या संध्याकाळच्या सभेत 'चले जाव' चा नारा गांधींनी मुंबईच्या आझाद मैदानावर दिला. रातोरात सर्व पुढाऱ्यांना अटक झाली व दुसऱ्या दिवशीच १९४२ चे 'चले जाव' हे भारतीय स्वातंत्र्याचे अखेरचे आंदोलन सामान्य लोकांनीच सुरू केले. नेहरूंना व इतर सर्व महत्त्वाच्या पुढाऱ्यांना अटक झाली होती; जयप्रकाश नारायणांसारखे काही पुढारी अटकेची शक्यता लक्षात घेऊन भूमिगत झाले होते.

पर्ल हार्बर या अमेरिकन बंदरावर जपानने हवाई हल्ला केला व त्या बंदरातल्या काही बोटी बुडवल्या. तोवर प्रत्यक्ष महायुद्धात भाग घेत नसलेल्या अमेरिकेने युद्धात भाग घेतला. नागासकी व हिरोशिमा या जपानच्या शहारावरल्या अमेरिकेच्या अणुबॉंब हल्ल्याने मानव जातीचा फार मोठ्या प्रमाणात संहार करणारे दुसरे महायुद्ध संपले.

त्यानंतर भारताला स्वातंत्र्य द्यायला ब्रिटिश तयार झाले. सर्व राजकीय कैद्यांची सुटका करण्यात आली. नेहरूंची जेलमधून सुटका झाली. भारताला स्वातंत्र्य मिळाले, पण हिंदुस्तानची फाळणी केली गेली. त्याची भारत व पाकिस्तान ही दोन राष्ट्रे बनवली गेली, जिना मुसलमानांचे राष्ट्र झाले म्हणून खुश होते, तर काँग्रेसने देशाची ही फाळणी अपरिहार्य म्हणून स्वीकारली. गांधी व नेहरू या दोघांचा फाळणीला विरोध होता, पण फाळणीची अपरिहार्यता लक्षात घेऊन त्यांना फाळणी स्वीकारावी लागली.

फाळणीनंतरचे दंगे, संहार, निर्वासितांचे स्थलांतर व नव्या जागी त्यांना बसवणे ही सगळी प्रचंड आव्हान असलेली कामे नेहरू पंतप्रधान असलेल्या अननुभवी भारत सरकारला करावी लागली. पण हा सगळा नंतरचा इतिहास झाला. डिस्कव्हरी हे पुस्तक नेहरूंची जेलमधून सुटका झाली ह्या मुद्द्यावर संपते.

पुस्तकात नेहरूंनी आपली प्रिय पत्नी कमला हिची आठवण पुस्तकाच्या सुरुवातीलाच २ ऱ्या प्रकरणात काढली आहे. ते अल्मोरा जेल मध्ये असताना कमलाच्या असाध्य रोगाची व कमलाच्या गंभीर स्थितीची दखल घेऊन ब्रिटिश सरकारने त्यांना जेलमधून सोडले. हवापालटासाठी कमलाला त्यांनी स्वित्झरलंडला नेले. पण दुर्दैवाने तिथेच १९३६ मध्ये त्यांचा मृत्यू झाला. भारतीय स्वातंत्र्य व इंदिरा ही लाडकी लेक या दोन गोष्टी समोर ठेऊन त्यांनी आपले अपार दुःख शांतपणे एकटेच सहन केले.

(६)

**भारतीय संस्कृती व भारतीयांचे गुण**

भारताच स्वातंत्र्य व इथल्या सामान्य लोकांचे मार्ग हे नेहरूंचे आवडीचे विषय होते. सहनशीलता व

समावेशकता हे भारतीय संस्कृतीचे गुण त्यांना आवडले होते. पण त्याच बरोबर त्यांना जाणीव होती की जगातली कोठलीही संस्कृती परिपूर्ण नव्हती व परिपूर्ण नाही. आजवरच्या इतिहासाकडे व विविध संस्कृतींच्या वाटचालीकडे त्यांनी सम्यक व तौलनिक दृष्टीने पाहिले आहे. तात्त्विक दृष्टी व चिंतनशीलता असणाऱ्या माणसातच असे दुर्मिळ गुण सापडणे शक्य असते. असाच माणूस शांतपणे, संतुलितपणे व अगदी वस्तुनिष्ठपणे विचार करू शकतो. अशी चिंतनशील वृत्ती त्यांच्या पुस्तकात ठायी ठायी दिसते. पान ४ ते २७ ही पुस्तकाची पाने उदाहरणासाठी घेता येतील. नेहरू म्हणतात की, संदर्भाच्या चौकटीतच माणूस विचार करीत असतो व लोकशाही, स्वातंत्र्य, समता, न्याय, अगदी मार्क्सवादासारखे आधुनिक दर्शनही संदर्भाने बांधलेले असते. इतिहासाचा अभ्यास त्यांना आवश्यक वाटतो. तो अभ्यास एक सम्यक जीवनदृष्टी देतो असे विज्ञानाचे पुरस्कर्ते नेहरू सांगतात. इतिहास माणसाला आपला वारसा काय ते सांगतो, पण इतिहास व भूतकालाची माहिती एक ओझे बनता कामा नये याची जाणीव नेहरू जेव्हा व्यक्त करतात तेव्हा त्यांची ही सम्यक दृष्टी स्पष्ट होते. पुस्तक संपवताना पान ५३२-५३३ वर अहमदनगर जेलचे जीवन व बाहेरचे स्वतंत्र जीवन यावरचे त्यांचे आत्मचिंतन मुळातून वाचण्यासारखे आहे. इतिहास, बंधनयुक्त जीवन, बंधनमुक्त जीवन, भारताचे भविष्य घडवायची जबाबदारी इतिहासाने ज्याच्यावर टाकली आहे त्या माणसाने कसे वागले पाहिजे यावरचे विचार त्यांच्यातला विचारक जेव्हा व्यक्त करतो तेव्हा त्यांच्यातला सजग व सम्यक तत्त्वज्ञ कसा होता हे स्पष्ट होते.

ब्रिटिशांनी भारतावर राज्य करणे योग्य नाही असे नेहरू जेव्हा म्हणतात तेव्हा इथल्या ब्रिटिश शासन प्रणालीची अवैधता, इथले ब्रिटिश शासनकर्ते व ब्रिटन मधले विचारक व त्या विचारवंतांचा समकालीन विचार यात किती मोठे अंतर आहे हे ते स्पष्ट करतात. कोठलीच सुसंगतता व समकालीनता नसलेली ब्रिटिश शासन व्यवस्था लवकर जाऊन भारताला स्वातंत्र्य मिळावे यासाठी नेहरू आयुष्यभर कार्यरत राहिले.

## (७)

## गांधी व टागोरांचा समृद्ध वारसा व नेहरूंचे जीवनतत्त्वज्ञान

रवींद्रनाथ टागोरांचे कला व संस्कृतीप्रेम यांचा प्रभाव नेहरूंवर होता. त्याचवेळी महात्मा गांधींचे राजकीय तत्त्वज्ञान व त्यांनी आचरलेले साधे व सर्वसंगपरित्यागाचे आश्रमवासी जीवन यांचा प्रभावही नेहरूंच्या संवेदनाशील मनावर पडला होता व अगदी तरूण वयातच गांधींचं शिष्यत्व पत्करून इतर मार्ग उपलब्ध असतानाही त्यांनी भारताच्या स्वातंत्र्य आंदोलनात स्वातंत्र्य मिळण्याच्या क्षणापर्यन्त एक स्वातंत्र्य सैनिक म्हणून भाग घेतला. नेहरू स्वतंत्र भारताचे पहिले व पुढे १६ वर्षे भारताचे पंतप्रधान होते. त्यांच्या प्रेरणेने बरेचसे कलासंस्कृतीसंबंधित उपक्रम त्यांच्या कारकीर्दीत झाले व अनेक कला-संस्कृती संस्था पण स्थापन झाल्या, त्या सर्वांत टागोरांचे कलाप्रेम प्रतिबिंबित झालेले दिसले असे म्हणता येईल.

महात्मा गांधींना भारताच्या समृद्ध व अहिंसक वारशाची चांगली जाणीव होती. भारतातले सत्तांतर भूतकाळात बरेचदा शांततेच्या मार्गाने झाले व पराजित विरोधकाला क्वचितच जिवे मारले गेले. हा भारताचा इतिहास गांधींना माहीत होता. म्हणून स्वातंत्र्यआंदोलन शांतता, सत्य, अहिंसा, अस्तेय या मार्गाने चालावे असा आग्रह त्यांनी धरला व हे आंदोलन करणाऱ्या लोकांना व कॉंग्रेस पक्षाला त्या मार्गाने जावे लागले. गांधींच्या प्रभावामुळे व त्यांच्या जीवनतत्त्वज्ञानामुळे हे शक्य झाले.

भारताची प्राचीन संस्कृती श्रेष्ठ होती, भारतातले धर्म श्रेष्ठ होते, त्या धर्मांनी कधीही दुसऱ्या धर्मांचा द्वेष शिकवला नाही, नैतिकता व मानवता सर्व धर्मातच आढळते, दुसऱ्या धर्मांचा आदरच केला पाहिजे, प्राचीन आश्रमपद्धती शक्य आहे, गरजेपुरतेच माणसाने उपभोगले पाहिजे, परिसरातल्या वस्तूंवर माणसाचा जीवनक्रम आधारलेला असला पाहिजे याबद्दल गांधींनी आग्रह धरला होता. परदेशी शिक्षण घेऊन, २१ वर्षे परदेशी राहिलेला, आधुनिक जीवनशैलीची अगदी जवळून माहिती असलेला माणूस जेव्हा साधे आश्रमातले जीवन जगतो, पंचा नेसून उघड्या अंगाने २ दशके राहतो; तेव्हा भारतातले लोक त्याच्याकडे आकर्षित होणे स्वाभाविक होते. नेहरूंना

गांधींचे सर्व विचार मान्य नव्हते. पण गांधींचा प्रभाव, त्यांचा नि:स्वार्थीपणा, त्यांचे काही महत्त्वाचे विचार नेहरूंना आवडले होते. या अनेक कारणांमुळे नेहरूंनी महात्मा गांधींचे शिष्यत्व स्वीकारले होते.

गांधींचे ग्रामीण स्वायत्ततेचे विचार, त्यांची हिंदस्वराज्याची कल्पना नेहरूंनी लक्षात घेतली होती व त्याचवेळी विद्येचे युरोपमध्ये झालेले पुनरूज्जीवन, बुद्धिप्रामाण्यवाद, शास्त्रीय दृष्टी, औद्योगिकरणाचे आधुनिक काळातले महत्त्व, शहरसंस्कृतीची अपरिहार्यता व आधुनिकतेचा विचार नेहरूंना बारकाईने माहीत होता. भारताला हे सर्व नवे आवश्यक आहे हे पण त्यांना कळले होते. माणसाने आशावादी असावे, नैतिक असावे, श्रद्धावान असावे, आध्यात्मिक असावे हा विचार त्यांना समजत होता. पण धर्मभेदामुळे माणसा-माणसात, इतिहासात व समकालात कलह निर्माण झाला आहे हे, त्यांना दिसत होते. गूढवाद, अंधश्रद्धा, बुवाबाजी, चमत्कार या विज्ञानाविरूद्ध असणाऱ्या कल्पनांना त्यांचा विरोध होता. विज्ञानामुळे, औद्योगीकरणामुळे युरोपचा विकास झाला आहे हे दिसत असल्याने भारताने आपल्या उत्थानासाठी तोच रस्ता अवलंबला पाहिजे हे जसे त्यांना भारताच्या पारतंत्र्यकाळात समजले होते, तसेच ते स्वातंत्र्यकाळातही नीट उमजले होते. पंतप्रधान म्हणून त्यांनी नव्या दिशेनेच पावले टाकली होती. युद्ध ही घटनाच त्यांना आवडत नव्हती. सम्राट अशोकाचे युद्धविरोधी विचार व बुद्धधर्मातला शांततासंदेश त्यांना आकर्षक वाटला होता. दुसरे महायुद्ध नरसंहार करणारे युद्ध आहे; रक्तपिपासू माणसांनी घडवलेली एक अतिशय घृणास्पद घटना आहे असे त्यांना वाटत होते. त्यांना राष्ट्रसंघाचे किंवा युनोचे महत्त्व समजले होते व राष्ट्रवाद अंगीकारत असूनही सर्व जगाचे राज्य ही आदर्श कल्पना आहे असेच ते मानत होते.

ते दूरदर्शी राजकारणी होते. आजची स्थिती उद्या राहणार नाही हे त्यांना नीट माहीत होते. उद्याच्या या जगात भारताला आपली महत्त्वाची भूमिका वठवायची आहे हे त्यांना समजले होते. अनेक भाषा, अनेक संस्कृती, अनेक धर्म असलेल्या भारताने भूतकाळात सहजीवन व स्वीकार हा मार्ग स्वीकारला होता, भविष्यात असा मार्ग स्वीकारणे भारताला अवघड जाणार नाही, कारण भारतीय इतिहासात, भारतीय संस्कृतीत हा सहकार्याचा, सहजीवनाचा विचार रूजलेला आहे असेच नेहरूंचे मत होते.

नेहरूंचे डिस्कव्हरी हे पुस्तक भारतीय इतिहासाचा व संस्कृतीचा आढावा घेते. त्यांची भूमिका, तत्त्वज्ञान ते स्पष्ट करते. मानवमुक्ती हे आपले ध्येय आहे असे नेहरूच म्हणतात. जगाचे नागरिक होणे, विश्वनागरिक होणे हे आपले अंतिम ध्येय आहे, पण त्याआधी आपण खरे भारतीय, खरे आशियाई होणे आवश्यक आहे असे रास्तपणे त्यांना वाटते. आपल्या पुस्तकात भारताचा आपण मर्यादित शोधच घेऊ शकलो आहोत हे पण ते नम्रपणे मांडतात.

ते म्हणतात की माणूस मर्त्य आहे हे सत्य असले तरी माणूस अमर्त्य आहे असे समजूनच त्याने नीतीमार्गाने, आशावाद कायम ठेऊन, सौंदर्याची पूजा करून, आपल्यातला देवीअंश जागृत ठेऊन जगले पाहिजे. नेहरूंचे डिस्कव्हरी हे पुस्तक भारतीय संस्कृतीवरचे फार महत्त्वाचे पुस्तक आहे.



अनुक्रमणिका

ग्रंथवेध :

# नेहरूंची नगरच्या किल्ल्यातील कैद

श्री. मा. भावे

आज ज्या पुस्तकाविषयी मी लिहित आहे ते छापलेले व प्रसिद्ध झालेले पुस्तक नाही. ते टंकलिखित पुस्तक आहे. लेखकाने पुस्तकाच्या ५-१० प्रती खाजगी वितरणासाठी तयार केल्या असाव्यात. त्या पैकीच एक प्रत सुमारे वीस वर्षांपूर्वी माझ्या हाती पडली. या पुस्तकाविषयी एक लेख मी २००२ साली 'महाराष्ट्र टाईम्स'च्या दिवाळी अंकात लिहिला होता. आजचा हा लेख त्या लेखापेक्षा बऱ्याच प्रमाणात वेगळा आहे. नेहरूंचे चरित्रकार एस्. गोपाल यांनी नगर किल्ल्यातील नेहरूंच्या बंदिवासाविषयी लिहिताना या महत्त्वाच्या पुस्तकाचा उपयोग केला नाही, यावरून असे दिसते की, हे पुस्तक त्यांना माहीत नसावे.

या पुस्तकाचे नाव 'माय रेमिनिसन्सेस् ऑफ दि अहमदनगर फोर्ट ड्यूरिंग द इअर्स १९४२-१९४५' असे असून त्याचे लेखक बालकराम जी. मेहता हे आहेत. त्यांनी आपला हुद्दा 'सुपरिंटेंडेंट : महाराष्ट्र जेल डिपार्टमेंट' असा दिला आहे. माझ्यापाशी असलेल्या पुस्तकाच्या प्रतीवर बालकराम यांनी सही केली असून त्याखाली '१-४-६०' अशी तारीख घातली आहे. त्यावरून कळते की, पुस्तक १९५९-६० साली लिहिले असावे. पुस्तकाची फुलस्केप आकाराची १५२ पाने आहेत.

श्री. बालकराम हे १९४२ साली येरवडा तुरुंगात दुय्यम तुरुंगाधिकारी (ॲसिस्टंट जेलर) म्हणून काम पाहात होते, अशी माहिती त्यांनी पुस्तकाच्या सुरुवातीला दिली आहे. श्री. बालकराम यांच्याविषयी अधिक माहिती मिळवावी यासाठी मी महाराष्ट्र राज्याच्या तुरूंग-खात्याला पत्र लिहिले. परंतु, "अशी काही माहिती मिळत नाही" अशा आशयाचे उत्तर मला मिळाले.

बेचाळीस सालच्या सव्वीस ऑगस्टला येरवडा तुरुंगाचे अधीक्षक यांनी बालकराम यांना बोलावून सांगितले की, "तुमची बदली आता दुसऱ्या तुरुंगावर होणार आहे." बालकराम यांना काही कौटुंबिक अडचणी होत्या. त्यामुळे पुण्यातून बाहेर जायला ते नाराज होते. तथापि, अधीक्षक म्हणाले की, "तातडीची गरज असल्याने तुला जावेच लागेल. तेव्हा आढेवेढे घेऊ नकोस." बालकराम अजीजीने म्हणाले की, "कुठे जायचे आहे, ते तरी सांगा." अधीक्षक म्हणाले की, "तुझी बदली होणार ही बातमी अगदी गुप्त ठेवायची आहे. तुला कुठे पाठवणार आहेत ते मलाही माहीत नाही. मला तुरुंगखात्याच्या मुख्यांकडून हुकूम आला आहे की, तुला बदलीच्या तयारीत राहायला सांगावे. पण तुझी बदली कुठे होणार आहे त्याची माहिती मी संध्याकाळपर्यंत काढतो." संध्याकाळी बालकराम यांना कळले की, त्यांची बदली 'अहमदनगर सब्-जेल'मध्ये होणार आहे; पण त्यांना काम मात्र दुसऱ्याच कोणत्या तरी ठिकाणी करावे लागेल. दुसऱ्या दिवशी त्यांना कळले की, कार्यालयीन तरतूद जरी "अहमदनगर सब्-जेल इथे बदली" अशी असली तरी प्रत्यक्षात काम अहमदनगर किल्ल्यात एक विशेष कैदखाना उघडला आहे, तेथे करावे लागणार आहे.

या 'विशेष कैदखान्या'त कोण बंदी असणार आहेत, याची मोठीच उत्सुकता बालकराम यांना लागली होती. येरवड्याच्या तुरुंगात एक राजकीय कैदी होते. त्यांनी सांगितले की, "बहुतकरून काँग्रेस कार्यकारिणीच्या सदस्यांना तेथे बंदीत ठेवले असावे." ह्या अंदाजाला दुसऱ्या जाणकारांकडूनही दुजोरा मिळाला. तेव्हा बालकराम यांनी नगरला जाण्याचा निर्णय घेतला. त्यांनी आपल्या कुटुंबाला तूर्त येरवड्यातच ठेवले. नगरच्या किल्ल्यात बालकरामांना राहायला जागा दिली होती खरी, पण तिथे कुटुंबाला न्यायची परवानगी नव्हती. नंतर नगर शहरात जागा मिळवून बालकरामांनी कुटुंब तिकडे हलवले.

नगरच्या किल्ल्यातील कैदखान्यावर कुलकर्णी नावाचे मुख्याधिकारी होते. आता बालकराम कुलकर्ण्यांचे सहाय्यक म्हणून आले होते. राजकीय कैद्यांना केवळ

हिंदी अधिकाऱ्यांच्या देखरेखी खाली ठेवणे इंग्रज-सरकारला पसंत पडणारे नव्हते. त्यामुळे कुलकर्ण्यांची कैदखान्यावरून दुसरीकडे बदली झाली व त्यांच्या जागी कर्नल सेंडक नावाचा युरोपीय अधिकारी नेमण्यात आला. पण आपल्या अधिकाराची सूत्रे बालकराम यांनी कुलकर्ण्यांकडूनच घेतली. ती तारीख होती ३ सप्टेंबर १९४२.

नगरचा किल्ला तेव्हा लष्कराच्या ताब्यात होता. ह्या उच्च दर्जाच्या राजकीय कैद्यांचे बाहेरच्या लोकांशी अजिबात दळणवळण राहू नये याचा सक्त बंदोबस्त लष्कराने ठेवला होता. खुद्द बालकरामांची सुद्धा झडती, ते कैदखान्यातून बाहेर जात व परत येत तेव्हा, घेतली जात असे. कैदखान्यात जे बारा कैदी होते त्यांची नावे अशी : (१) पंडित जवाहरलाल नेहरू, (२) मौलाना अबुल कलाम आझाद, (३) सरदार वल्लभभाई पटेल, (४) पंडित गोविंद वल्लभ पंत, (५) आचार्य जे. बी. कृपलानी, (६) आचार्य नरेंद देव, (७) श्री. असफ अली, (८) डॉ. सय्यद महमूद, (९) श्री. शंकरराव देव, (१०) डॉ. बी. पट्टाभी सीतारामेय्या, (११) डॉ. प्रफुल्लचंद्र घोष, (१२) श्री. हरे कृष्ण महताब.

(१)

नगरच्या किल्ल्यात मुख्य दरवाजापासून ४४० यार्डांवर एक इमारतींचा समूह होता. या समूहात काही मोठी दालने व काही स्वतंत्र खोल्या होत्या. तेथे ही राजकीय कैद्यांची छावणी तयार करताना प्रत्येक दालनात ॲसबेसटॉसच्या पत्र्यांचे आडोसे घालून २५x२०' या आकाराच्या खोल्या बनवण्यात आल्या. एकूण छावणीकडे पाहिल्यास ती दोन पाख्यात – पूर्वेकडे एक पश्चिमेकडचे दुसरे – विभागलेली दिसत असे. पश्चिमेकडच्या पाख्यात हे बारा राजकीय कैदी आपापल्या खोल्यांत राहात होते. पूर्वेकडच्या पाख्यात छावणीवर देखरेख ठेवणारे अधिकारी असत. पहिल्या मोठ्या खोलीत बालकरामांची राहाण्याची जागा व कचेरी अशा दोन्ही गोष्टी होत्या. शेजारच्या लहान खोलीत कर्नल सेंडक याची कचेरी होती. तीमध्ये एक टेलिफोन होता, एक वैद्यकीय सामानाचे कपाट होते आणि कचेरीचे इतर सामान होते. सेंडकच्या खोलीच्या पलिकडे एक मोठी खोली होती. या छावणीला आचारी, न्हावी, झाडूवाले, धोबी, चपराशी वगैरे लोक लागतच. ते 'नगर सब्जेल' येथून आणलेले व शिक्षा झालेले कैदी असत. ते या मोठ्या खोलीत राहात. या दोन पाख्यांच्या मध्ये १००x ४०' अशा अकाराचे मैदान असून त्याच्या मध्य भागी ध्वजस्तंभ बसवलेला होता. पुढे या बखळ जागेचा उपयोग कैद्यांच्या सोयीनुसार करण्यात आला. कुणी रोपटी लावली, कुणी इथे चालण्याचा व्यायाम केला, कधी-कधी ४-६ कैदी मिळून बॅडमिंटन खेळण्यात जीव रमवू लागले.

पश्चिमकडच्या पाख्याच्या उत्तर बाजूला फवारे (शॉवर) असणारी स्नानगृहे आणि हिंदी पद्धतीचे शौचकूप जीत आहेत अशी एक इमारत होती तर त्याच पाख्याच्या दक्षिण बाजूला पाश्चात्य पद्धतीचे शौचकुपांचा व मुताऱ्या बांधल्या होत्या. नेहरू, मौलाना आझाद, सरदार पटेल व असफ अली हे चौघे पाश्चात्य पद्धतीचे शौचकूप वापरीत व बाकीचे नेते हिंदी शौचकूप उपयोग करीत. या शौचकूपांना पाणलोटाची (फ्लश) सोय नव्हती. त्यामुळे भंगीकाम करणाऱ्या कैद्यांकडून शौचकूपांची स्वच्छता करून घ्यावी लागे. ज्या राजकीय कैद्यांना अंघोळीसाठी गरम पाण्याची गरज असे त्यांच्यासाठी गरम पाणी पुरविण्याचीही व्यवस्था होती.

राजबंद्यांची परिचर्या करणारे जे गुन्हेगार कैदी असत त्यांना बेड्या व साखळदंड घातलेले असत. अशा बांधलेल्या कैद्यांकडून कोणतीच व्यक्तिगत कामे करून घेत नसत. पण काही बाबतीत राजबंद्यांना कैद्यांना कामे सांगावीच लागत. ४२ सालच्या नोव्हेंबर महिन्यात तुरुंगखात्यांच्या प्रमुखांनी या छावणीला भेट दिली तेव्हा सर्व राजबंद्यांनी त्यांच्यापुढे मागणी केली की, छावणीत काम करणाऱ्या गुन्हेगार कैद्यांना बेड्या व साखळ्या घालू नयेत. खरे तर ही मागणी तुरुंगाच्या नियमात बसणारी नव्हती. पण या बड्या नेत्यांची आग्रही मागणी खातेप्रमुखांना डावलता येईना. त्यांनी बराच विचार करून गुन्हेगार कैद्यांच्या बेड्या व साखळ्या काढून घेतल्या. सर्व राजबंद्यांना ह्या गोष्टीमुळे फारच हायसे वाटले.

पंडित नेहरू व डॉ. सय्यद महमूद एकाच खोलीत राहात. शंकरराव देव आणि डॉ. घोष ह्या दोघांना एकच








अनुक्रमणिका

खोली होती. बाकीचे राजबंदी मात्र स्वतंत्र खोल्यांत राहात. प्रत्येक खोलीत सर्व उपयोगी सामान होते. छताला पंखा होता व विजेचे दिवेही होते. या पश्चिम पाख्यातील खोल्यांच्या बाहेरच्या बाजूला उघडणाऱ्या खिडक्या, विटांच्या भिंती बांधून बंद केल्या होत्या. छावणीतील अंगणाच्या बाजूला उघणाऱ्या खिडक्या मात्र अशा रीतीने बंद केलेल्या नव्हत्या. छावणीच्या बाहेरच्या बाजूकडे असणाऱ्या खिडक्या बंद करण्याचा स्पष्ट उद्देश हा होता की, बाहेरच्या लोकांशी राजबंद्यांची दृष्टादृष्टही होऊ नये. या खिडक्या मोकळ्या कराव्यात अशी मागणी राजबंद्यांनी वारंवार केली. त्यामुळे सरकारने या खिडक्या निम्म्यापर्यंत मोकळ्या केल्या. त्यातून थोडा वारा व प्रकाश खोल्यांत येऊ लागला.

या छावणीच्या वायव्येकडे एक प्रशस्त दालन व त्याच्या शेजारी लहानशी खोली होती. दालनाचा उपयोग जेवणघर म्हणून केला जाई. लहान खोली कोठी व स्वयंपाकघर म्हणून वापरीत. एरवीच्या तुरुंगात कैद्यांना ठरावीक पद्धतीचे जेवण मिळते. पण छावणीतील कैदी शिक्षा झालेले कैदी नव्हते व त्यांचा दर्जाही वेगळा होता. सरकारने ठरवून दिले होते की, दर कैद्यामागे दर महा रु. १०७ इतका खर्च जेवणासाठी करावा. १९४२ साली शंभर रुपये ही रक्कम चांगलीच घसघशीत होती. स्वयंपाकी म्हणून गुन्हेगार कैदी कामाला असत. पण त्यांनी स्वयंपाकाचे शिक्षण घेतलेले नव्हते. त्यामुळे राजबंद्यांनी स्वयंपाकावर देखरेख करण्यासाठी पाळ्या वाटून घेतल्या होत्या. ज्या राजबंद्याची पाळी असे तो आचाऱ्याकडून त्या दिवशीचा स्वयंपाक आपल्याला पाहिजे तसा तयार करवून घेई. कधी राजबंदी स्वतःला आवडणारे जिन्नस स्वतःच तयार करीत. स्वतः पंडित नेहरू वेगवेगळ्या प्रकारची ऑम्लेट्स् किंवा अंड्यांचे इतर पदार्थ, टोस्ट केलेला पाव, बटाट्याच्या उकडून तळलेल्या फोडी, टोमॅटोचे काप, बीटच्या चकत्या असा चमचमीत उपाहार तयार करीत. बालकराम स्वतः राजबंद्यांबरोबरच जेवत व उपाहार घेत. सर्वजण एका कुटुंबाचे घटक आहोत असे समजून वागत. पंडितजींचा आणखी विशेष असा होता की, जेवणघर व स्वयंपाकघर व्यवस्था त्यांनी स्वतःकडे ठेवली होती. स्वयंपाकासाठी कोणती धान्ये व दूध, दही, अंडी, मांसाहारी पदार्थ कोणत्या प्रमाणात काढून ठेवायचे; भांडी कोणती वापरावयाची; जेवणाच्या टेबलावर ताटे, भांडी, चमचे, ओगराळी, काटे कसे मांडावयाचे; कोणी आजारी असल्यास त्याच्या पथ्याचे खाणे कोणते या सगळ्या सूचना नेहरू देत असत. पंडितजींना त्यांची मुलगी इंदिरा हिने जेवणासाठी वापरण्याच्या चिनी पद्धतीच्या काड्या पाठवल्या होत्या. पंडितजी त्या काड्यांच्या सहाय्याने जेवण्यात तरबेज झाले होते.

(२)

राजबंद्यांची छावणी बत्तीस महिने चालली होती. बहुतेक राजबंदी पन्नाशीच्या पुढे, म्हणजे त्या वेळेच्या मानाने म्हातारेच होते. त्यामुळे त्यांच्या प्रकृतीची विशेष काळजी घ्यावी लागे. मुख्य छावणी अधिकारी कर्नल सेंडक स्वतः डॉक्टर होता. राजबंद्यांपैकी पट्टाभी सीतारामय्या हेही डॉक्टर होते. शिवाय नगरचे सिव्हिल सर्जन यांना बोलावण्यात येत असे. बालकराम सांगतात की, नेहरूंची प्रकृती उत्तम होती आणि आपण उत्तम तब्येत राखून आहोत याचा त्यांना अभिमान वाटत असे. एकदा एका राजबंद्याने आपल्या नातेवाईकाला लिहिलेल्या पत्रात पंडितजी आजारी असल्याचा उल्लेख केला होता व त्याचा मोठाच गवगवा वृत्तपत्रातून झाला. नेहरूंची बहीण कृष्णा हाथिसिंग हिचे नेहरूंना काळजीपूर्ण पत्र आले. तेव्हा नेहरूंनी रागावून लिहिले, 'माझ्या तब्येतीला अशी काय धाड भरली आहे की, दर पत्रात मी प्रकृतीविषयी लिहावे? माझी तब्येत खणखणीत आहे आणि ती तशीच चांगली राहील याची खात्री मला आहे. आपल्याकडे प्रकृतीचे रडगाणे गाण्याची जी सवय आहे, ती मला अगदी नापसंत आहे.'

तुरुंगातील आयुष्य आखबंद आणि कंटाळवाणे असते. त्यामुळे कैदी आजारी पडतात. परंतु पंडितजी अगदी नियमित राहात. प्राणायाम, शीर्षासन असे व्यायाम करीत. त्यांनी छावणीच्या अंगणात स्वतः खपून एक सुंदर बाग तयार केली. अंगणातील जमीन मुरमाड व कडक होती. गुन्हेगार कैद्यांना हाताशी घेऊन व कुदळ-फावडी वापरून त्यांनी खड्डे व चर खणले. खड्ड्यातून त्यांनी फार उंच न होणारी फुलझाडे लावली व ती

अनुक्रमणिका

वीतभर उंचीची झाल्यावर कुंड्यांमध्ये ठेवली. अशा चोवीस कुंड्या करून प्रत्येक राजबंद्याला दोन कुंड्या दिल्या. त्यामुळे प्रत्येक खोलीच्या दाराशी फुले फुललेल्या कुंड्या दिसू लागल्या. वाफ्यातील झाडे मोठी होऊन तेजस्वी व रंगी-बेरंगी फुलांनी खुलून गेली. सबंध छावणीलाच एक गुलजार रूप आले. रोज सकाळ-संध्याकाळ पंडितजी स्वतः बागेत फिरत; फुलझाडांची गळामळा झालेली किंवा कीड लागलेली पाने कापून टाकत. झाडांना पाणी घालत. उघडी हवा व हा व्यायाम यांच्यामुळे ते कायम टवटवीत दिसत.

पंडित नेहरूंनी या तुरुंगवासात 'डिस्कव्हरी ऑफ इंडिया' हा आपला विख्यात ग्रंथ लिहिला. त्यासाठी त्यांना भरपूर वाचन तर करावे लागलेच पण त्यापेक्षाही केवढेतरी चिंतन त्यांना करावे लागले. त्यांच्या बुद्धीला हा व्यायाम घडत असल्यामुळे त्यांची मनोवृत्तीही तजेलदार राहात असे.

छावणीतील अंगणात काही दिवसांनंतर एक बॅडमिंटन कोर्ट तयार करण्यात आले. जाळे, रॅकेट्स्, फुले यांची व्यवस्था झाली. खेळाडू राजबंद्यांसाठी कॅन्व्हासचे बूटही घेण्यात आले. नेहरू, कृपलानी, असफ अली, शंकरराव देव, घोष, पंत व हरेकृष्ण मेहताब हे सहा राजबंदी बॅडमिंटन खेळत असत. पट्टाभी हे स्वयंनियुक्त पंच आणि गुण-गणक (स्कोअरर) म्हणून काम करीत. या खेळाडूंतही पंडित नेहरूंच्या खेळण्यातली ऐट व नजाकत प्रेक्षणीय असे. शंकरराव देव चपळ होते व जोरदार फटके मारत. पंडित पंतांची उंची सहा फूट दोन इंच होती व वजन २०८ पौड होते. त्यांची ताकद जबरदस्त होती व त्यांची सर्व्हिस जोराची असे, छावणीतील राजबंद्यांच्या सेवेसाठी जे गुन्हेगार कैदी होते त्यांच्यासाठी व्हॉलीबॉलचा खेळ चाले. या कैद्यांना खेळाचे नियम, खेळातील बारकावे समजावून देण्यात नेहरूंना फार गोडी वाटे.

नेहरूंच्या दैनंदिन हालचालींचे वेळापत्रक बालकरामांनी तपशिलवार दिले आहे. ते सकाळी ६ वाजता जागे होत. प्राणायाम व आसने यांचा व्यायाम करून बागेत कामाला लागत. ते काम संपले की, डेटॉलच्या पाण्याच्या गुळण्या करीत, तोंड धुवत. ते विजेच्या वस्तऱ्याने दाढी करत असत. इतके झाल्यावर ते स्वयंपाकघरात जाऊन न्याहारीचे पदार्थ तयार करवून घेत. मेजावर ताटल्या, भांडी मांडून ठेवण्याची व्यवस्था पाहात. न्याहरी झाली की, ते आपल्या खोलीत जाऊन लिखाण-वाचन करण्यात गढून जात. बरोबर १० वाजता ते आपला परिचारक, गुन्हेगार कैदी , राघो याला हाक मारत आणि अंघोळीची तयारी करायला सांगत. अंघोळ करून ते परत खोलीत येत व लिहू लागत. साडे अकरा वाजता ते पुनः जेवणघरात येऊन दुपारच्या जेवणाची तयारी झाली की नाही, टेबलावर ताटे-वाट्या बरोबर मांडल्या आहेत ना याची खात्री करून घेत. मग दुपारच्या जेवणाची घंटा वाजे व राजबंदी जेवणासाठी एकत्र येत.

नेहरू पुनः आपल्या खोलीत येत, वृत्तपत्रे वाचत, काही पत्रे लिहावयाची असल्यास लिहीत. दीड वाजता ते छोटीशी डुलकी घेत आणि ताबडतोब लिखाणाला लागत ते साडे-तीन वाजेपर्यंत. आता दुपारच्या चहाची वेळ होई. जेवणघरात जाऊन नेहरू (नोकराकडून) चहापानाची तयारी करून घेत. चहा झाल्यावर तासभर बॅटमिंटनचा डाव चाले. पाच वाजता नेहरू बागेची निगराणी करत. झाडांना पाणी घालणे, खराब पाने कापून टाकणे, झाडांना आलेल्या शेंगातील बिया गोळा करून त्यांच्या पुड्या करणे. पुड्यांवर वनस्पतींची नावे व बी गोळा केल्याची तारीख घालणे ही सर्व कामे ते काटेकोरपणे पार पाडत.

हा वेळ पर्यंत संध्याकाळ झालेली असे. बहुतेक राजबंदी अंगणात खुर्च्या टाकून गप्पा मारण्यास बसत. नेहरू त्यात सामील होत. रात्री आठ वाजता नेहरू जेवणघरात जावून जेवणाच्या तयारीवर देखरेख करीत. जेवण झाल्यावर रात्री १० पर्यंत वाचन झाले, १० वाजता झोपण्यापूर्वीची कॉफी घेण्यासाठी ठरलेले चारपाच राजबंदी पुनः जेवणघरात जमत. दिवसाचा सगळा कार्यक्रम असा घड्याळाप्रमाणे चाले.

(३)

या दीर्घ काळाच्या तुरुंगवासात सुखदुःखाचे व मनस्तापाचेही प्रसंग नेहरूंच्या वाट्याला आले, या बत्तीस महिन्यांच्या काळात पंडितजींचे तीन वाढदिवस तुरुंगात साजरे झाले. दर वाढदिवसाला सर्व राजकैदी नेहरूंचे

अभीष्टचिंतन करीत. कर्नल सेंडस व बालकराम हेही नेहरूंचे अभिनंदन करीत. राजकैद्यांना व छावणीत कामाला असणाऱ्या गुन्हेगार कैद्यांना मिठाई वाटली जाई. एका वाढदिवसाला विजयालक्ष्मी पंडित यांनी आपल्या भावाला लिहिले होते, 'आजच्या पेक्षा पुष्कळच बरे असे दिवस लवकरच येतील आणि प्रजासत्ताक भारताचे पहिले अध्यक्ष होण्याचे भाग्य तुम्हाला लाभेल.'

विजयालक्ष्मी पंडित यांचे यजमान रणधीर पंडित हे बराच काळ आजारी होते व खंगत चालले होते. नेहरू या काळात चिंताग्रस्त असत. विजयालक्ष्मी आपल्या नवऱ्याच्या ढासळत चाललेल्या प्रकृतीची बातमी दर पत्रात देतच असत. तथापि येणाऱ्या पत्रांचे परीक्षण मुंबई सरकारकडून झाल्यानंतरच पत्र छावणीपर्यंत पोचत असे. त्यामुळे पत्रे मिळण्याला उशीर होई. नेहरू त्यामुळे चरफडत असत. शेवटी आपल्या मेव्हण्याच्या मृत्यूची दु:खद बातमी नेहरूंना तारेने मिळाली व ते अखेरी हताश झाले. त्यांनी विजयालक्ष्मी यांना सांत्वनाची तार पाठवली व मागून अनुकंपेने भरलेले एक पत्रही पाठवले.

वीस ऑगस्ट १९४४ या दिवशी बालकराम यांना निरोप आला की, 'किल्ल्यातील मुख्यालयात या; मुंबई सरकारकडून संदेश येतो आहे,' पंडित नेहरूंना नातू झाल्याची बातमी देणारा निरोप होता. बालकरामांनी ही बातमी देताच नेहरूंचा चेहरा खुशीने उजळून निघाला. पंडित पंतांनी मिठाई मागवली व ती सर्वांना वाटण्यात आली.

डॉ. सय्यद महमूद व पंडित नेहरू यांच्यात फार जवळीक होती. दोघे एकाच खोलीत राहात असत. डॉ. महमूद यांची तब्येत तुरुंगवासाच्या काळात बरी अशी कधी नव्हतीच. सतत पथ्यपाणी व औषधे चालूच असत. नेहरू त्यांची खूप काळजी घेत. किंबहुना आपल्या सहकाऱ्यांपैकी कोणी आजारी झाला तर त्याची शुश्रूषा करण्यात नेहरू तत्पर असत. अशी परिस्थिती असल्याने ६ ऑक्टोबर १९४४ रोजी डॉ. महमूद यांच्या सुटकेचा हुकूम आल्यावर इतर राजकैद्यांना वाटले की, आजारपणामुळेच डॉ. महमूद यांना सोडले असावे. पण वस्तुस्थिती तशी नव्हती. डॉ. महमूद यांनी व्हाईसरॉयला एक गुप्त पत्र पाठविले होते व त्यामुळे त्यांना सोडण्यात आले होते. सर्वच राजकैद्यांना डॉ. सय्यद महमूद यांच्या वागणुकीबद्दल उद्वेग वाटला. नेहरूंनाही याचा मनस्ताप झालाच असणार, सुटका झाल्यावर डॉ. महमूद प्रथम गांधीजींना भेटायला गेले. (गांधीजींची सुटका, प्रकृतीच्या कारणामुळे, आधीच झाली होती व ते जुहूला राहात होते.) गांधीजींनी त्यांना आपल्या जवळ ठेवून घेतले व सर्व राजकैद्यांची सुटका झाल्यावरच घरी जाऊ दिले.

छावणीतील राजकीय कैद्यांच्या सेवेसाठी जे गुन्हेगार कैदी आणलेले असत त्यांची चोऱ्या करण्याची सवय, इतक्या थोर नेत्यांच्या सहवासात राहूनही, गेली नव्हती. या नेते मंडळींपाशी मनगटी घड्याळे व पेन्स वगळता कोणत्याच महागड्या जिनसा नव्हत्या आणि सेवेकरी गुन्हेगार कैदी या वस्तूंना अजिबात हात लावत नसत. चोरीला जाणाऱ्या वस्तू म्हणजे विड्या व खाद्यपदार्थ. राजकीय कैदी आपल्या खर्चाने सेवा करणाऱ्या कैद्यांसाठी विड्या आणवीत असत. तसेच राजकीय कैद्यांनी खाऊन उरलेले अन्नही गुन्हेगार कैद्यांनाच वाटून दिले जाई. म्हणजे या सेवेकरी लोकांना चोरी करण्याचे काहीच कारण नव्हते. पंडित नेहरूंच्या दिमतीला एक कैदी दिलेला होता. तो कोठीच्या खोलीतून जिन्नस लांबवीत असे. या चोरलेल्या वस्तू तो कुठे ठेवायचा त्याचा पत्ता लागत नव्हता. एक दिवस बालकरामांनी या कैद्याची वस्तू लपविण्याची जागा शोधून काढण्याचा चंगच बांधला आणि संपूर्ण छावणीची झडती घेतली. आणि काय आश्चर्य! नेहरूंच्या खोलीतील कपड्यांच्या कपाटातच त्या कैद्याने चोरलेल्या जिनसा ठेवल्याचे आढळले!

छावणीत गमतीच्या बारक्या-सारक्या गोष्टी खूपदा घडून येत. एकदा दुपारच्या चहासाठी सर्व राजकैदी जेवण घरात टेबलभोवती बसले होते. टेबलावर एका थाळीत अंडी ठेवली होती. अचानक एका अंड्यातून एक पिलू बाहेर पडले! व उबवलेल्या अंड्यातून एका पिल्लाने जन्म घेतला हे पाहून सर्वांना आश्चर्य व आनंद यांचा धक्काच बसला! सर्व राजकैद्यांनी ते पिल्लू मोठ्या वात्सल्याने वाढवले. पिल्लू चांगले मोठे झाले. त्यानंतर ते पिल्लू एक शिपायाला देण्यात आले.

(४)

बालकराम हे तिन्ही त्रिकाळ राजकैद्यांच्या

सहवासातच असत. त्यांच्या सोबतच ते जेवत व उपाहारही घेत. तथापि या राजकीय बंदिवानांत राजकीय विषयांसंबंधी चर्चा झाल्याचा कोणताही उल्लेख त्यांच्या निवेदनात येत नाही. त्या काळात दुसरे महायुद्ध चालू होते. राजबंद्यांना हिंदुस्थानातील महत्त्वाची सर्व वर्तमानपत्रे वाचायला मिळत होती. पण युद्धातील डावपेचांविषयीही या नेत्यात काही बोलणे झाल्याचे बालकरामांनी सांगितलेले नाही. तथापि, या पुढाऱ्यांच्या बोलण्याला अनेकदा चुटके, आठवणी, आख्यायिका, लोककथा यांची फोडणी असे. बालकराम सांगतात की, मौलाना आझाद हे असे किस्से फार रंगवून सांगत. पंडित नेहरूही गोष्टी खुलवून सांगण्यात तरबेज होते.

एका संध्याकाळी सर्व जण गप्पा मारत बसले असता नेहरू अचानक खदखदा हसू लागले व 'गाझीमिया वही पार, वही पार !' असे ओरडून म्हणाले, असफ अली वगळता कोणालाही नेहरूंच्या वागण्यातली खुबी ध्यानात आली नाही. तेव्हा नेहरूंनी एक गोष्ट सांगितली, 'गाझीमियां नावाचा मुसलमान फकीर होता. त्याचे दोन शिष्य होते, एकदा हिंडता हिंडता ते तिघे एका ओढ्या पाशी आले, ओढ्याला पूर आला होता. पहिला चेला अल्ला मिया ओढा पार करण्यासाठी कालव्यात उतरला आणि वाहून गेला. दुसरा चेला नाझीमियां याची तीच गत झाली. आता गाझीमियाची पाळी आली. त्याने आपले कपडे शरीराभोवती व्यवस्थित गुंडाळून घेतले. देवाचे स्मरण केले आणि एका झेपेत ओढा ओलांडला ! तेव्हा पासून गावकरी लोक 'गाझीमिया वही पार, वही पार !' (फक्त गाझीमियाच ओलांडून गेला !) असे उरुसाच्या काळात एकदा तरी ओरडतात.

जवाहरलाल व त्यांचे वडील मोतिलाल १९२७ साली युरोपच्या सफरीवर असताना व्हिएन्नाला गेले. मोतिलालांना दम्याचा विकार होता. व्हिएन्नात दम्यावर उपचार करण्यात प्रवीण असणारा एक डॉक्टर होता, त्याला आपली प्रकृती दाखवायला मोतिलाल गेले. मोतिलाल व डॉक्टर यांच्यातील संभाषण दुभाष्याचे काम करणाऱ्या एका मुलीच्या मार्फत चालू होते. पाच हजार मैलावरून आलेल्या व दम्याचा त्रास बरीच वर्षे सहन करणाऱ्या मोतिलालांना साहजिकच वाटले की, आपल्या विकाराचा सारा तपशील डॉक्टरांना सांगितला पाहिजे; आणि डॉक्टरांना वाटत होते की, रोग्याने पाल्हाळ न लावता थोडक्यात माहिती द्यावी, तेवढ्यावरुन मी बरोबर निदान करू शकतो. डॉक्टरांनी दोन-तीनदा मोतिलालांना सुचवले की, 'थोडक्यात सांगा. मला वेळ नाही.' शेवटी थोड्या चिडलेल्या स्वरात डॉक्टर म्हणाला, 'अहो, तुम्हाला कशाचा त्रास होतोय ?' मोतिलाल आपला उद्वेग आवरून म्हणाले, 'सध्या तरी घाई लागलेल्या एका उतावळ्या आणि अगाऊ डॉक्टरचा मला त्रास होतो आहे !' दुभाषी मुलगी हसायलाच लागली. डॉक्टरने तिला कारण विचारल्यावर तिने मोतिलालांचे बोलणे डॉक्टरला सांगितले. डॉक्टरही हसू लागला. नंतर त्यांने मोतिलालांचे म्हणणे शांतपणे ऐकून घेतले. शेवटी डॉक्टरांने विचारले, 'तुमचा व्यवसाय कोणता ?' मोतिलालांनी जेव्हा सांगितले 'वकिली' तेव्हा डॉक्टर म्हणाला, 'मला वाटलेच होते'.

अहमदनगरच्या किल्ल्यातील राजबंद्यांची ही छावणी ऑगस्ट १९४२ पासून मार्च १९४५ पर्यंत अस्तित्वात होती. मार्च १९४५ च्या मध्याला मुंबई प्रांताच्या तुरुंग-खात्याच्या प्रमुखाकडून असा हुकूम आला की, 'काँग्रेस कार्यकारिणीच्या सदस्यांना त्यांच्या त्यांच्या प्रांतातील तुरुंगात पाठवावयाचे आहे. त्या त्या प्रांताकडून राजबंद्यांना घेऊन जाणारे अधिकारी कागदपत्रे घेऊन येतील त्यांच्या हवाली राजबंद्यांना करावे'.

सरकारला याची जाणीव होती की या थोर नेत्यांना दिवसा-ढवळ्या स्टेशनवर नेऊन गाडीत बसवले तर लोक गोळा होऊन मोठी निदर्शने होतील. त्यामुळे सरकारने अशी दक्षता घेतली की, या पुढाऱ्यांना नगर स्टेशनवर न नेता आगे-मागे कुठे आडलेल्या ठिकाणी गाडीत बसवावे, त्याप्रमाणे नेहरू, पंत व नरेंद्र देव यांना नगर जवळच्या बिळद स्टेशनवर गाडीत बसवले. सेंडक व बालकराम त्यांना निरोप द्यायला गेले होते. गुप्तता पाळली होती तरीही काही लोकांना कुणकूण लागली असावी. पाच-सहा खादीच्या पोषाखातील माणसे बिळद स्टेशनवर आली होती. नेहरूंना नमस्कार करण्यासाठी ती माणसे नेहरूंपाशी गर्दी करू लागली व पोलिस त्यांना दूर लोटू लागले. तेव्हा नेहरू पोलिसांना म्हणाले, 'उगीच बियरून जाऊ नका !' त्यांनी त्या पाच-सहा कार्यकर्त्यांशी हस्तांदोलन






केले व वाटेला लावले, बालकराम बंद्यांबरोबरच डब्यात चढले आणि गाडी सुटेपर्यंत तिघा पुढाऱ्यांबरोबर होते. या नेत्यांसाठी खास डबा व त्याला जोडलेले भोजनगृह होते.

(५)

नगरच्या किल्ल्यातील बंदिवास हा नेहरूंच्या आयुष्यातील सर्वात दीर्घ असा बंदिवास होता. नेहरू अनेकदा तुरुंगात गेले होते. काही तुरुंगवास पुष्कळच कष्टदायक होते. पण बत्तीस महिन्यांच्या तुरुंगवासाचा अनुभव त्यांच्यासाठी व त्यांच्या सहकाऱ्यांसाठी काही निराळाच होता. हे खरे होते की, बंदी-छावणीतील सगळ्यांचीच व्यवस्था सर्व सुखसोयींनी युक्त अशी होती. वाचायला हवी तितकी पुस्तके मागवता येत होती; वर्तमानपत्रे रोज येत होती; खाण्या-पिण्याची भक्कम तरतूद होती; सरकारच्या जाचक नियंत्रणातून का होईना पण पत्रव्यवहार करता येत होता; अकरा सहकाऱ्यांसोबत राहायचे असल्याने एकटेपणा जाणवण्याचे कारण नव्हते. आपल्या माणसांना भेटता येत नव्हते, ही मात्र अडचण होती.

नेहरूंच्या बाबतीत बोलायचे तर तीन सप्टेंबर एकोणचाळीस रोजी दुसरे महायुद्ध सुरू झाल्यापासून नेहरूंची अवस्था कुचंबल्यासारखी झाली होती. जर्मनी, इटली या हुकुमशाही राष्ट्रांविषयी त्यांना काडीचीही आस्था वाटत नव्हती. क्रूर, युद्धप्रवण आणि वंशविद्वेषवादी अशा फॅसिस्ट राजवटी म्हणजे जगावर आलेले भयाण संकट आहे अशी त्यांची खात्री पटली होती. पण त्याचबरोबर इंग्लंडसारख्या साम्राज्यवादी शक्तीला या युद्धात पाठिंबा द्यावा असेही त्यांना वाटत नव्हते. युद्ध सुरू झाले तेव्हा नेहरू चीनमध्ये होते. चीनवर चाललेल्या जपानच्या भीषण आक्रमणाचा त्यांना अनुभव आलेला होता. युद्ध सुरू होताच व्हाइसरॉय लिनलिथगोने गांधींची भेट घेतली होती. त्या वेळी गांधीजींनी इंग्लंडला-व दोस्त राष्ट्रांना- बिनशर्त पाठिंब्याची तयारी दाखवली होती. पण नेहरू चीनहून तातडीने परतले आणि त्यांनी विना-अट पाठिंब्याचे धोरण बदलून टाकले. युद्धानंतर हिंदुस्थानला स्वातंत्र्य देण्याचे आश्वासन द्यावे, तरच काँग्रेसचा युद्ध-प्रयत्नांना पाठिंबा राहील, असा ठराव काँग्रेसने केला. इतकेच नव्हे तर हिंदी लोकमत विचारात न घेता व्हाईसरॉयने जर्मनीविरूद्धच्या युद्धात हिंदुस्थानला गुंतवल्याचा निषेध म्हणून आठ प्रांतांतील काँग्रेसच्या मंत्रिमंडळांनी ऑक्टोबर १९३९ च्या अखेरीला राजीनामे दिले.

त्या नंतर काँग्रेसची दुरवस्था वाढतच गेली. लिनलिथगोने काँग्रेस व मुस्लिम लीग या पक्षांना केवळ समानतेनेच वागणूक दिली. इतकेच नव्हे तर इथून पुढे हिंदुस्थानला ज्या राजकीय सुधारणा द्यावयाच्या त्यांना मुस्लिम समाजाची मान्यता मिळाल्यानंतर त्या दिल्या जातील, असे जाहीर केले. एकोणीसशे चाळीसच्या दहा मेला इंग्लंडमध्ये राष्ट्रीय मंत्रिमंडळ स्थापन झाले. या मंत्रिमंडळात 'मजूर पक्षा' ला महत्त्वाचे स्थान होते. हा पक्ष हिंदुस्थानाविषयी सहानुभूती पाळणारा व काँग्रेसशी जवळीक ठेवणारा पक्ष होता. त्यामुळे काँग्रेसला, व मुख्यतः नेहरूंना, असे वाटू लागले की, मजूर पक्ष मंत्रिमंडळावर दबाव आणून हिंदुस्थानाला काही आश्वासने देण्यास ब्रिटिश सरकारला भाग पाडील. एक्केचाळीसच्या डिसेंबरात जपानने अमेरिकेच्या पर्ल हार्बर या नाविक तळावर हल्ला चढवला व इंग्लंड आणि अमेरिका यांच्या विरूद्ध युद्ध पुकारले. त्या पाठोपाठ जर्मनी-इटली यांनी अमेरिकेविरूद्ध युद्ध पुकारले. युरोपातील लढाईकडे आपण अधिक नेटाने लक्ष देणार असे अमेरिकेने जाहीर केले.

अमेरिका हेही साम्राज्यशाहीच्या विरोधी राष्ट्र होते. जपानशी जी लढाई व्हावयाची तिच्या डावपेचात हिंदुस्थानाला फार महत्त्व होते. सैन्याची रसद, जवानांची भरती, सरकाराची छावणी या सगळ्यासाठी हिंदुस्थानाच्या भूमीचा व मनुष्यबळाचा खूप उपयोग होणार होता. त्यातून आशियातील युद्ध मुळात सुरू झाले ते जपानने चीनवर केलेल्या आक्रमणामुळे. चीनच्या व दोस्तांच्या सैन्याला पाठबळ मिळायचे ते हिंदुस्थानातील लष्करी सामर्थ्यातून. त्यामुळे चीन व अमेरिका या दोन्ही देशांचा लकडा ब्रिटिश सरकारमागे लागला होता की, काही करून हिंदुस्थानातील लोकांना राजी ठेवा. हिंदुस्थानी राजवटीत लोकप्रतिनिधींचा समावेश करा. त्यांना युद्धानंतर राजकीय सुधारणा देण्याचे आश्वासन द्या. तेव्हा मुख्यतः अमेरिकेची समजूत पटावी म्हणून इंग्लंडच्या मंत्रिमंडळातील महत्त्वाचा

मंत्री आणि मजूर पक्षाचा आघाडीचा पुढारी असणारा स्टॅफोर्ड क्रिप्स याला मार्च १९४२ मध्ये हिंदुस्थानातील पुढाऱ्यांशी चर्चा करायला ब्रिटिश सरकारने पाठविले. क्रिप्सने दोन प्रस्ताव आणले होते. तात्कालिक व भविष्यकालीन. तात्कालिक प्रस्तावानुसार व्हाइसरॉयच्या कार्यकारिणीतील सर्व सदस्य (खुद्द व्हॉइसरॉय व सेनाप्रमुख वगळता) हिंदी असावेत व त्यांनी इंग्लंडमधील मंत्रिमंडळाच्या पद्धतीने राज्यकारभार हाताळावा, अशी तरतूद होती. नेहरूंना व काँग्रेसच्या इतर नेत्यांना हा प्रस्ताव स्वीकारार्ह वाटला. पण संरक्षण खात्यावर हिंदी मंत्री नेमावा का, व त्याला कोणते अधिकार असावेत या प्रश्नावरून बोलणी मोडली व क्रिप्स परत गेला.

गोष्ट अशी होती की, पंतप्रधान चर्चिल, भारतमंत्री ॲमेदी व व्हॉइसरॉय लिनालिथगो यांना वाटत होते की, हिंदुस्थानातील ब्रिटिश सत्ता आणखी कित्येक दशके चालू ठेवता येणार आहे. काँग्रेसपक्षाची लोकप्रियता कितीही असली तरी त्या पक्षाचा विरोध पत्करूनही युद्धप्रयत्न उत्तम रीतीने चालू शकतात. देशात गरिबी अफाट होती; त्यामुळे सैन्यभरतीला खीळ बसणे शक्य नव्हते, युद्धकालीन वाढीव किंमतीला सैन्याला उपयोगी अशी सामग्री पुरवायला भांडवलदार व कारखानदार उत्सुक होते. सारांश, नवीन राजकीय सुधारणा देण्याची कोणतीच आवश्यकता नव्हती. अमेरिका व चीन यांची समजूत घालण्यासाठी क्रिप्सच्या शिष्टाईचा खेळ साम्राज्यवाद्यांनी करून बघितला होता. तो इतका यशस्वी झाला की, पुढे 'चले जाव' आंदोलनात सरकारने केलेल्या दडपशाहीविरुद्ध अमेरिकेत अजिबात नाराजी व्यक्त झाली नाही.

खुद्द काँग्रेसची इच्छाही युद्धप्रयत्नांना परिणामकारक विरोध करण्याची नव्हती. त्यामुळेच १९४० साली काँग्रेसने युद्ध-प्रयत्न-विरोधी भाषणे करण्याचा सत्याग्रह व्यक्तिगत स्वरूपात सुरू केला; त्याला सामुदायिक रूप दिले नाही. क्रिप्स येऊन गेल्यावर जपानी आक्रमणाचा जोर वाढला. जपानने अंदमान-निकोबार बेटे जिंकून घेतली. सिंगापूर जिंकले. ब्रह्मदेशातून उत्तरेकडे सरकत हिंदुस्थानच्या ईशान्येकडील भागात शिरण्यापर्यंत जपानची मजल पोचली. ब्रिटिशांना जेथून माघार घ्यावी लागली त्या भागातील लोकांना तेथून हलविण्याची किंवा त्यांना जपान्यांशी लढता यावे म्हणून हत्यारे देण्याची कोणतीच काळजी ब्रिटिशांनी घेतली नाही. गांधींनी आपल्या अंतेवासी मीराबेन (या ब्रिटिश बाई ब्रिटिश आरमारातील ज्येष्ठ अधिकाऱ्याच्या कन्या होत्या.) यांना बंगाल, ओडिसा या प्रांतात पाहाणीसाठी पाठविले. त्यांचा अहवाल असा होता की, जपानी आक्रमण झाल्यास इंग्रज सरकार दग्धभू धोरण अवलंबणार असून नद्यांवरचे पूल व इतर रस्ते उखडून टाकणार आहे. स्थानिक जनता जपानच्या आक्रमणकारी सैन्याची बळी होणार आहे.

यामुळे गांधींनी असे ठरविले की, ब्रिटिशांच्या युद्धप्रयत्नांसंबंधात आजवर जे सौम्य-विरोधाचे धोरण काँग्रेसने ठेवले होते, ते उपयोगाचे नाही. आता काँग्रेसने स्वातंत्र्याची मागणी करावी व स्वतंत्र हिंदुस्थानच जपानचा परिणामकारक प्रतिकार करू शकेल असे निक्षून जाहीर करावे. त्याच बरोबर, स्वतंत्र झालेला हिंदुस्थान ब्रिटिशांचे दोस्त राष्ट्र म्हणूनच राहील; तो ब्रिटिशांशी मैत्रीचा करार करून त्यांचे सैन्य युद्धाच्या काळापुरते हिंदुस्थानात ठेवायला परवानगी देईल असे आश्वासनही काँग्रेसने द्यावे, असे गांधीजींचे म्हणणे होते. अशा आशयाचा ठराव काँग्रेस कार्यकारिणीने जुलै १९४२ मध्ये मंजूर केला व तोच पंडित नेहरूंनी ऑगस्ट महिन्यात अ. भा. काँग्रेस समितीसमोर मुंबईत मांडला.

हा सर्व वैचारिक प्रवास इतका गुंतागुंतीचा होता व ठराव मंजूर झाल्यानंतर करावयाच्या आंदोलनाचे स्वरूप इतके अंधुक होते की, सर्वच पुढारी गोंधळून गेले होते. एकच मार्ग काहीसा आश्वासक होता. तो असा की, गांधीजींनी एका हाताने आंदोलनाचे शस्त्र उगारले होते व दुसरा हात वाटाघाटींसाठी पुढे केला होता. वाटाघाटी सुरू झाल्या असत्या तर क्रिप्सशी झालेली बोलणी जिथे तुटली तेथून पुढे काही प्रगती होऊ शकली असती व व्हॉइसरॉयच्या कार्यकारिणीत जाण्याचा रस्ता खुला झाला असता. अशा वाटाघाटींच्या वेळी अमेरिका, चीन व इंग्लंडमधील मजूर पक्ष यांनीही आपले वजन वापरले असते. नेमकी हीच गोष्ट चर्चिल, ॲमेदी व लिनलिथगो या साम्राज्यवाद्यांना नको होती. म्हणून 'चले जाव' चा ठराव झाल्यावर ९ ऑगस्ट

१९४२ च्या पहाटेच सर्व काँग्रेस कार्यकारिणीला अटक करण्यात आली. या सर्व हकिकतीचा तटस्थपणे विचार करणाऱ्यांना असेही वाटते की, काँग्रेसच्या पुढाऱ्यांना देखील तत्कालीन कोंडीतून सुटका करून घेण्याची ही युक्तीच वाटली असेल. एस्. गोपाळ यांनी सुद्धा म्हटले आहे की, 'या पुढाऱ्यांनी पळवाट म्हणून तुरूंगवास पत्करला.'

बालकराम यांनी या पुढाऱ्यांच्या तुरूंगवासाचे जे वर्णन केले आहे, त्यावरून असाच समज होतो की, या बंदिवासातून सुटण्याची अजिबात आतुरता नव्हती. आपली मुक्तता कधी होईल, कोणत्या परीस्थितीत होईल व मोकळे झाल्यावर आपण काय करू या मुद्यांची कोणतीही चर्चा कधी होत नसे. कितीही काळ तुरूंगात राहाण्याची त्यांची तयारी होती, असे बालकरामांचे मत होते.

बालकरामांना आपल्या राजकीय कैद्यांविषयी केवढा भरवसा वाटत होता याबद्दलचा एक उल्लेख फार मार्मिक आहे. ९ ऑगस्ट १९४३ या दिवशी या पुढाऱ्यांच्या अटकेला एक वर्ष पुरे होत होते. त्या वेळी सरकारला काळजी वाटू लागली की, मोठ्या प्रमाणावर जनसमुदाय गोळा होऊन नगरच्या किल्ल्यावर हल्ला करील व या पुढाऱ्यांना सोडवील. सरकारकडून तशा सूचना नगर-किल्ल्यातील उच्चाधिकाऱ्यांना आल्या. खरे तर नगर किल्ला लष्कराच्या ताब्यात होता व फक्त गोरे सोल्जर्सच किल्ल्यात होते. काळजीचे कारण नव्हते. पण कर्नल सेंडक अस्वस्थ झाला. त्या वेळी बालकराम त्याला म्हणाले, 'आपले राजबंदी इतके सरळमार्गी आहेत की, त्यांना सोडवायला आलेल्या जमावाला ते परत जायला सांगतील!'

(माय रेमिनिसन्स ऑफ दि अहमदनगर फोर्ट ड्यूरिंग द यिअर्स १९४२-१९४५, -बालकराम जी. मेहता. (अप्रकाशित)-१९६०.)





अनुक्रमणिका






# पं. नेहरूंचे योगदान

किशोर महाबळ

आर्थिक, सामाजिक, शैक्षणिक क्षेत्रातील मागासलेपण व विषमता, जमातवाद, जातीयता, सार्वजनिक उद्योगांचे अपयश, भ्रष्टाचार, परराष्ट्र संबंधांतील अपयश, अशा देशातील सध्याच्या सर्व समस्यांना जवाहरलाल नेहरूच जबाबदार आहेत हे दाखविण्याची नवी फॅशन गेल्या काही वर्षांत अत्यंत लोकप्रिय झाली आहे. नुकत्याच एका मुलाखतीत तर डॉ. अमर्त्य सेन यांनी प्राथमिक शिक्षणावर अधिक खर्च करण्याची भूमिका न घेतल्याबद्दल जवाहरलाल नेहरूंवर टीका केली. नेहरूंनी काय केले नाही, काय करायला पाहिजे होते, ते कसे चुकले, त्यांचे सर्व निर्णय हे देशासाठी कसे हानिकारक ठरले याची चर्चाही आवर्जून केली जाते. काही अपवाद वगळता सर्व क्षेत्रातील तज्ज्ञ, संगठित क्षेत्रातील बँक कर्मचाऱ्यांसारखे नोकरदार, उच्चपदस्थ नोकरशहा, उच्चवर्गीय व उच्चवर्णिय समाजातील लोक, कोणत्याही विषयाचे विशेष ज्ञान नसलेले सर्वसामान्य असे सारे जण नेहरूंवर टीका करतांना दिसतात. त्यामुळे एकेकाळी गांधींनंतरचे देशातील सर्वात लोकप्रिय नेते असलेले नेहरू हे आजकाल मात्र सतत आरोपीच्या पिंजऱ्यात उभे केले जातात. यामुळे नेहरूंच्या आधुनिक भारताच्या जडणघडणीतील भूमिकेकडे पूर्ण दुर्लक्ष होतांना दिसते.

नेहरूंच्या काळाच्या संदर्भात त्यांच्या योगदानाची चर्चा होण्यापेक्षा ती आजच्या परिस्थितींच्या संदर्भात होत असल्याने नेहरूंवर केलेली कोणतीही टीका ही बरोबर आहे असे वाटणे साहजिकच आहे, कारण ज्या प्रश्नांच्या सोडवणुकीसाठी त्यांनी संस्था उभारल्या, योजनांची पायाभरणी केली, त्या संस्था आणि योजना या देशातील सर्व लोकांचे प्रश्न सोडविण्यांत अपयशी ठरल्याचा सार्वत्रिक अनुभव येत असतो. त्यांच्यातील स्वप्नाळू आदर्शवादी नेत्याने घेतलेले चीन आणि पाकिस्तान संबंधातील निर्णय हे देशाला फार महाग पडले हेही विसरता येत नाही. यामुळेच कदाचित आजकाल नेहरूं बद्दल काही चांगले बोलणे हे दुर्मिळ झाले आहे. काँग्रेस पक्ष आणि त्या पक्षाचे नेतेही नेहरूंच्या योगदानाबद्दल फारसे काहीच बोलतांना दिसत नाहीत. असे असले तरीही स्वातंत्र्योत्तर भारताच्या जडणघडणीचा अभ्यास करणाऱ्या कोणालाही नेहरूंचे योगदान दुर्लक्षिता येत नाही इतके ते महत्त्वाचे आहे.

नेहरूंनी इतर स्वातंत्र्य सैनिकांप्रमाणेच स्वातंत्र्य आंदोलनात सक्रिय भाग घेतला, तुरूंगवासही सोसला. मात्र त्याचबरोबर स्वातंत्र्य प्राप्तीनंतरच्या भारताची जडणघडण कशी करायची याचाही बारकाईने विचार करणे सुरू केले होते. भारतातील सामाजिक, आर्थिक, राजकीय, धार्मिक, सांस्कृतिक वास्तवाचे आकलन करून घेतांनाच त्यातील काय टिकवायचे व काय नाकारायचे याबद्दलची त्यांची मते याच काळात निश्चित होत होती. ती ते भाषणांतून आणि लिखाणातून सातत्याने मांडत होते. त्यांना पाश्चात्य जगतातील प्रगती, विकास, आधुनिक जीवनशैली व समृध्दीचे आकर्षण होते. पण या देशांचा साम्राज्यवाद, वसाहतवाद व वर्णभेदाला असलेले समर्थन मात्र अमान्य होते. तसेच साम्यवादी देशांचे मार्क्सच्या कल्पनेतील आर्थिक समता प्रस्थापित करण्यातील यश आकर्षित करीत असे मात्र त्या देशातील साम्यवादी पक्षांची हुकुमशाही व मूलभूत हक्कांची पायमल्ली अमान्य होती. लोकशाही राज्यव्यवस्था स्वीकारणाऱ्या मात्र आर्थिक समतेचे उद्दिष्ट साध्य करण्यास कटिबद्ध असलेल्या लोकशाही समाजवादाचे त्यांना आकर्षण होते. धर्मातील मानवतावादी मूल्ये जरी त्यांना स्वीकारार्ह वाटत असली तरीही धर्माच्या नावावर चालणारे शोषण व अंधश्रद्धा आणि अलौकिक शक्तींची पूजा अशा कर्मकांडास विरोधच होता. ग्रामीण जीवनापेक्षा शहरी आधुनिक जीवनशैली त्यांना जास्त स्वीकारार्ह होती. नवभारताची जडणघडण ही प्राधान्याने पाश्चिमात्य जगातील

अनुक्रमणिका






विचार, जीवनशैली, औद्योगिक प्रगती, विज्ञान व तंत्रज्ञानाचा पुरेपुर उपयोग करून घडवून आणलेल्या विकास या प्रारूपानुसार व्हावी असे त्यांचे मत असल्याने म. गांधींचे नेतृत्व स्वीकारतांनाच त्यांच्या बहुतांश विचारांना मात्र नेहरूंचा पाठिंबा नव्हता. अवजड उद्योग, ऊर्जा निर्मिती, मोठी धरणे, कृषी क्षेत्रात विज्ञानाचा पुरेपूर उपयोग करून उत्पादन वाढविणे, या गोष्टी देशाच्या विकासासाठी तातडीने करणे त्यांना आवश्यक वाटत असे.

भारत हा एक बहुधर्मिय, बहुजातीय, बहुभाषिक, बहुसंस्कृती असलेला देश असून बहुसंख्यांकांप्रमाणेच अल्पसंख्यही याच देशाचे अविभाज्य घटक आहेत. देशात संस्थानांच्या माध्यमातून राजेशाही प्रचलित आहे, नागरिकांना कोणतेही मूलभूत अधिकार नाहीत, लिखित संविधान नाही, सर्व देशासाठी समान कायदे नाहीत, राज्य व्यवस्थेत जनतेचा सहभाग नाही, या समाजात अस्पृश्य व स्त्रियांना अत्यंत अमानुषपणे वागविले जाते, अमानवीय विषमतेला पोषक अशा कालबाहय परंपरा, चालीरीती आहेत. जातीजातीत विभागलेला समाज आहे. देशात टोकाची आर्थिक विषमता आहे. जमीनदारी, वेठबिगारीस पोषक अशी विषमताधिष्ठित अर्थव्यवस्था आहे. कष्टकऱ्यांच्या अधिकारांचे संरक्षण करणारे कायदे नाहीत. त्यामुळे त्यांचे पराकोटीचे शोषण होते. खूप मोठ्या संख्येतील लोक विपन्नावस्थेत राहतात. मध्ययुगीन काळातील आर्थिक संरचना तशाच टिकून आहेत. अनेक प्रकारच्या अंधश्रदधांनी समाजग्रस्त आहे - आधुनिक विज्ञानाचे शिक्षण नसल्याने व आधुनिक तंत्रज्ञानाचा अत्यल्प उपयोग होत असल्याने मागासलेपण टिकून राहिले आहे. देशात औद्योगिकरण झालेले नाही. ऊर्जा निर्मिती अत्यल्प आहे. शेती ही मुख्यत्वे पावसाच्या पाण्यावर अवलंबून असल्याने उत्पादन कमी आहे. रोगराई व साथीच्या रोगांमुळे दरवर्षी हजारो माणसे मृत्यूमुखी पडतात. सामाजिक, आर्थिक क्षेत्रात पराकोटीची विषमता आहे व त्यामुळे अन्याय अत्याचाराला हजारो नागरिक बळी पडतात. जागतिक स्तरावरील साम्राज्यवाद, वसाहतवाद, वंशवाद यामुळे भारतासारखे आशियातील आणि आफ्रिकेतील असंख्य देशातील हजारो नागरिकांचे अक्षम्य शोषण सुरू आहे, हे व अन्य अनेक प्रश्न नेहरूंनी लक्षात घेतले. या पार्श्वभूमीवर आधुनिक समताधिष्ठित भारताच्या जडणघडणीसाठी काय करायला हवे याचाही नेहरू विचार करीत होते. त्या काळात इतक्या प्रश्नांचा अभ्यास व विचार करणारे नेते दुर्मिळच होते. त्यात नेहरूंचा समावेश होता हे लक्षात घेतले पाहिजे.

स्वातंत्र्य आंदोलन सुरू असतांनाच स्वातंत्र्य प्राप्तीनंतर कॉंग्रेसची या विविध प्रश्नांच्या सोडवणुकीबद्दल काय भूमिका असेल ते मांडण्यास नेहरूंनी सुरुवात केलेली दिसते. १९३१ च्या कॉंग्रेस अधिवेशनातच स्वतंत्र भारतात सर्व नागरिकांना मूलभूत अधिकार मिळतील व अल्पसंख्यांकांचे अधिकार संरक्षिले जातील असा ठराव मांडून त्यांनी तो पारित करून घेतला. असेच अनेक ठराव नंतरच्या अधिवेशनात करण्यात आले व त्यातून संविधानात कोणत्या बाबी असाव्यात याचीही नोंद करण्यात आली. प्रत्यक्ष संविधान निर्मितीची प्रक्रिया सुरू झाल्यावर कॉंग्रेसच्या इतर नेत्यांबरोबरच त्यांनी संविधानाचा मसुदा संविधान सभेत पारित करून घेण्यात महत्त्वाची भूमिका बजावली. डॉ. आंबेडकरांना कॉंग्रेसचे सहकार्य मिळावे यासाठीही प्रयत्न केले. आधुनिक भारतातील राज्यव्यवस्था ही धर्मनिरपेक्ष असावी, अस्पृश्यता नष्ट व्हावी, महिला अस्पृश्य व अल्पसंख्यांक यांना समान दर्जा आणि समान संधी मिळावी, वेठबिगारी आणि जमिनदारी संपुष्टात आणण्यासाठी संविधानातच तरतूद करण्यात त्यांनी डॉ. आंबेडकरांना सहकार्य केले.

संविधानाच्या निर्मितीनंतर अन्य अनेक कायदे करण्यात त्यांनी पुढाकार घेतला व समताधिष्ठित समाजाच्या निर्मितीसाठी प्रयत्न केले. पंतप्रधान म्हणून हिंदू कोड बिल पारित करून घेतांना मात्र त्यांची कसोटी लागली. हिंदू कोड बिलाच्या निमित्ताने डॉ. आंबेडकरां-बरोबर नेहरूंनी भरपूर प्रयत्न केले, अनेकदा बैठका घेतल्या. विरोधकांच्या मागण्या, सूचना या बिलात कशा समाविष्ट करता येतील याचा विचार केला. मात्र हे करतांना हिंदू स्त्रियांना समानतेचा अधिकार मिळण्याचे उद्दिष्ट डावलले जाणार नाही याची पुरेपूर काळजी घेतली. हे सारे प्रयत्न करूनही पहिल्या टप्प्यात राजेंद्र

प्रसादांसारख्यांचा विरोध असल्याने नेहरूंना हिंदू कोड बिल पारित करून घेता आले नाही. या मुद्यावरून डॉ.आंबेडकरांनी राजीनामा दिला. मात्र नेहरूंनी अशी भूमिका न घेता अधिक चिकाटीने त्यानंतर झालेल्या लोकसभा निवडणुकीत हाच मुद्दा लावून धरला. बहुमताने निवडून आल्यावर त्यांनी न विसरता हिंदू कोडबिलातीलच सर्व कायदे स्वतंत्रपणे संसदेत पारित करून घेतले. हिंदुंच्या व्यक्तिगत कायद्यात कालानुरूप योग्य ते बदल करण्याचे व स्त्रियांना समान वागणुकीची शाश्वती देणारे कायदे करण्याचे उद्दिष्ट त्यांनी साध्य केलेच. लोकमताचे नाव घेत सामाजिक सुधारणांना विरोध करण्याऐवजी हिंदू व्यक्तिगत कायद्यात मूलभूत स्वरूपाच्या सुधारणा करण्यात पुढाकार घेऊन त्याद्वारे हिंदू स्त्रियांना शेकडो वर्षांच्या इतिहासात प्रथमच एवढे व्यापक स्वरूपाचे अधिकार नेहरूंनी मिळवून दिले. बहुमत आपल्या विरोधी जाईल या भितीने व लोकमताच्या नावावर हा विषय त्यांना सहजच बाजूला टाकता आला असता. ते त्यांनी केले नाही उलट तो विषय महत्त्वाचा मानला. हिंदू स्त्रियांच्या समान अधिकारांसाठी नेहरूंनी केलेले हे कार्य अत्यंत महत्त्वाचे असूनही या योगदानाकडे दुर्लक्षच केले जाते. मुस्लिम स्त्रियांसाठी नेहरू असे कार्य करू शकले नाहीत हे त्यांचे अपयश मान्य करावेच लागेल. पण बहुसंख्य समाजातील अशा सुधारणांना विरोध करणाऱ्यांचा सामना करीत सुधारणा घडवून आणण्यासाठी कायदा करण्याचे त्यांचे कार्य दुर्लक्षून चालणार नाही.

गांधी आणि त्यांचे अनुयायी हे आधुनिक औद्योगीकरणास व तंत्रज्ञानास विरोध करणारे होते व त्यांचा काँग्रेसमध्ये मोठा दबावगट होता. या दबावगटासमोर न झुकता नेहरूंनी विज्ञान आणि तंत्रज्ञानाचा उपयोग वाढावा यासाठी प्रयत्न करण्यास सुरुवात केली. विज्ञानाचे शिक्षण देणारी महाविद्यालये सुरू करण्यास प्राधान्य दिले. तंत्रज्ञानाचे शिक्षण देणाऱ्या आय. आय. टीसारख्या अभियांत्रिकीचे शिक्षण देणाऱ्या शैक्षणिक संस्था स्थापन करण्यात पुढाकार घेतला. दुसऱ्या महायुद्धात अणुशक्तिचा दुरूपयोग झाला. मात्र हीच शक्ती सकारात्मक कार्यासाठीही उपयोगात आणता येऊ शकते हे लक्षात घेऊन नेहरूंनी अणु संशोधन संस्थेची स्थापना केली. इंडियन इन्स्टिटयूट ऑफ मेडिकल सायन्सेस या सारख्या वैद्यकीय शिक्षण देणाऱ्या संस्थांची स्थापना करण्यात पुढाकार घेतला. राष्ट्रीय वैज्ञानिक प्रयोग शाळांची स्थापना, अंतराळ संशोधना सारख्या त्यावेळच्या नव्या ज्ञान शाखेत भारतानेही प्रगती करावी या उद्देशाने निर्माण केलेली भारतीय अंतराळ संशोधन संस्था हेही नेहरूंचे महत्त्वाचे कार्य होते. यासाठी सी. व्ही. रमण, विक्रम साराभाई, सतिश धवन, हुमायुन कबीर, होमी भाभा या सारख्या विद्वानांना पूर्ण सहकार्य केले. त्यामुळे भारतात जागतिक दर्जाच्या संस्था अस्तित्वात आल्या. विज्ञान, तंत्रज्ञान, अभियांत्रिकी क्षेत्रात भारताने केलेल्या प्रगतीची सुरुवात नेहरूंमुळेच झाली हे लक्षात घेतले पाहिजे. विज्ञानाचा प्रसार, वैज्ञानिक दृष्टिकोन, विज्ञान व तंत्रज्ञानाचा कृषी व अन्य क्षेत्रात उपयोग वाढावा असा त्यांचा प्रयत्न होता. ही त्यांची भूमिका आधुनिक भारताच्या जडणघडणीत मौलिक महत्त्वाची ठरली.

कृषी, शिक्षण, अशा सर्व क्षेत्रांत प्रगती होण्यासाठी नियोजनबद्ध प्रयत्न केले पाहिजेत याचा विचार करून पंचवार्षिक योजनांची अंमलबजावणी व नियोजन आयोगाची स्थापना नेहरूंनीच केली. याशिवाय कामगारांच्या हितसंबंधांचे संरक्षण करणारे कायदेही त्यांच्याच सरकारने केले. त्यामुळे देशात प्रथमच कष्टकऱ्यांच्या अधिकारांचे संरक्षण करण्याची सुरुवात झाली. देशाच्या विकासासाठी काय केले पाहिजे याचा दूरदृष्टीने विचार करून हे सर्व निर्णय घेतलेले होते. समाजातील दुर्बल घटकांसाठी आरक्षणाची तरतूद संविधानात केलेली होती. पण त्याची अंमलबजावणी करण्यास नेहरूंच्याच सरकारने सुरुवात केली. या दुर्बल घटकांना शिक्षण, आरोग्याच्या सोयी निःशुल्क मिळाव्यात यासाठी त्यांच्याच सरकारने पुढाकार घेतला. हे सारे अभूतपूर्वच होते.

द्वितीय महायुद्धानंतर शीतयुद्धाच्या काळात भारताने एकतर साम्यवादी देशांच्या किंवा अमेरिकेच्या गटात सामील व्हावे असा सल्ला दिला जात असतांना नेहरूंमुळेच भारताने अलिप्ततावाद स्वीकारला. कोणत्याही गटात सहभागी होऊन शीतयुद्धाला खतपाणी घालून युद्ध व शस्त्रास्त्रस्पर्धेत सहभागी व्हायचे नाही हा निर्णय

अत्यंत उपयुक्त ठरला. दोन्ही गटांशी मैत्रीचे संबंध ठेवू मात्र त्यांच्यातील संघर्षात तटस्थ भूमिका घेऊ अशी भारताने भूमिका घेतली. त्याशिवाय जगातील वसाहतवाद, साम्राज्यवाद व वर्णभेद यांना विरोध करून आफ्रिका आणि आशियातील परतंत्र देशांच्या स्वातंत्र्याचा मुद्दा जागतिक स्तरावर मांडण्यात अलिप्ततावादी चळवळ यशस्वी ठरली. नेहरूंमुळेच हे शक्य झाले. स्वातंत्र्य मिळताच अशी भूमिका घेणे व कोणत्याही महाशक्तिच्या प्रभावामुळे तिच्या गटात सहभागी होण्यासाठी येणारे दडपण नाकारणे नेहरूंमुळेच शक्य झाले. अलिप्ततावादी चळवळीचे तत्त्वज्ञान, भूमिका, कार्यपद्धती ठरविण्यात व मागासलेल्या देशांचे संघटन करण्यातील नेहरूंची भूमिका अत्यंत महत्त्वाची होती.

साहित्य, संस्कृती, कलेच्या क्षेत्रातही मौलिक कार्य व्हावे या उद्देशाने नेहरूंच्या कार्यकाळातच संगीत नाटक अकादमी, साहित्य अकादमी, ललित कला अकादमी यासारख्या संस्था स्थापन करण्यात आल्या. देशातील विविध भाषांमधील साहित्याचा अन्य भाषांत अनुवाद करणे, या सारखे असंख्य उपक्रम या संस्थांच्या वतीने सुरू करण्यात आले. चित्रकला, शिल्पकला, स्थापत्य व इतर कलांच्या अभ्यास व संशाधनासाठी ललित कला अकादमी स्थापन करण्यात आली व भारतीय नृत्य, नाट्य व संगीत या कलांना उत्तेजन देण्यासाठी संगीत नाटक अकादमी स्थापन करण्यात आली. नॅशनल बुक ट्रस्टच्या माध्यमातून भारतीय भाषांतील साहित्य ग्रंथ, अशा ग्रंथांचा इतर भाषांमध्ये अनुवाद प्रकाशित करण्यास सुरुवात झाली. याशिवाय लहान मुलांसाठी बालसाहित्य प्रकाशित करणारी व इतर उपक्रम घेणारी बाल साहित्य निधी - चिल्ड्रन्स बुक ट्रस्ट - अशा संस्था निर्माण करण्यात आल्या. विद्यापीठांतील उच्च शिक्षणाचा दर्जा राखण्याच्या उद्देशाने विद्यापीठ अनुदान आयोगाची स्थापना केली गेली. या सर्व संस्थांच्या स्थापनेत व विकासात नेहरूंनी आवर्जून लक्ष घातले. या संस्थांसाठी निधी उपलब्ध करून देणे हे केंद्र शासनाची जबाबदारी आहे असे मानले व त्यानुसार संबंधित मंत्रालयांना ती जबाबदारी दिली हे विशेष मानले पाहिजे. हे अत्यंत मूलभूत असे कार्य होते.

स्वातंत्र्यानंतर भारतीय परंपरेला पूर्णतः अपरिचित असलेली सर्व नागरिकांना मूलभूत हक्क बहाल करणारी, स्वातंत्र्य, समता, बंधुता व सामाजिक आर्थिक व राजकीय न्याय अशी उद्दिष्टे असलेली कल्याणकारी लोकशाही राज्यपद्धती स्वीकारण्यात आली. संसद व राज्यांच्या स्तरावरील विधिमंडळे, सर्वोच्च न्यायालय आणि त्याखालील सर्व न्यायालये यांची भारतीय संविधानानुसार पुनर्रचना करण्यात आली. या संस्थांच्या माध्यमातून भारतात लोकशाही राज्यव्यवस्था रुजावी, नागरिकांच्या मूलभूत हक्कांचे संरक्षण व्हावे. यासाठी लोकशाहीस पूरक प्रथा, परंपरा व राजकीय संस्कृती विकसित होण्यासाठीही नेहरूंनी विशेष प्रयत्न केले. संविधानातील तरतुदींची अंमलबजावणी करून समताधिष्ठित शोषणमुक्त भारताच्या निर्मितीसाठी जे जे करता येईल ते ते करण्याचा नेहरूंचा प्रयत्न होता. नेहरूंनी आधुनिक भारताच्या निर्माणात अशी महत्त्वाची भूमिका बजावली. मात्र एवढेच पुरेसे नाही याची त्यांना जाणीव होती. देशातील हिंदु- मुस्लिमांमध्ये ऐक्य आणि एकात्मता टिकवून ठेवण्यात अपयश आल्याने देशाची फाळणी झाली होती. अशावेळी जमातवाद, विविध धर्म समूहांतील वारंवार होणारे संघर्ष बघता फक्त कायद्याने ऐक्य आणि एकात्मतेवर आधारित राष्ट्र घडविता येणे नेहरूंना शक्य वाटत नव्हते. आर्थिक आणि सामाजिक विषमता दूर झाल्यास जमातवाद संपुष्टात येईल असे ते मानत होते. पण त्याशिवाय स्वातंत्र्य आंदोलनाच्या काळात त्यांनी मांडलेल्या संमिश्र राष्ट्रवादाचे संस्कार जनमानसावर करीत राहणे हे त्यांना गरजेचे वाटत होते.

स्वातंत्र्य आंदोलनात मुस्लिम आणि हिंदू जमातवाद वाढीस लागला. मुस्लिम व हिंदू राष्ट्राची मांडणी करणारे पक्ष हिंदू आणि मुस्लिमांमधील भेदाभेदांवर भर देत होते. या दोन्ही समुदायांची संस्कृती, भाषा, जीवनशैली, धार्मिक आदर्श, निष्ठा या भिन्न भिन्न राहिलेल्या आहेत व त्यामुळेच या दोन्ही समाजात ऐक्य, एकात्मता शक्य नाही अशी आग्रही मांडणी हे दोन्ही पक्ष करीत होते. काँग्रेसमधील अनेक हिंदू, मुस्लिम नेतेही हिंदु-मुस्लिम जमातवादी पक्षांना पाठिंबा देणारे होते. या दोन्ही समुदायांचे

एकात्म राष्ट्र शक्य नसून दोन स्वतंत्र राष्ट्रे आहेत असा दावा केला जात होता. मुस्लिम लीगने तर या आधारावर देशाची फाळणी करण्याची मागणी करणे सुरू केले होते. अगदी डॉ. आंबेडकरांसारखे मुस्लिमेतर नेतेही मुसलमान हे एक राष्ट्र आहेत अशी मांडणी करीत होते. अशा परिस्थितीत नेहरूंनी आवर्जून संमिश्र राष्ट्रवादाची मांडणी केली. हिंदू मुस्लिमांमधील भेदाभेदांची चर्चा करण्याबरोबरच या दोन समुदायांनी परस्परांपासून अनेक गोष्टी आत्मसात केल्या आहेत. याचप्रमाणे देशात हिंदू, मुस्लिमांशिवाय अन्य धर्मसमूह, विविध जातीसमूह, आदिवासी, पंथ, संप्रदाय आहेत व तेही भारतीय समाजाचे अभिन्न अंग आहेत, व त्यांनीही भारतीय समाजाच्या जडणघडणीत दोन मुख्य समुदायांसारखेच योगदान दिलेले आहे. हे सारे समूह भारतीय समाजाचे अभिन्न अंग आहेत ते इथे शेकडो वर्षांपासून राहात आले असून त्यांच्यातील परस्पर संबंध, साहचर्य, सांस्कृतिक मिलाफ व सौहार्दातून भारतीय संस्कृती विकसित झाली आहे. ती साहित्य, कला, संस्कृती, जीवनशैली, भाषा, शिल्पकला यातून अभिव्यक्त होत राहिलेली आहे. यामुळे येथील संस्कृती ही फक्त हिंदू किंवा फक्त मुस्लिम नाही. म्हणूनच फक्त हिंदू व मुस्लिमांच्या संस्कृतीच्या आधारावर राष्ट्राची उभारणी करण्यापेक्षा सर्व समाजांच्या सांस्कृतिक मिलाफातून विकसित झालेल्या भारतीय संस्कृतीवर भारतीय राष्ट्रवादाची उभारणी करायला हवी. असा राष्ट्रवाद हा खऱ्या अर्थाने सर्वसमावेशक व या देशातील एकात्मता वाढविण्यास पोषक ठरेल असे नेहरू सांगत होते. आज विविध समाज घटकांमधे जमातवाद, विघटन, संघर्ष व हिंसा घडवून आणण्यास कारणीभूत ठरलेला हिंदू मुस्लिम जमातवाद हा नेहरूंच्या मांडणीकडे साफ दुर्लक्ष केल्यानेच निर्माण झालेला आहे. नेहरूंनी या दोन्ही जमातवादांना कायम विरोध केला व त्यामुळे ते व्याज धर्मनिरपेक्षतेचे स्युडो सेक्युलॅरिझम समर्थक असल्याची त्यांच्यावर टीका झाली व अजूनही होत आली आहे. त्यांच्या भारतीय संस्कृतीच्या मांडणीकडे आजही दुर्लक्ष होत आले आहे. हजारो वर्षांच्या काळात देशातील विविध समाजघटकांत संघर्ष, स्पर्धा राहिलेली आहे व तिचे पर्यवसान विघटन व शोषणात झाले हे जसे खरे तसेच हे सारे विसंवाद असूनही आसेतू हिमाचल अशा प्रचंड विशाल भूभागातील लक्षावधी नागरिकांमध्ये शेकडो वर्षे सुसंवाद व सहअस्तित्वही राहिलेले आहे हेही वास्तवच आहे. यातून निर्माण झालेली एकात्मता हा भारतीय समाजाचा वारसा आहे व हेच त्याचे सामर्थ्य आहे. म्हणूनच ते टिकले पाहिजे. त्याच्या विरोधात काम करणारे प्रवाह, विचारधारा, संघटना या नेहरूंना अमान्य होत्या. गेल्या पन्नास वर्षांतील शेकडो दंगली आणि त्यात झालेला नरसंहार बघता नेहरूंची भारतीय संस्कृती विषयक मांडणी ही किती महत्त्वाची होती हे सहज लक्षात येईल. आज जमातवाद यशस्वी होतांना दिसत असला म्हणून नेहरूंची मांडणी कालबाह्य झालेली नसून अधिकच रास्त आहे असे वाटते. नेहरूंनी नवभारताच्या जडणघडणीत ही मोलाची भूमिका बजावली. मात्र त्यांनी समोर ठेवलेली उद्दिष्टे त्यांच्या कार्यकाळात साध्य झाली नाहीत. चीनच्या युद्धात भारताचा पराभव झाला. भ्रष्टाचाराची अनेक प्रकरणे समोर आली. मुस्लिम व्यक्तिगत कायद्यात सुधारणा करण्याबाबत त्यांनी बोटचेपी भूमिका घेतली. काश्मीरचा प्रश्न युनोत नेल्यामुळे तो सुटला तर नाहीच उलट अधिक गुंतागुंतीचा झाला. अशा नेहरूंच्या अनेक चुका नोंदविता येतील. त्यासाठी नेहरू जबाबदार होते हेही मान्यच करायला हवे. मात्र आजकाल अनेकदा नेहरूंनी स्थापन केलेल्या संस्था आणि सुरू केलेल्या पंचवार्षिक योजना व अन्य अनेक योजना आपली उद्दिष्टे साध्य करू शकल्या नाहीत यासाठी नेहरूंनाच जबाबदार मानले जाते. प्रत्यक्षात काँग्रेसमधील आणि नोकरशाहीतील अनेक हितसंबंधी गटांनी या योजनांची प्रभावीपणे अंमलबावणीच केली नाही, उलट या योजनांचा आपल्या फायद्यासाठी पुरेपूर उपयोग करून घेतला असे नंतरच्या काळात दिसून आले. येथील उच्च वर्गीय आणि उच्च वर्णिय यांनी या योजनांचा पुरेपूर उपयोग करून घेतला. याच समुहांतील नागरिकांनी बहुतांश नोकऱ्या मिळविल्या. समताधिष्ठित समाज निर्माण करण्याचे उद्दिष्ट या समुहांना कधीच महत्त्वाचे वाटत नव्हते कारण असा समाज निर्माण होण्यात त्यांच्याच हितसंबंधांना धोका होता. या समुहांनीच शासकीय योजनांची नीट अंमलबजावणी न केल्याने



नेहरूंच्या सर्व योजना या प्रत्यक्षात विशिष्ट वर्गासाठीच फायदेशीर ठरल्या. काँग्रेस मधील नेतृत्वानेही नंतरच्या काळात नेहरूंच्या आर्थिक सामाजिक समतेच्या उद्दिष्टाकडे दुर्लक्षच केले व पक्षाचा उपयोग हा अधिक सत्ता व संपत्ती मिळविण्यासाठी केला. देशातील जवळजवळ सर्व संस्थांचा उपयोग हा आपापला स्वार्थ पूर्ण करण्यासाठी केला गेला. यासाठी नेहरूंनाच जबाबदार मानता येईल का हा प्रश्न विचारायला हवा. नेहरू हे नोकरशाही व पक्षातील अशा घटकांच्या स्वार्थास पायबंद घालू शकले नाहीत हे त्यांचे अपयश मानता येईल. त्यांच्या अपयशांची यादीही करता येईल. मात्र नेहरूंचे अपयश लक्षात घेतांनाच त्यांच्या योगदानामुळेच आजची भारतातील प्रगती घडून येऊ शकली याकडे दुर्लक्ष करण्याएवढी कृतघ्नता योग्य नव्हे असेच आजची नेहरूंवरील टीका बघून म्हणावेसे वाटते.





अनुक्रमणिका

# जवाहरलाल नेहरू : प्रशासक म्हणून खरे कसे होते?*

माधव गोडबोले

पंडित जवाहरलाल नेहरू हे स्वतंत्र भारताचे पहिले पंतप्रधान. स्वातंत्र्यलढ्यातील एक आघाडीचे नेते म्हणून लोकप्रिय ठरलेल्या नेहरूंची पंतप्रधानपदीची कारकिर्द बरीच प्रदीर्घ होती. त्या काळात त्यांच्या नेतृत्वाचे विविध पैलू प्रदर्शित झाले. त्या पैलूंपैकी एक महत्त्वाचा पैलू म्हणजे त्यांचा प्रशासनाबद्दलचा व विविध प्रशासकीय बाबींबद्दलचा दृष्टिकोन. त्या पैलूचा थोडा तपशीलवार विचार आपण करू या.

आमदारांचा शासनातील हस्तक्षेप व ढवळाढवळ हा स्वातंत्र्यापासूनच चिंतेचा विषय झाला होता. नेहरूंनी त्यांच्या १५ ऑगस्ट १९४९ च्या मुख्यमंत्र्यांना पाठवलेल्या पत्रात याचा उल्लेख केला होता आणि स्पष्टपणे असे बजावले होते की, 'स्थानिक पातळीवर आमदारांनी हस्तक्षेप करणे हे अगदी चुकीचे आहे. तसे करण्याने कामाची जबाबदारी घेण्यास अधिकारी तयार होणार नाहीत, आणि मग कोणीच जबाबदार नाही, अशी परिस्थिती निर्माण होईल. ब्रिटिश प्रशासनव्यवस्थेमध्ये जिल्ह्याच्या अधिकाऱ्यांचे विशेष स्थान होते आणि ते तसेच राहणे हितावह आहे. जर आमदारांनी नेमणुका, बदल्या आणि परवानेवाटप यांत हस्तक्षेप केला, तर भ्रष्टाचाराला आवर घालणे कठीण होईल. आणि कोणाला जबाबदारही धरता येणार नाही.' [१]

नेहरूंची अशीही समजूत होती की, साम्राज्यशाहीचे संवर्धन करणाऱ्या सेवा (सर्व्हिसेस) लोकशाहीमध्ये उपयोगाच्या असणार नाहीत; कारण त्या स्वातंत्र्यच पायदळी तुडवतील. फक्त एकाधिकारशाहीमध्येच त्यांचा उपयोग असू शकतो. त्यामुळे आय. सी. एस. आणि तत्सम सेवा नष्ट केल्याशिवाय स्वातंत्र्यानंतरच्या खऱ्या कामाला सुरुवातच होऊ शकणार नाही. नेहरूंनी एप्रिल १९४० मध्ये असे जाहीरपणे सांगितले होते की, 'आमचे सरकार अधिकारात आल्याबरोबर आय. सी. एस. नाहीशी करण्याचा निर्णय केला जाईल.' [२] नेहरूंनी असेही म्हटले होते की, 'आय.सी.एस. (इंडियन सिव्हिल सर्व्हिस) ही हिंदुस्तानीही (इंडियन) नाही, सभ्यही (सिव्हिल) नाही आणि सेवाही (सर्व्हिस) नाही!' अर्थात हे ब्रिटिश काळातील ब्रिटिश अधिकाऱ्यांच्या बाबतीतही पूर्णत्वाने खरे नव्हते; कारण अनेक ब्रिटिश अधिकाऱ्यांनी अत्यंत नावाजण्याजोगे व कायमचे लक्षात राहील, असे काम करून भारताला कायमचे ऋणी केले आहे, यात शंका नाही. उदाहरणार्थ, जिल्हाधिकारी पिगू यांनी बंगालमधील त्यांच्या जिल्ह्यात सतीची प्रथा बंद केली. जन्मानंतरच मुलींना मारून टाकण्याच्या प्रथेला आळा घालण्यासाठी काठियावाड संस्थानचे राजकीय प्रतिनिधी विलोबी यांनी मोहीम राबवून ज्या घरातील मुली जगतील, त्यांना पुरस्कार देऊन व त्याउलट ज्या घरातील मुली मारल्या जातील, त्यांना शिक्षा करून एक नवा पायंडा पाडला. अशा प्रकरणी दंड आकारून जी रक्कम जमा झाली, ती 'इन्फंटिसाइड फंड' (बालमृत्यू निधी) यात जमा करून त्यातून योग्य प्रकरणी हुंडा देण्यासाठी आर्थिक मदत देऊ केली. इतिहास, संस्कृती व वाङ्मय या क्षेत्रांतही काही आय. सी. एस. अधिकाऱ्यांनी केलेले काम लक्षणीय होते. संयुक्त प्रांताचे मुख्य सचिव व्हिन्सेंट स्मिथ यांनी इतिहासाची 'अर्ली हिस्ट्री ऑफ इंडिया' (१९०४) व 'ऑक्सफर्ड हिस्ट्री ऑफ इंडिया' (१९१९) ही अभ्यासपूर्ण पुस्तके लिहिली. त्याआधी आल्फ्रेड लायल यांनी 'राइज अँड एक्स्पान्शन ऑफ द ब्रिटिश डोमिनियन इन इंडिया' (१८९३) हे पुस्तक लिहिले. त्याही आधी १८४१ साली माउंट स्टुअर्ट एल्फिन्स्टन यांनी 'हिस्ट्री ऑफ इंडिया' हे पुस्तक प्रसिद्ध करून 'इतिहासाचार्य' हा गौरव प्राप्त केला. त्यांचे मोठेपण त्यांनी लिहिलेल्या 'टॅसिट्स ऑफ

---

* डॉ. माधव गोडबोले व राजहंस प्रकाशन यांच्या सौजन्याने हा लेख छापत आहोत. -संपादक

अनुक्रमणिका








मॉडर्न हिस्ट्री' या पुस्तकावरूनही दिसून येते. ब्रायन हॉटन हॉड्सन यांनी हिमालय परिसराचा नैसर्गिक इतिहास आणि बौद्ध धर्म, चालीरीती आणि भाषा यांचा आद्य प्रवर्तक अभ्यास केला. ए. ओ. ह्यूम यांनी पक्षिशास्त्रात व आशियातील पक्ष्यांवर संशोधन करून नाव मिळवले. या व अशा अनेक अभ्यासांतून जगाला भारताचे वेगळे दर्शन घडवण्याचे काम या आय. सी. एस. अधिकाऱ्यांनी केले. त्यामुळे इतर अनेक नामवंतांनी या सेवेबद्दल गौरवोद्गार काढले होते.[३]

राज्यघटना तयार करताना आय. सी. एस. सारख्याच नवीन अखिल भारतीय सेवा निर्माण केल्या जाव्यात किंवा कसे, यावर मतभेद होते. काहींचे मत असे होते की, या सेवांतील अधिकारी प्रांतांच्या सरकारांसाठी काम करणार असल्यामुळे त्यासाठी केंद्रीय पातळीवर अशा सेवा प्रस्थापित करू नयेत; तर इतर काहींना असा संदेह होता की, अशा सेवा प्रस्थापित करण्याने प्रांतांचे अधिकार कमी होतील व सत्तेच्या केंद्रीकरणाच्या प्रवृत्ती वाढीस लागतील. मात्र वल्लभभाई पटेल यांनी या बाबतीत अगदी प्रगतिशील धोरणाचा पुरस्कार केला आणि असे सुचवले की, भारतीय प्रशासकीय सेवा व भारतीय पोलिस सेवा या दोन अखिल भारतीय सेवा ताबडतोब निर्माण करण्यात याव्यात आणि अशाच इतर सेवा प्रस्थापित करण्याची तरतूद राज्यघटनेत असावी. या प्रस्तावास नेहरूंचाही विरोध होता; पण तो डावलून शेवटी हे मान्य करण्यात आले आणि तशी तरतूद राज्यघटनेत करण्यात आली.

वल्लभभाई पटेलांनी त्यांच्या घटनासमितीतील व तदनंतरच्या संसदेतील भाषणांत हे आवर्जून सांगितले होते की, "अखिल भारतीय सेवेतील अधिकाऱ्यांना त्यांच्या कामात पूर्ण स्वातंत्र्य दिले पाहिजे. आणि मंत्र्यांना योग्य सल्ला देण्याची जबाबदारी त्यांच्यावर टाकली पाहिजे." त्यांनी असेही सांगितले होते की, "माझ्या सचिवालयातील वरिष्ठ अधिकाऱ्यांनी 'माझ्या तोंडाकडे पाहून आपला सल्ला कधीही देऊ नये' अशी सक्त ताकीद मी त्यांना दिली आहे. त्यांनी दिलेला सल्ला मग तो मला कितीही न पटणारा असो, तो मान्य करायचा किंवा नाही, याचा अधिकार माझ्याकडेच असेल आणि मी केलेला निर्णय जर अयोग्य असेल, त्यात काही बदल करण्याची आवश्यकता असेल, तर अशी प्रकरणेही सचिवांनी निःसंकोचपणे फेरविचारासाठी सादर करावीत, अशी माझी अपेक्षा असते." वल्लभभाई पटेलांचे हे परिपक्व व दूरदृष्टीचे विचार नव्या प्रशासनव्यवस्थेला पाठबळ देणारे ठरले. त्यामुळेच स्वातंत्र्यानंतरच्या अनेक कठीण प्रसंगांतून देश तावूनसुलाखून बाहेर पडू शकला. १० ऑक्टोबर १९४९ रोजी संसदेत बोलताना पटेलांनी आवर्जून सांगितले होते: "माझी अशी इच्छा आहे, की सभागृहाने याची नोंद घ्यावी की, गेल्या दोन-तीन वर्षांत या वरिष्ठ सेवेतील बहुतेक अधिकाऱ्यांनी आपले काम इतके लक्षपूर्वक केले नसते, तर सरकार टिकूच शकले नसते"[४]

शासकीय कर्मचाऱ्यांनी त्यांच्या कामामध्ये राजकीय अलिप्तता ठेवावी, अशी एक रास्त अपेक्षा जगभरातील निरनिराळ्या देशांत केली जाते. विशेषतः लोकशाहीमध्ये जेव्हा अनेक राजकीय पक्ष अस्तित्वात असतात आणि सत्तेत येऊ शकतात, तेव्हा तर कर्मचाऱ्यांनी राजकीय दृष्ट्या अलिप्त असणे हे आवश्यकच असते. याच अर्थाने शासकीय कर्मचाऱ्यांची अलिप्तता हा मापदंड इंग्लंडसारख्या देशात मान्यता पावला आहे. पण ही संकल्पना नेहरूंना मान्य नव्हती. ९ डिसेंबर १९५५ रोजी कुर्नूल येथे शासकीय अधिकाऱ्यांच्या सभेत भाषण करताना नेहरूंनी असे अधोरेखित केले होते की, 'कर्मचाऱ्यांनी जनतेची सेवा करणे हाच दंडक मानला पाहिजे आणि कर्मचाऱ्यांनी अलिप्तपणे काम केले, तर ते काम योग्य रीतीने होऊ शकणार नाही.' नेहरूंना कदाचित असे अभिप्रेत असावे की, कोणतेही काम कर्मचाऱ्यांनी त्यात रस घेऊन करावे. अशाच तऱ्हेचा मुद्दा त्यांनी 'इंडियन इन्स्टिट्यूट ऑफ पब्लिक ॲडमिनिस्ट्रेशन मधील सभेत भाषण करताना मांडला होता. पण याच्याशी सहमत होणे कठीण आहे. सत्तेवर असलेला राजकीय पक्ष आणि सरकार यांच्यात फरक केलाच पाहिजे. सत्तेवर असलेल्या पक्षाच्या फायद्याचे आहे म्हणून शासनाने निर्णय घेणे आणि राबवणे हे समर्थनीय होणार नाही.

एम. जे. अकबर यांनी त्यांच्या 'नेहरू : द मेकिंग ऑफ इंडिया' या पुस्तकात यासंबंधी दिलेल्या दाखल्याचा उल्लेख करणे इष्ट ठरेल. परराष्ट्र मंत्रालयातील

अधिकाऱ्यांच्या एका बैठकीत परराष्ट्र सचिव गुंडेव्हिया यांनी नेहरूंना असा प्रश्न विचारला होता की, "केरळसारखे मार्क्सवादी सत्तेवर आले, तर त्याचा प्रशासनावर काय परिणाम होईल? आणि नेहरूंनी सुचविल्याप्रमाणे अधिकाऱ्यांनी कम्युनिस्ट विचारसरणीनुसार काम करणे योग्य होईल का?" नेहरूंना हा प्रश्न अनाठायी वाटला आणि ते म्हणाले की, "सर्वजण कम्युनिस्टांच्या विचारसरणीच्या इतके आहारी का गेले आहेत?" नंतर जरा वेळ थांबून नेहरू म्हणाले, "भारताला भीती आहे, ती कम्युनिस्टांची नव्हे, तर जातीयवादाची. हिंदू परंपरावादी सत्तेवर येण्याची." बैठक संपण्यापूर्वी त्यांनी दोनदा त्याचा पुनरुच्चार केला. [५] मागे वळून पाहताना, नेहरूंचे हे शब्द किती खरे होते, हे दिसून येईल. त्यांच्या निधनानंतर पाच दशके लोटल्यावर हिंदू परंपरावादी भारतीय जनता पक्ष परत एकदा सत्तेत येण्यासाठी सज्ज झाला आहे. पण कोणताही पक्ष सत्तेत आला, तरी प्रशासकीय अधिकाऱ्यांनी त्यांचे राजकारणापासून अलिप्त राहण्याचे मूलतत्त्व सोडता कामा नये.

परराष्ट्र सचिव गुंडेव्हिया यांनी वर व्यक्त केलेली भीती केरळच्या बाबतीत तरी खरीच ठरली. गुप्त हेर खात्याचे प्रमुख बी. एन. मलिक यांनी १४ नोव्हेंबर १९५७ रोजी नेहरूंना पाठवलेल्या टिप्पणीत नमूद केले होते की, 'केरळ सरकारचा प्रयत्न पोलिसांनी साम्यवादी विचारसरणीला पाठिंबा द्यावा आणि कायदेशीर वा बेकायदेशीररित्या कम्युनिस्ट पक्षाचे बलसंवर्धन करावे' असा आहे. असे होऊ दिल्यास नागरी सेवा स्वतंत्र राहणार नाहीत, याबाबत नेहरूंनी १५ नोव्हेंबर १९५७ च्या पत्रान्वये गृहमंत्री पंत यांना लिहून असे विचारले होते की, ते याबाबतीत केरळचे मुख्यमंत्री एस. नंबुद्रिपाद यांना लिहिणार होते का किंवा इतर कोणती कारवाई ते करणार होते. [६] त्यानंतर १९८० व ९० च्या दशकांत पश्चिम बंगालमध्ये साम्यवादी सरकार सत्तेवर असताना तेथील सर्व सरकारी यंत्रणा सरकारच्या राज्यकर्त्या पक्षाचे पाठबळ वाढविण्याचा प्रयत्न करीत होती. यावरून परत एकदा हे स्पष्ट होते की, सरकारी यंत्रणा राजकीय पक्षापासून अलिप्त ठेवली पाहिजे.

नेहरूंवर अशी एक टीका केली जाते की, तब्बल १७ वर्षे पंतप्रधानपदी असतानाही त्यांनी प्रशासन सुधारण्याचा विशेष प्रयत्न केला नाही. याबाबतीत नेहरूंना एक परदेशी पत्रकार, टारझी व्हिटाची, यांनी मुलाखतीत असे विचारले होते की, "त्यांच्या कारकिर्दीचे सर्वांत मोठे अपयश कोणते?" नेहरूंनी जरा विचार करून सांगितले की, "मी प्रशासन सुधारू शकलो नाही. ते अद्यापही वसाहतवादीच (कलोनियल) आहे." [७] काही लेखकांनी, उदाहरणार्थ, एस. एस. गिल, असेही म्हटले आहे की, 'देशाची प्रशासनव्यवस्था ही ब्रिटिश काळात जशी होती, तशीच ती स्वातंत्र्यानंतरही राहिली आहे. त्याचे कारण हे आहे की, हिंदुस्थान सरकार कायदा, १९३५, यातील अनेक तरतुदी तशाच्या तशा उचलून त्या राज्यघटनेत समाविष्ट केल्या आहेत.'

मी या दोन्ही विधानांशी सहमत नाही. एक तर, १९३५ च्या कायद्याच्या आधीही जी जबाबदार प्रशासनव्यवस्था अगदी खेड्यापासून ते सचिवालयापर्यंत कार्यरत होती, आणि जिच्या परिणामकारकतेबद्दल काहीच शंका नव्हती, ती स्वातंत्र्यानंतर निष्कारण बदलण्याचे कारणच नव्हते. जर अशी काही नवी प्रशासन व्यवस्था लागू केली असती, तर त्याचे राजकीयीकरण अगदी पहिल्या दिवसापासून झाले असते. अनेक विकसनशील देशांशी तुलना करता, अ-राजकीय प्रशासनव्यवस्था ही भारताची शक्ती आहे आणि केवळ काहीतरी नवीन करायचे म्हणून त्यात बदल करणे हितावह नव्हते.

नेहरूंचा विरोध होता तो ब्रिटिश आय. सी. एस. अधिकाऱ्यांना आणि त्यांच्या कार्यपद्धतीला. आणि हे समजण्याजोगेही होते, कारण स्वातंत्र्यपूर्व काळात ब्रिटिशांची सत्ता टिकविणे हे ब्रिटिश आय. सी. एस. अधिकाऱ्यांचे कर्तव्य होते. त्यासाठी त्यांच्यावर आकस ठेवणे वा त्यांना दोष देणे हे किती योग्य आहे, असाही एक प्रश्न निर्माण होऊ शकतो, कारण आय. सी. एस. मध्ये जसे ब्रिटिश अधिकारी होते. तसेच भारतीयही होते. आणि स्वातंत्र्यानंतर अनेक भारतीय आय. सी. एस. अधिकाऱ्यांनी शासनाचा गाडा कौशल्यपूर्वक व समर्थपणे सांभाळला यात काहीच शंका नाही. अशा काही अधिकाऱ्यांमध्ये एच. एम. पटेल, चिंतामणराव देशमुख, एच. व्ही. आर. अय्यंगार, धर्म वीर, एस.

एस. खेरा, मंगत राय अशा अनेक अधिकाऱ्यांचा समावेश होतो. यांच्यापैकी कित्येकांनी नेहरूंना जवळून पाहिले होते आणि त्यांच्याबरोबर काम करतानाच्या त्यांच्या अनुभवांची नोंद ठेवली आहे. त्यानुसार नेहरूंनी त्यांच्यावर पूर्ण विश्वास टाकला होता आणि त्यांना काम करण्याचे पूर्ण स्वातंत्र्य दिले होते. संयुक्त राष्ट्रसंघाचे दिल्लीत काम पाहणारे आय. सी. एस. सचिव सुबीमल दत्त यांनी त्यांच्या लेखात लिहिले आहे की, 'आय. सी. एस. अधिकाऱ्यांच्या बाबतीत नेहरूंचे काहीही गैरसमज नव्हते, कारण तसे ते असते तर नेहरूंनी वॉशिंग्टनमध्ये १९४२ ते १९४६ हिंदुस्थानचे एजंट जनरल म्हणून कार्यरत असणारे जी. एस. बाजपायी यांना १९४७ मध्ये मुद्दाम बोलावून घेऊन नवीन भारतीय परराष्ट्र सेवा स्थापन करण्यासाठी मदत करण्यास सांगितले नसते.' [८]

नेहरूंच्या समाजवादी दृष्टिकोनाचा एक विपरीत परिणाम प्रशासनव्यवस्थेवर झाला. एप्रिल १९५३ मध्ये ब्रह्मदेशाला (आताचा म्यानमार) नेहरूंनी भेट दिली होती. तेथून परत आल्यावर त्यांनी म्हटले होते की, 'त्या देशात किमान व कमाल मिळकतीत १ ते १६ अशी तफावत आहे. त्या मानाने भारतात ती तफावत पुष्कळच अधिक आहे. ती कमी करावी' अशा तऱ्हेचे प्रयत्न त्यानंतरच्या काही वेतन आयोगांनी करण्याचा प्रयत्न केला. त्यामुळे वरिष्ठ दर्जाच्या अधिकाऱ्यांचे वेतन पुरेसे वाढू शकले नाही आणि त्याचा विपरीत परिणाम प्रशासनाच्या मनोधैर्यावर झाला. त्यामुळे काही प्रमाणात भ्रष्टाचारही वाढला. सुदैवाने, पाचव्या व सहाव्या वेतन आयोगांनी याबाबतीत फेरविचार करून वास्तववादी दृष्टिकोन स्वीकारला.

लोकसेवा आयोगांच्या बाबतीतही नेहरूंचे विचार काहीसे न पटणारे होते. त्यांनी १७ ऑक्टोबर १९५३ ला मुख्यमंत्र्यांना पाठवलेल्या पत्रात आयोगांच्या कामावर टीका करून म्हटले होते की, 'त्यांची काम करण्याची पद्धत ही स्वातंत्र्यपूर्व काळासारखीच आहे आणि त्यात आता बदल करणे आवश्यक आहे.' याबाबत आता अधिक विचार करून जरूर तर नवीन कायदा केला पाहिजे , असेही त्यांनी म्हटले होते. [९] लोकसेवा आयोगांच्या कामात त्रुटी आहेत व त्याबद्दल सर्वसाधारण असंतोष आहे, हे खरे; परंतु त्याचे कारण या आयोगांवरील नेमणुका करताना त्यात होत असलेला राजकीय हस्तक्षेप हे आहे. कित्येक राज्यांतील आयोगांना तर भ्रष्टाचाराने पोखरून काढले आहे. दुर्दैवाने, हा प्रश्न अद्याप दुर्लक्षित राहिला आहे.

पोलिसांच्या कार्यपद्धतीबाबतही नेहरू फार सतर्क होते. गृहमंत्रालयाच्या गुप्तहेर खात्याने एका परिपत्रकाद्वारे सर्व प्रांतांच्या सरकारांना आणि त्यातील पोलिस अधिकाऱ्यांना काही मार्गदर्शक सूचना केल्या होत्या. त्यात असे सुचवले होते की, पोलिसांमार्फत विद्यार्थ्यांवर व महाविद्यालयातील आणि विद्यापीठातील शिक्षकांवर बारकाईने नजर ठेवून ते राजकीय बाबींची दखल घेत नाहीत, याकडे लक्ष द्यावे. ओरिसाचे तत्कालीन राज्यपाल असफ अली यांनी याबाबत गृहमंत्री राजगोपालाचारी यांना पत्र लिहून चिंता व्यक्त केली. त्यावर नेहरूंनीही राजाजींना ११ सप्टेंबर १९५१ रोजी पत्र लिहून कळविले की गृहमंत्रालयाचे परिपत्रक पाहून मला धक्काच बसला. पोलिसांनी अशा बाबींमध्ये दखल घेणे याला गुन्हाच म्हणावे लागेल. असे करण्याने विद्यार्थ्यांमध्ये असंतोष निर्माण होऊन त्यांची पावले साम्यवादाकडे वळू लागतील. लोकशाहीतील पोलिसांचे काम हे हुकुमशाही देशांतल्यापेक्षा अगदी वेगळे असले पाहिजे, हे विसरून चालणार नाही. माझ्या माहितीप्रमाणे साम्यवादी राजवटीखालील देश व स्पेनसारखा हुकुमशाही असलेला देश सोडला, तर इतर कोणत्याही देशात पोलिस अशा बाबींची दखत घेत नाहीत.[१०] १० जानेवारी १९५६ रोजी सहाव्या अखिल भारतीय पोलिस क्रीडास्पर्धांसाठी संदेश पाठविताना नेहरूंनी अधोरेखित केले होते की, स्वतंत्र भारतात पोलिसांचे काम हे बहुतेक सामाजिक असेल. पोलिसांनी आपले अधिकार वापरताना त्यांचा दुरुपयोग करता कामा नये. ज्याच्यावर अधिकार गाजवावयाचा, त्याने व अधिकार गाजविणाऱ्याने संयम ठेवून काम केले पाहिजे. शेवटी पोलिस हाही भारताचा नागरिक आहे आणि समाजाचा घटकही आहे.[११] दुर्दैवाने, पोलिसांच्या कामाबद्दलची ही राज्यकर्त्यांची सतर्कता पुढे लोप पावली व त्याचे दुसरे टोक म्हणजे आणीबाणीच्या काळातील पोलिसांची कार्यपद्धती. हे पाहिले की, नेहरूंचे मोठेपण आणि त्यांच्या

नेतृत्वाचा विशेष ठळकपणे जाणवतो.

नेहरू पंतप्रधान होते, तसेच ते प्रशासकही होते. त्यामुळे जवाहरलाल नेहरू मेमोरियल फंडाने प्रसिद्ध केलेल्या 'सिलेक्टेड वर्क्स ऑफ जवाहरलाल नेहरू' या अगणित खंडांमधून त्यांनी अगदी बारीक सारीक बाबतींतही दिलेल्या सूचना पाहून थक्क व्हायला होते. ११ सप्टेंबर १९५० रोजी मुख्यमंत्र्यांना पत्र लिहून नेहरूंनी आग्रह केला होता की, साठेबाजी करणारे व काळा बाजार करणारे यांच्यावर जरूर तेव्हा स्थानबद्धतेची कारवाई सुद्धा केली पाहिजे. आपण या प्रश्नी गंभीर आहोत हे लोकांना कळणे आवश्यक आहे व जर कायदा अशी कारवाई करण्याच्या आड येत असेल, तर तो बदलला पाहिजे. नेहरूंनी त्यांच्या १४ सप्टेंबर १९५० च्या आणखी एका पत्रात म्हटले होते की, या बाबतीत त्यांनी कायदा मंत्रालयाचाही सल्ला घेतला होता व त्यानुसार प्रतिबंधात्मक स्थानबद्धता कायद्याच्या तरतुदी साठेबाज व काळा बाजारवाले यांच्याविरुद्ध वापरणे शक्य आहे. त्यामुळे अशी कारवाई केली नाही, तर ते अपयश आपले आहे, कायद्याचे नव्हे. अत्यावश्यक वस्तूंचा पुरवठा सुरक्षित असावा, या दृष्टीने जरूर ती नियंत्रणे आणली पाहिजेत, असे काँग्रेस पक्षाचे मत होते. पण त्याला विरोधही काही कमी नव्हता. या नियंत्रणांबाबतचा ठराव ज्यावेळी काँग्रेसच्या २१ सप्टेंबर १९५० च्या खुल्या अधिवेशनात मतासाठी टाकण्यात आला, तेव्हा, १९० मते ठरावाच्या बाजूने आणि ११७ विरुद्ध बाजूने पडली. टीकाकारांचा मुख्य मुद्दा होता की, नियंत्रणांमुळे भ्रष्टाचार वाढेल. नेहरूंनी त्यांच्या १४ सप्टेंबर १९५० च्या मुख्यमंत्र्यांना पाठवलेल्या पत्रात म्हटले होते की, या टीकेत जरी काहीसे तथ्य असले, तरी अशा प्रकरणी योग्य ती कारवाई केलीच पाहिजे. जरूर तर कायद्यातही बदल केले पाहिजेत. परंतु मुख्य प्रश्न आहे तो हितसंबंधांचा.[१२]

२४ जून १९५२ रोजी मंत्रिमंडळ सचिवांना पाठविलेल्या टिप्पणीत नेहरूंनी म्हटले होते की, मंत्रालयातील शिपायांची संख्या जी युद्ध सुरू होण्यापूर्वी ३ हजार २०० होती, ती आता १९ हजारांवर जाऊन पोचली आहे. ही वाढ इतकी अफाट आहे की, मंत्रालयाचे व्हरांडे शिपायांनीच भरलेले असतात. त्यांनी याबाबतीत मंत्रिमंडळ सचिवांना २ वर्षांपूर्वीही लिहिले होते आणि पूर्वी सूचना देऊनही शिपायांची संख्या कमी का होऊ शकलेली नाही, अशी विचारणा केली होती. प्रचलित नियम बदलून वरिष्ठ अधिकारी व मंत्री यांना शिपायांचा ताफा पुरविण्याची पद्धत बंद केली पाहिजे. प्रत्येक नवीन नेमणुकीबरोबर अनेक बाजारबुणगेही जमा होतात. येत्या काही दिवसांत नवीन मंत्र्यांच्या नेमणुका केल्या जाणार आहेत, त्यांच्यासाठी नवीन शिपायांच्या नेमणुका करू नयेत. जरूर तर माझ्या कार्यालयातील काही शिपायांच्या त्या जागी बदल्या कराव्यात.[१३]

दिल्लीतील कायदा व सुव्यवस्थेच्या परिस्थितीवर नेहरूंची बारकाईने नजर असे. मे १९५२ मध्ये दिल्लीत दोन मोठ्या निदर्शनांमध्ये पोलिसांनी केलेल्या हलगर्जीपणामुळे सर्वत्र नाराजी पसरली होती. नेहरूंनी २७ मे १९५२ रोजी गृहमंत्रालयाला पाठविलेली टिप्पणी वाचताना जणू काही ते आजच्या परिस्थितीबद्दलच लिहीत आहेत, असे वाटते. नेहरूंनी बजावून सांगितले होते की जरी पोलिस हे दिल्ली सरकारच्या अखत्यारीत येत नसतील, तरी वरिष्ठ पोलिस अधिकाऱ्यांनी दिल्लीचे मंत्री व मुख्यमंत्री यांच्या संपर्कात राहणे आवश्यक आहे आणि मुख्यमंत्र्यांनी जर कोणत्या पोलिस कर्मचाऱ्यांच्या बदल्या करण्याचे सुचविले, तर शक्य तो त्या अमलात आणल्या पाहिजेत. त्यांनी असेही म्हटले होते की, बरेचसे पोलिस अधिकारी दिल्लीतच टिकून राहण्याचा प्रयत्न करतात आणि दिल्लीबाहेर जाण्याची/काम करण्याची त्यांची तयारी नसते.[१४] आप पक्षाचे सरकार दिल्लीत स्थापन झाल्यावर या सर्व बाबी पुन्हा एकदा ऐरणीवर आल्या होत्या.

अद्याप शासकीय निवासस्थान मिळाले नसलेल्या दिल्लीतील एका शासकीय कर्मचाऱ्याने ४ ऑगस्ट १९५२ रोजी नेहरूंना पत्र लिहून कळविले होते की, दिल्लीत एक कूटचक्र (रॅकेट) कार्यरत असून सरकारी बंगल्यातील खोल्या सरकारी अधिकारी १०० ते १५० रुपये खोलीमागे आकारून भाड्याने देतात व घरगुती कामांसाठीच्या नोकरांसाठी असलेल्या खोल्याही १५ ते २५ रुपये दरमहा आकारून भाड्याने दिल्या जातात. नेहरूंनी त्याची दखल

घेऊन मंत्रिमंडळ सचिवांना १७ ऑगस्ट १९५२ रोजी अशा प्रकरणी सर्व माहिती गोळा करून लक्ष घालण्यास सांगितले. नेहरूंनी त्यात असेही म्हटले होते की 'घर मोठे असेल, तर ते दोन वा अधिक अधिकाऱ्यांनी वापरण्यास काहीच हरकत नसावी, पण ते शासनाच्या आदेशाने झालेले असावे.' नेहरूंनी आणखी एका बाबीकडे लक्ष वेधले होते, ते म्हणजे एका अधिकाऱ्याने आपली जागा परदेशी वकिलातीतील एका अधिकाऱ्यास दिली होती.[१५] या बाबतीतील परिस्थिती अजूनही तशीच आहे, पण ही एकच वेळ अशी होती की, जेव्हा पंतप्रधानांनी, स्वतः त्यात लक्ष घातले होते.

दिल्लीत निवासासाठी मोठे सरकारी बंगले मिळवण्यासाठी नेहमीच शर्यत चालू असते. तशी ती १९५७ मध्येही होती. नेहरूंनी २० डिसेंबर १९५७ रोजी सार्वजनिक बांधकाम, गृहनिर्माण व पुरवठा मंत्री के.सी.रेड्डी यांना पत्र लिहून कळवले होते की, संसदीय सचिवांना मोठे बंगले देण्याची आवश्यकता असू नये. बंगले वाटप करताना केवळ पदाचा विचार न करता त्या पदाच्या जबाबदाऱ्या किती मोठ्या व विस्तृत आहेत, याचा विचार करणे श्रेयस्कर ठरेल.[१६]

नेहरूंच्या प्रशासकीय दृष्टिकोनाचे अनेक टीकाकारही होते. काही काळ मंत्री असलेले समाजवादी नेते अशोक मेहता यांनी नेहरूंबद्दल म्हटले आहे की, नेहरू नवे नवे प्रयोग करण्याच्या बाबतीत आघाडीवर असत, पण तसे करण्याआधी अस्तित्वात असलेल्या योजना का असफल झाल्या, याच्या खोलात ते जात नसत आणि त्या कमतरता कशा दूर कराव्यात, याचाही ते विचार करीत नसत. त्यांचे टीकाकार असेही म्हणत की, 'वर म्हटल्याप्रमाणे स्वातंत्र्यापूर्वी ते जरी आय. सी. एस. चे कडवे टीकाकार होते, तरी स्वातंत्र्य मिळाल्यानंतर मात्र त्यांची सर्व भिस्त, आय. सी. एस. अधिकाऱ्यांवरच होती. त्यामुळे नेहरूंचे खरे मत काय होते, असा प्रश्न पडत असे.' नेहरू प्रशासनाची इतकी स्तुती करीत असत की, त्यांना प्रशासनाच्या उणीवांची पुरेशी जाणीव होती का, अशी शंका येते. काही काळ नेहरूंचे प्रधान सचिव असलेले एच. व्ही. आर. अय्यंगार, आय. सी. एस., यांनी नेहरू आणि इंग्लंडचे पंतप्रधान ॲटली यांच्यात तुलना करताना म्हटले होते की, 'कोणत्याही बाबीची सखोल तपासणी खालच्या पातळीवर झाल्याशिवाय ॲटली कोणत्याच बाबतीत स्वतः लक्ष घालत नसत' याउलट, नेहरूंना हे तत्त्व मान्य असतानाही, ते स्वतः त्याला महत्त्व न देता प्रत्येक लहान सहान प्रकरणीही स्वतः लक्ष घालीत, याची अनेक उदाहरणे मी या पुस्तकात दिली आहेत. आणखी एका बाबतीत नेहरूंवर टीका होत असे, नेहरू व पटेल यांच्यातील फरक दाखविताना असे म्हटले जात असे की, नेहरूंना माणसांची पारख करता येत नसे आणि त्यांनी त्यांच्या अवतीभोवती येऊ दिलेल्या अनेक नेत्यांची प्रतिमा विशेष उजळ नव्हती. उदाहरणार्थ, नेहरूंचे अत्यंत जवळचे व विश्वासू शेख अब्दुल्ला. त्यांना तर स्थानबद्ध करण्याची कारवाई नेहरूंना करावी लागली. तरीच पंजाबचे तत्कालीन मुख्यमंत्री प्रतापसिंह कैरों यांच्याविरुद्ध भ्रष्टाचाराचे अनेक आरोप होऊनही नेहरूंनी त्यांची नेहमीच पाठराखण केली. या पुस्तकात इतरत्र विस्ताराने नमूद केल्यानुसार, मुंध्रा प्रकरणी वित्त मंत्री टी. टी. कृष्णम्माचारी यांच्यावर न्यायमूर्ती छागला आयोगाने ठपका ठेवल्यावरही त्यांनी स्वतःची खात्री करून घेण्यासाठी गुप्तहेर खात्याचे प्रमुख बी. एन. मलिक यांना चौकशी करण्यास सांगितले होते. कृष्ण मेनन यांच्यामुळेही नेहरूंची स्वतःची प्रतिमा मलीन झाली होती आणि शेवटी केवळ संसदेतील दबावामुळे नेहरूंनी नाइलाजाने कृष्ण मेनन यांचा राजीनामा घेतला. याउलट वल्लभभाई पटेल यांची माणसांची पारख अतिशय अचूक असे व एकदा कोणावर विश्वास टाकला की, ते त्याला काम करण्याचे संपूर्ण स्वातंत्र्य देत. एकच उदाहरण द्यायचे, तर संस्थानांसंबंधीच्या मंत्रालयाचे सचिव (स्टेट मिनिस्ट्री) व्ही. पी. मेनन हे पटेलांचे विश्वासू मानले जात. त्यांना पटेलांनी संस्थाने विलीन करण्याच्या कामात संपूर्ण स्वातंत्र्य दिले होते. पण ते पटेलांच्या जवळचे असल्याने नेहरूंनी त्यांना नेहमीच दूर ठेवले.

नेहरूंची बऱ्याचशा प्रशासकीय बाबींवरील निरीक्षणे चपखल व परिस्थितीची जाण दर्शविणारी असत. पण ती विखुरलेली व कोणत्याच एका बाबीवर लक्ष केंद्रित करणारी नसल्याने त्यावर बहुतांशाने काही म्हणण्याजोगी कारवाई झाली नाही. उदाहरणार्थ, २६ ऑक्टोबर १९५३

रोजी केंद्रीय सिंचन व वीज मंडळाच्या २४ व्या वार्षिक सभेत भाषण करताना त्यांनी म्हटले होते की, 'दिल्लीत आजकाल इतक्या परिषदा होतात की त्यातून माणसाला श्वास घेण्यासही उसंत मिळत नाही. दिल्लीत काही दिवस जर परिषदाच नसतील आणि सर्वत्र शांतता असेल, तर किती बरे होईल. नवी दिल्ली हे जंगलच आहे. ते कर्तृत्वान माणसांचे असले, तरी शेवटी ते जंगलच आहे. या जंगलामध्ये माणूस सहज वाट चुकू शकतो, कारण त्यात हजारो कार्यालये आहेत व त्यांकडे नेणारे रस्तेही आहेत.' दिल्लीतील कार्यपद्धतीबद्दल बोलताना ते म्हणाले होते की, 'दूरध्वनीची सोय उपलब्ध असताना लोक त्याचा वापर करत नाहीत; जरूर असेल त्यावेळी शेजारच्याच खोलीत बसणाऱ्या सहकाऱ्यांशी बोलायला जात नाहीत, तर त्यांच्याशी लेखी पत्रव्यवहार करतात.' बिहारमधील पुरांमुळे व काही वेळच्या अन्नधान्य टंचाईमुळे लाखो लोक त्रस्त झाले आहेत. हे कशामुळे होते याची कारणे शोधून काढण्याचे काम करण्यासाठी फार मोठ्या संख्येने कर्मचारी तैनात करणे आवश्यक नाही. थोडेच कल्पक अधिकारी हे करू शकतात व त्यांच्या अहवालावर त्यानंतर कारवाईही करता येईल. पण यासाठी काम करण्याच्या पद्धती बदलाव्या लागतील. [१७]

नेहरू हे खऱ्या अर्थाने प्रशासकच होते, यावर अनेकांचा विश्वास बसणार नाही, पण त्यांचा सर्व पत्रव्यवहार पाहिला, तर असे दिसून येते की, प्रशासनाच्या बारीकसारीक बाबतींतही ते सतत लक्ष घालीत असत व त्याबाबतच्या इतक्या तपशीलवार सूचना करीत असत की, क्वचितच कोणी वरिष्ठ अधिकारीही या बाबतीत त्यांचा हात धरू शकेल. उदाहरणार्थ, १५ जानेवारी १९५४ रोजी योजना आयोगाची बैठक संपल्यानंतर काही दिवसांनीच नेहरूंनी मंत्रिमंडळ सचिवांना एक टिप्पणी पाठवून सरकारी कामकाजामुळे अनेक प्रकल्पांना कसा अक्षम्य विलंब होतो, याकडे लक्ष वेधले होते. त्यात त्यांनी वित्त मंत्रालयाच्या कारभारावरही टीका केली होती. अर्थसंकल्पात पुरविण्यात आलेला निधी पुरेसा का वापरला जात नाही, याची साद्यंत चौकशी करण्याच्या सूचना केल्या होत्या. समवर्ती (कंकरंट) लेखापरीक्षणाने निष्कारण कालापव्यय होतो, याकडेही त्यांनी लक्ष वेधले होते. टिप्पणीतील सर्व बाबींवर बारकाईने तपासणी करून त्या मंत्रिमंडळापुढे ठेवाव्यात, असेही नेहरूंनी सुचविले होते. [१८]

७ एप्रिल १९५६ रोजी परराष्ट्र सचिवांना पाठवलेल्या टिप्पणीत नेहरूंनी परदेशी पाहुण्यांकडून मिळालेल्या भेटवस्तूंबाबत सविस्तर सूचना केल्या होत्या. त्यात किती रकमेपर्यंतच्या वस्तू संबंधित अधिकारी वा मंत्री आपल्याकडे ठेवू शकेल, कोणत्या वस्तू सरकारी तोषाखान्यात देणे बंधनकारक असेल व कोणत्या विशेष अमूल्य गोष्टी संग्रहालयाकडे पाठवण्यात याव्यात हे सुचविले होते. [१९]

२० मार्च १९५४ रोजी गृहमंत्र्यांना पाठवलेल्या टिप्पणीत त्यांनी सुचवले होते की, 'काही विशिष्ट पदांवर नेमणुका करताना विशेष पात्रता असलेल्या व्यक्तींना, त्या सरकारबाहेरच्या असल्या तरी नेमण्याचा विचार करावा.' त्यांनी परराष्ट्र सेवेत अशा विशेष पात्रता असलेल्या व्यक्तींना घेण्याचा प्रघात सुरू केला होता. नेहरूंनी आग्रहाने असेही सांगितले होते की, बढत्या या सेवाज्येष्ठतेनुसार न करता गुणवत्तेवर केल्या जाव्यात आणि त्यासाठी विशेष गुणवत्ता असलेल्या अधिकाऱ्यांची नोंद त्यांच्या वार्षिक गोपनीय अहवालांबाहेर ठेवण्यात यावी. [२०]

मुख्यमंत्र्यांना १२ जून १९६० रोजी पाठवलेल्या पत्रात नेहरूंनी चक्क झाडूकाम करणाऱ्या स्वच्छता कर्मचाऱ्यांच्या बाबत लिहिले होते. त्यांनी म्हटले होते की, जगभर लांब दांड्याचा झाडू वापरून सफाई केली जाते. तसे करण्याने खाली वाकून फार काळ काम करण्याचे कष्ट कमी होतात. आपल्या देशात अजूनही असे लांब दांड्याचे झाडू वापरले जात नाहीत. तसेच स्वच्छता कर्मचाऱ्यांना बहुधा गणवेशही दिला जात नाही. या दोन्ही गोष्टींकडे लक्ष दिल्यास स्वच्छता कर्मचाऱ्यांची स्वप्रतिमा तर उंचावेलच, पण लोकांचा त्यांच्याकडे पाहण्याचा दृष्टिकोनही बदलेल. [२१]

अशी कितीतरी बारीकसारीक उदाहरणे सांगता येतील. पंडित नेहरूंविषयी प्रसिद्ध झालेल्या प्रचंड साहित्यामध्ये ती विखुरलेली आहेत. त्यांच्यापैकी काही मोजक्या उदाहरणांद्वारे त्यांच्या नेतृत्वाचा प्रशासकीय पैलू







अनुक्रमणिका

स्पष्ट करण्याचा हा एक छोटा प्रयत्न.

('जवाहरलाल नेहरूंचे नेतृत्व : एक सिंहावलोकन' या राजहंस प्रकाशनातर्फे प्रकाशित होणार असलेल्या पुस्तकातील एका प्रकरणाचा संपादित भाग.)

**संदर्भ :**

१. पार्थसारथी जी., संपादक - 'जवाहरलाल नेहरू : लेटर्स टु चीफ मिनिस्टर्स १९४७-१९६४,' खंड १, जवाहरलाल नेहरू मेमोरियल फंड, नवी दिल्ली, पृ. ४२०.

२. कश्यप सुभाष, 'द पोलिटिकल सिस्टीम अँड इन्स्टिटयूशन बिल्डिंग अंडर जवाहरलाल नेहरू,' नॅशनल पब्लिशिंग हाऊस, नवी दिल्ली. १९९०, पृ. ७८-७९.

३. जगमोहन, 'सोल ॲण्ड स्ट्रक्चर ऑफ गव्हर्नन्स इन इंडिया,' ॲलाइड पब्लिशर्स, नवी दिल्ली, २००५, पृ. ३४-३५, ४२.

४. नांदुरकर जी. एम, संपादक - 'धिस वॉज सरदार - दि कॉमेमोरोटिव्ह व्हॉल्यूम,' खंड १, सरदार वल्लभभाई पटेल स्मारक भवन, अहमदाबाद, पृ. २९५.

५. अकबर एम. जे., 'नेहरू - द मेकिंग ऑफ इंडिया,' व्हायकिंग/ पेंग्विन, लंडन, १९८८, पृ. ५८०.

६. जवाहरलाल नेहरू मेमोरियल फंड, 'सिलेक्टेट वर्क्स ऑफ जवाहरलाल नेहरू,' सेकंड सीरिज, खंड ४०, २००९, पृ. ३७९.

७. कपूर सुनीरा, संपादक -'थॉट्स ॲण्ड व्हिजन ऑफ जवाहरलाल नेहरू,' अनामिका पब्लिशर्स ॲण्ड डिस्ट्रिब्यूटर्स, नवी दिल्ली, २००५, पृ. ११९.

८. दीक्षित शीला, संपादक - 'जवाहरलाल नेहरू - सेंटिनरी व्हॉल्यूम,' ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटी प्रेस, नवी दिल्ली, १९८९, पृ २०२.

९. पार्थसारथी जी. संपादक – 'जवाहरलाल नेहरू- लेटर्स टु चीफ मिनिस्टर्स १९४७-१९६४' खंड ३, जवाहरलाल नेहरू मेमोरियल फंड, नवी दिल्ली, १९८७, पृ. ४०३.

१०. गोपाल एस., अय्यंगार उमा, संपादक – 'द इसेंशियल रायटिंग्ज ऑफ जवाहरलाल नेहरू,' खंड १, ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटी प्रेस नवी दिल्ली, २००३, पृ. १०७-१०८.

११. जवाहरलाल नेहरू मेमोरियल फंड, 'सिलेक्टेड वर्क्स ऑफ जवाहरलाल नेहरू,' सेकंड सीरिज, खंड ३०, २००२, पृ. २७०-२७१.

१२. भारत सरकार, १९८६, पुणे १९१-१९४, २०६.

१३. जवाहरलाल नेहरू मेमोरियल फंड,'सिलेक्टेड वर्क्स ऑफ जवाहरलाल नेहरू,' सेकंड सीरिज, खंड १९, १९९६, पृ. २०८

१४. तत्रैव, पृ. २१३.

१५. तत्रैव, पृ. ४८१-४८२.

१६. जवाहरलाल नेहरू मेमोरियल फंड, 'सिलेक्टेड वर्क्स ऑफ जवाहरलाल नेहरू,' सेकंड सीरिज, खंड ४०, २००९, पृ. ३४७-३४८.

१७. जवाहरलाल नेहरू मेमोरियल फंड,'सिलेक्टेड वर्क्स ऑफ जवाहरलाल नेहरू,' खंड २४, १९९९, पृ. ३०-३५.

१८. तत्रैव, पृ. ३५० -३५२.

१९. जवाहरलाल नेहरू मेमोरियल फंड, 'सिलेक्टेट वर्क्स ऑफ जवाहरलाल नेहरू,' सेकंड सीरिज, खंड ३२, २००३, पृ. १५१.

२०. जवाहरलाल नेहरू मेमोरियल फंड, 'सिलेक्टेड वर्क्स ऑफ जवाहरलाल नेहरू,' सेकंड सीरिज, खंड २४, १९९९, पृ. २५१.

२१. गोपाळ एस., अय्यंगार उमा, संपादक - 'द सेंशियल रायटिंग्ज ऑफ जवाहरलाल नेहरू,' खंड १, ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटी प्रेस, नवी दिल्ली, २००३, पृ. ७३९.



अनुक्रमणिका

# पंडित नेहरू - १९६२

विश्वास दांडेकर.

"खालून आग, वर आग, आग बाजूंनी
समशेर उसळली सहस्त्र, क्रूर ईमानी"

तात्यासाहेब शिरवाडकर ऊर्फ कवी कुसुमाग्रज यांच्या 'वेडात मराठे वीर दौडले सात' हे ध्रुवपद असलेल्या कवितेतल्या या ओळी. या कल्पनेचा उगम एका इंग्रजी काव्यात आहे.

"Cannon's to left of them,
Cannon's to right of them,
Vollyed and thundered;"

ही इंग्रजी कविता 'Charge of the Light Brigade' म्हणून गाजलेली. आज चर्चेत असलेला क्रायमिया (क्रिमिया) इथे एका युद्धात ब्रिटनचे सहाशे (६००) सैनिक अधिकारी मारले गेले व त्या सैन्यविभागाची १००% वाताहत झाली. त्या प्रकारान व्यथित होत विख्यात इंग्रजी कवी लॉर्ड टेनिसन यांनी ती कविता लिहिली. सैन्य आज्ञा पाळते, उघडउघड मूर्खपणाच्या आज्ञा पाळणे हे सैनिकांना भाग असते. तो शिस्तीचा भाग असतो. मात्र अविचाराने अशा आज्ञा देऊन शेकडो माणसे अकारण मारली जाणे कुणालाही व्यथित करणार. याच इंग्रजी कवितेत पुढील ओळी आहेत :

"Their's Not to reason why,
Their's Not to make reply,
Their's but to do and die,"

यावर भाष्य नको. प्रश्न अर्थातच असा उद्‌भवणार की, '१९६२ - पंडित नेहरू' म्हणजे १९६२ चे चीन भारत सीमायुद्ध याचा या कवितांशी संबंध काय?

या सीमायुद्धातल्या पराभवानंतर दोन वरिष्ठ सेना धिकाऱ्यांची एक समिती नेमण्यात आली. इथे काही प्रश्न उद्‌भवतात.

१) या नेमलेल्या समितीची कार्यकक्षा : ही समिती शासनाने नव्हे तर भूदल प्रमुखांनी नेमली होती. ले. ज. हंडरसन- ब्रुक्स हे ऑस्ट्रेलियाचे पण १९४७ नंतर त्यांनी भारतीय सैन्यदलातच राहाणे पसंत केले. त्यांच्या मदतीला ब्रिगेडियर पी. अेस. भगत अशी ही दोन जणांची समिती. भगत हे ब्रिगेडियर या पुरेशा वरच्या श्रेणीतले पण या श्रेणीपेक्षा वर मेजर जनरल व लेफ्टनंट जनरल या श्रेणी असतात. मग भगतच का? संपूर्ण दुसऱ्या महायुद्धांत जे भारतीय लढले त्यांत 'व्हिक्टोरिया क्रॉस' हे वैयक्तिक शौर्यासाठी मिळणारे पदक मिळवलेले ते एकटेच म्हणून. कार्यकक्षा अशी :

१९६२ मध्ये खालील बाबींमधे कुठे - कशा चुका झाल्या? (What went wrong.) i) प्रशिक्षण; ii) शस्त्रे-रसद- पुरवठा; ) iii) निर्णय घेण्याची पद्धत; (System of command) iv) सैन्य- जवान यांची शारीरिक तंदुरुस्ती (Physical Fitness of Troops.) v) सर्व श्रेणीतल्या अधिकाऱ्यांची आपल्या हाताखालील माणसांवर प्रभाव टाकणे-टिकवण्याची क्षमता. (Capacity of Commanders at all levels to influence the men under their command.)

या कार्यकक्षेला एक बंधन होते ते म्हणजे पराजय का-कसा झाला याची समीक्षा असली तरी खास लक्ष 'नेफा मधील कामेंग सीमा विभाग' असे मर्यादित होते. महत्त्वाचे निर्णय हे सैन्यमुख्यालयात घेण्यात येतात. इथे शोध- चौकशी करू नये असे समितीला भूदल प्रमुखांनी आज्ञापिले होते. म्हणजे समितीची कार्यकक्षा आधीच नेफाच्या एका आघाडीपुरती सीमित, त्यात पुन्हा सेना मुख्यालय कक्षेबाहेर अशी फार मर्यादित ठेवली गेली. देश मात्र पराभवाची चौकशी होते आहे अशा खोट्या समजुतीत राहिला.

या अहवालाचा कांही भाग तत्कालीन संरक्षण मंत्री यशवंतराव चव्हाण यांनी लोकसभेत उघड केला. मात्र फार मोठा भाग सध्या जाहीर करणे देशहिताचे नाही असेही स्पष्ट करत गुप्ततेच्या आवरणात ठेवला. आज

अनुक्रमणिका






पन्नास वर्षे उलटली तरी अजूनही तो 'गुप्त' आहे. ऑस्ट्रेलियन पत्रकार नेव्हिल मॅक्सवेल नवी दिल्ली येथे एका ब्रिटिश दैनिकाचे वार्ताहर म्हणून कार्यरत होते. त्यांना अनेक गुप्त कागदपत्रे 'पाहण्यास' (म्हणजे फोटोप्रती - झेरॉक्स नव्हे) मिळाली ज्यात हा अहवालही होता. त्यांच्या 'India's China War' या पुस्तकात त्यांनी बरीच गुप्त माहिती उघड केली. ते पुस्तक या सीमायुद्धाचे दायित्व चीनवर नव्हे तर भारतावर टाकणारे आहे. अलिकडे त्यांनी त्या हेंडरसन - ब्रुक्स समिती अहवालाचा एक मोठा भाग (संपूर्ण नव्हे) स्वतःच्या संकेतस्थळावर उघड केला. त्या उघड केलेल्या भागात वरील 'Charge of the Light Brigade' कवितेतल्या ओळी उद्धृत केल्या आहेत, हेंडरसन-ब्रुक्स समितीने आज्ञा पाळणे हा कठोर शिस्तीचा भाग; मात्र त्या आज्ञेमागे एक कार्यक्षम प्रणाली कार्यरत नसेल तर माणसे अकारण मारली जातात. हे क्षम्य मानता येत नाही, असा या कवितेचा आशय आहे.

खरा प्रश्न असा : १९६२- सीमायुद्ध- पराभव या प्रकरणाची सर्वंकष चौकशी झालीच नाही. राष्ट्राच्या भवितव्यावर परिणाम करणाऱ्या अशा मोठ्या घटना लोकशाही राष्ट्रांमध्ये चौकशीशिवाय निसटतात हे अनाकलनीय आहे. ७ डिसेंबर ४१ चे 'पर्ल हार्बर' (अमेरिका), पहिल्या महायुद्धातले 'गॅलिपॉली' प्रकरण (तुर्कस्तानवर ब्रिटनचा नाविक हल्ला-प्रचंड हानी-माघार-विन्स्टन चर्चिल यांना नौदल मंत्रिपदाचा राजीनामा देणे भाग पडणे) या व अशा मोठ्या, अपार हानी सोसायला लागलेल्या घटनांची चौकशी त्या राष्ट्रांनी अनेक परींनी केली, अहवाल प्रसिद्ध केले. जर राष्ट्र हुकुमशाही असेल तर प्रश्न निराळा. असा पुढाकार घेण्याचे पंडित नेहरूंनी का टाळले ? ते तर लोकशाही पद्धतीचे आग्रही. आज असंख्य कागदपत्रे अजूनही गुप्ततेच्या आवरणाखाली आहेत. त्यामुळे या सर्व युद्धपर्वाची कथा काही संबंधितांच्या आठवणी, चरित्र, सुट्या घटना, त्यावरून बांधलेले अंदाज यावर सीमित राहाते.

"As war and society have become more complicated - and war, it must be remembered, is an inherant part - of society - Strategy has of necessity required increasing consideration of non-military factors : economic, psychological, moral, political and technological.

In the present world, then, strategy is the art of controlling and utilizing the resources of a nation- or a coalition of nations- including its armed forces, to the end that its vital interests shall be effectively promoted and secured against enemies, actual, potential or merely presumed.

- Edward Mead earle.

Again and again, military men have seen themselves hurled into war by the ambitions, passions and blunders of civilian governments, almost wholelly uninformed as to the limits of their military potential and almost recklessly indifferent to the military requirements of the war they let loose.

- Alfred Vagts.

**भारत-चीन-१९६२-** आज ५० वर्षे उलटली तरी १९६२ च्या सीमायुद्धातल्या पराभवाच्या स्मृती भारतीय मनाला छळतात. तुलना महाराष्ट्राला आजही बोचणाऱ्या पानिपत-१७६१ शी करता येईल. अर्थात हा पराभव का झाला, टाळता आला नसता का अशा स्वरूपाची ही चर्चा असते. जोडीला चीनविषयी एक न्यूनगंडातून आलेली भीती भारतीय जनमानसात आहे. १९९० ते २०१४ या पंचवीस वर्षांत उत्पादन-बाजारपेठ-उर्जास्त्रोत-अर्थकारण-संरक्षण या व अशा सर्वच क्षेत्रांत चीनने जी झेप घेतली आहे ती पाहाता जनमानसावर असलेली भावना जास्त गडद झाली आहे. या '१९६२' प्रकरणात भारतातर्फे निर्णायक जागी तत्कालीन प्रधानमंत्री पंडित नेहरू होते. या १९६२ प्रसंगाने ते एकाएकी खचले, प्रकृती ढासळली व २७ मे १९६४ ला देहांत झाला. साहाजिकच त्यांच्या मृत्युला ५० वर्षे पूर्ण होत असताना १९६२ पुन्हा चर्चेत येणार.

स्वातंत्र्य आंदोलनातले बिनीचे सेनानी, स्वतंत्र भारताच्या परराष्ट्र धोरणाचे शिल्पकार, राष्ट्रसभा (काँग्रेस) उभारणीत एक प्रचंड मोठे योगदान दिलेले

नेते, देशातल्या तरुण पिढीतल्या अनेकांचे दैवत, साधारणत: १९३७ पासून महात्मा गांधींपेक्षा कदाचित जास्त जनप्रिय, आधुनिक भारताची पायाभरणी करणारे, अणुशक्तीचे महत्त्व १९४६ लाच ओळखणारे, पहिले प्रधानमंत्री, मान्यवर लेखक, इतिहास प्रवाहांची सखोल समज असणारे, पक्षाच्या सीमा ओलांडून ज्यांचा प्रभाव जाणवतो असे विभूतिमत्त्व लाभलेले, ...... नेहरूंचे स्मरण करताना ही मालिका आणखी खूप मोठी होईल. 'नवभारत'च्या या विशेषांकात यातल्या महत्त्वाच्या पैलूंवर चर्चा होईलच. या लेखात वरील सर्व गोष्टींचा मुद्दाम धावता उल्लेख यासाठी की, १९६२ च्या आधी निदान १५ वर्षे भारताचा सर्वोच्च नेता असे स्थान - निर्णय क्षमता- अधिकार हाती असतानाही घडले तसे "१९६२ का?" आज विचार करताना काही त्रुटी-फटी जाणवतात. काही त्या परिस्थितीच्या आहेत, काही धोरणात्मक आहेत, काही व्यक्तींच्या आहेत, काही वाचन चुकल्याच्या आहेत. या मर्यादांचा निर्देश म्हणजे नेहरूंना मोडीत काढणे नव्हे. प्रश्नांच्या चर्चेपेक्षा विभूतिपूजेवर लक्ष केंद्रीत करणारी आपली मानसिकता आहे. त्यामुळे फटी-त्रुटींचा निर्देश करणे म्हणजे लेखकाला त्यांच्याविषयी अनादर आहे असे नव्हे. हे नोंदवणे आजच्या काळात अत्यावश्यक वाटते.

चीनसंबंधी नेहरूंना एक मोठे आकर्षण होते हे १९४७ च्या आधीच्या त्यांच्या लिखाणावरून स्पष्ट होते. चीनची प्राचीन संस्कृती आकर्षणाचा विषय होणे यात गैर काहीच नाही. मात्र या आकर्षणापोटी शांतिप्रिय चीनचे असे वर्णन त्यांनी केले आहे. केंद्रसत्ता मजबूत असली म्हणजे चीन विस्तारवादी होतो हे चीनच्या इतिहासावर धावती नजर टाकणाऱ्यालाही कळते. हा विस्तार युद्धाशिवाय होत नाही. आजचा चीन असा विस्तारवादातून निर्माण झाला आहे. उत्तरेतल्या (स्टेप्पी प्रदेश) टोळ्यांच्या आक्रमणाला एक अडथळा यासाठी चीनने ती सुप्रसिद्ध भिंत बांधली. पुढे त्या भिंतीचा विस्तारही केला. ही भिंत बांधण्यात अगणित लोक कुपोषण - आजार यामुळे मृत्यू पावले. उत्तरेतल्या मंगोल वगैरे टोळ्यांना थांबवण्यात ही भिंत पूर्णपणे अयशस्वी ठरली हे आपण क्षणभर बाजूला ठेऊ. इथे हे अधोरेखित करायचे आहे की, चीनची सध्याची सीमा व ही भिंत साध्या नकाशावर पाहिली तरी विस्तारवाद लक्षात येतो. नजिकच्या भूतकाळातले उदाहरण 'काशघरीया'- (आजचा सिकियांग) एकोणिसाव्या शतकाच्या मध्याला सैन्य पाठवून साम्राज्यात विलीन करण्यात आल्याचे आहे. सिकियांगचा अर्थच 'नवा प्रदेश' असा होतो. इथे तिबेट या टप्प्यावर चर्चेत घेतलेला नाही कारण तिबेटवरचे आक्रमण १९५० सालचे आहे. ते आपण पुढे पाहूच. हा विस्तारवाद एका मानसिकतेतून येतो. मिडिल 'किंगडम' अशी ती मानसिकता आहे. सूर्य जसा आपल्या ग्रहमालेत केंद्रस्थानी - इतर ग्रहांनी त्या भोवती फेऱ्या मारायच्या - त्या चालीवर जगाच्या केंद्रस्थानी चीन, इतर प्रदेश हे त्याभोवती फिरणारे ग्रह अशी ही मानसिकता आहे. ही मानसिकता नवी नाही, मध्ययुगापासून सतत दिसते. हे एका इतिहासवेत्याला जाणवले कसे नाही? आपल्या लिखाण-भाषणांत एके ठिकाणी त्यांनी चीन-भारत फार घनिष्ठ संबंध होते, पुढे चालून चीन-भारत यांचे एक 'फेडरेशन' होऊ शकेल अशी शक्यता-आशा मांडली आहे. संबंध होते हे खरे आहे, ते फार घनिष्ठ कधीच नव्हते. वाहातूक साधने, पर्वतरांगा, वगैरे भौगोलिक घटक पाहाता फार घनिष्ठ संबंध शक्यही नव्हते. मग हे मायाजाल आले कुठून, असा प्रश्न पडतो. १९४६ साली अजून स्वातंत्र्य अस्तित्वात यायला अवधी होता, फाळणी समोर दिसत होती, देशांतर्गत खूप प्रश्न होते. मुख्य म्हणजे हे मर्यादित अधिकारक्षेत्र होते. यावेळी अंतरिम शासनात नेहरू प्रधानमंत्री झाले. या काळात त्यांनी लगेचच एक 'आशिया संमेलन' आमंत्रित केले. साम्राज्यवादाविरोधी एक पाऊल, साम्राज्ये संपल्यावर 'आशिया' एकत्र राहावा कारण पुढचा काळ आशियाचा असा हा विचार जाणवतो. आशिया हा एक खूप मोठा भूभाग आहे हे खरे पण इथे अनेक राज्ये आहेत. प्रत्येकाचे आपापले हितसंबंध आहेत - ते परस्परविरोधी ही असू शकतात. याच संमेलनात तिबेटला स्वतंत्र आमंत्रण दिल्याने चीनने हरकत घेतली होतीच. चॅंग-काई-शेक यांचा चीन. हे पतीपत्नी नेहरूंचे व्यक्तिगत स्नेही. मात्र राष्ट्राचा विस्तार आणि स्नेह यांची सरमिसळ ते करत नव्हते. १९४६ साली चीनने तिबेटच्या स्वतंत्र राष्ट्र या अस्तित्वावर प्रश्नचिन्ह उभे

अनुक्रमणिका





केल्यावरही १९५० साली जेव्हा कम्युनिस्ट चीनने तिबेट फौजा पाठवून चिरडला तेव्हा भारताला आश्चर्य अगर अनपेक्षित पाऊल असे का वाटले? स्वप्नरंजन की, परिस्थितीचे वाचन चुकले? १९६२ साली सीमा युद्ध सुरू असताना हे कुठे थांबणार याची शाश्वती नव्हती. पाश्चिमात्य राष्ट्राकडे मदत (शस्त्रास्त्रे) मागण्यात आली. त्याचा तपशील इथे महत्त्वाचा नाही. त्या वेळी अमेरिकेने 'मॅकमहोन रेषा' ही आम्ही भारत-चीनमधली सीमारेषा मानतो असे जाहीर केले. चीनच्या मुख्य भूमीच्या शासनाची प्रतिक्रिया येण्याआधी फार्मोसा बेट- आता तैवान- इथे शासक असलेले चँग-काई-शेक यांनी आपली नाराजी - असहमती तातडीने अमेरिकेला कळवली. तैवानचे स्वतंत्र अस्तित्व पूर्णपणे अमेरिकेचा पाठिंबा व संरक्षण यावर अवलंबून होते - आजही आहे. 'आशिया आता एक' ही घोषणा राहाते, राष्ट्रे आपले हितसंबंध सांभाळतात.

स्वातंत्र्य आंदोलनाच्या काळात नेतृत्व-चळवळ-पक्षबांधणी यात मग्न असतानाही नेहरू परराष्ट्रसंबंध यावर विचार-कृती करत होते. याची जाहीर सुरुवात १९२९ च्या ब्रसेल्स संमेलनापासून होते. काही काळ डॉ. राम मनोहर लोहिया त्यांच्या मदतीला असत. अर्थात सुरुवात साम्राज्यवादविरोधी फळी बांधणे अशी. ब्रिटनच्या हुजूर पक्षापेक्षा (टोरी) मजूर (लेबर) पक्षाला भारताची आस्था तुलनेने जास्त होती. निर्णायक क्षणी आपले एक वर्तुळ असावे, उपयोगी पडेल म्हणून नेहरूंनी मजूर पक्षात संबंध रुजवले होते. साहजिकच परराष्ट्र संबंध हा विषय त्यांच्या अखत्यारीत होता. परिणामी काँग्रेस पक्षात इतर कुणीही या विषयात रूची ठेवत नसे. 'पंडितजी नोज बेस्ट.' त्यामुळे चर्चा-मंत्रणा पक्षात होत नसे. नेहरू ठराव मांडत, त्यावर भाषण देत, पक्ष संमती देई. एकदा स्वातंत्र्य मिळाल्यावर ते परराष्ट्रमंत्रीही झाले व पक्षात जुनाच प्रघात सुरू राहिला.

परराष्ट्र संबंध व संरक्षण हे एकमेकात गुंतलेले विषय आहेत, एकाच नाण्याच्या दोन बाजू.

मात्र स्वतंत्र भारतात या 'संरक्षण' व्यवहाराची फारशी जाण दिसत नाही. याचा संपूर्ण दोष नेत्यांवर टाकता येत नाही हे खरेच आहे. मात्र काही अंशी याकडे दुर्लक्ष हे दायित्व नेतृत्वाला टाळताही येणार नाही.

ब्रिटिश साम्राज्याचा भाग असलेल्या भारताच्या संरक्षणाचे एक धोरण आखलेले होते. फार मोठे भूदळ नको. सीमांपर्यंत रस्ते-रेल्वे न्यायचे नाहीत. (प्रसंगी शत्रू थोडा आत आला तर रसदपुरवठा हा मोठा प्रश्न त्याला पडेल.) ब्रिटिश नौदल मोठे, सक्षम व जगभर वावर असलेले. जर गरज पडली तर साम्राज्याच्या इतर भागातून भारतात सेना आणता येईल. हिमालयात काश्मीर, नेपाळ, सिक्किम, भूतान हा प्रदेश म्हणजे ब्रिटिश प्रभावळीतलाः बफर झोन. चीन त्याकाळी दुर्बल पण भीती रशियाची. रशियाला इराण व/वा अफगाणिस्तान मार्गे हिंदी महासागरात प्रवेश नाकारायचा. धोरणाचा ढोबळ आराखडा वरीलप्रमाणे.

स्वातंत्र्य मिळाले - सोबत फाळणी. भूव्युहात्मक चित्र संपूर्ण बदलले. आता नव्या परिस्थितीला तोंड देण्यासाठी नवे धोरण आवश्यक होते. तसा विचार सर्वांगीण प्रकारे झाल्याचा पुरावा नाही. नेहरू व त्यांचे स्नेही सरदार पणिक्कर यांनी समुद्री सीमांचे रक्षण - यासाठी मजबूत नौदल उभे करणे-याचा एक आराखडा तयार केला होता. सक्षम नौदल खर्चिक असते. त्यासाठी लागणारा पैसा हा आंतरराष्ट्रीय व्यापार वाढवून उभा करावा लागतो. नेहरूंच्या काळात भारताचा त्या क्षेत्रातला वाटा नगण्य होता. शिवाय निर्यात वाढेल अशी अर्थरचनाही नव्हती. मात्र एक दिशा दर्शक अभ्यास होता यात वाद नाही. सर्वंकष संरक्षण धोरण आजही नीट विचारावर आखलेले नाही.

हे एक कोडेच आहे. १९२९ साली लाहोरच्या अधिवेशनात संपूर्ण स्वातंत्र्याचा ठराव पारित करण्यात आला जो नेहरूंनीच अध्यक्षपदावरून मांडला. संपूर्ण स्वातंत्र्य म्हणजे ब्रिटिशांनी सत्ता काँग्रेसच्या हाती सूपूर्त करत भारतातून पाय काढून घेणे. अशी मागणी करताना परराष्ट्रधोरण ठरवण्याऱ्या पक्षाला व नेत्याला त्याच नाण्याची दुसरी बाजू असलेल्या 'संरक्षण' या प्रश्नाचा अभ्यास करणारा एखादा गट पक्षात उभा करावा, त्यांना उत्तेजन द्यावे, असे सुचलेच नाही? सुचले असेल तर कार्यवाही नाही. ही त्रुटी समजून घेणे अवघड आहे.

प्रधानमंत्री होताच नेहरूंनी भारताचे खडे सैन्य फक्त दीड लाख असावे अशी आज्ञा काढली. भूदल प्रमुख ब्रिटिश होते. त्यांनी नेहरूंना भेटून सैन्यसंख्या ही धोका कुठून, त्याची व्याप्ती किती यावर अवलंबून असल्याने (थेट परसेप्शन) शासनाने यासंबंधी दिग्दर्शन करावे म्हणजे सेनादल सैन्यसंख्या किती याचा आकडा व समर्थन देईल. त्यावर शासनाने निर्णय घ्यावा अशी विनंती केली. नेहरूंनी भारताला कुठूनही धोका नाही तेव्हा सैन्य दीड लाख पुरेसे आहे असे सांगितले. पुन्हा पत्र लिहिताना मात्र फार तर दोन लाख अशी दुरूस्ती केली. हा फरक तेहेतीस टक्के इतका आहे. त्यामुळे यामागे काही गणित, विचार दिसत नाही. यानंतर दोनच महिन्यांच्या आत काश्मीरमध्ये सेना उतरवणे भाग पडले. सेनेवरचा खर्च कमी करून तो देश उभारणीकडे वळवणे हा यामागचा विचार असू शकेल. मात्र हे कुठल्याही अभ्यासावर आधारलेले नव्हते.

या "सैन्यसंख्या कमी" यामागे 'कॅनडा' हे प्रारूप उभे आहे. कॅनडा हाही राष्ट्रकुलातला देश. अत्याधुनिक शस्त्रे, वाहातूक मोटराइज्ड् पण संख्या लहान. याचा अभ्यास करण्यासाठी एक शिष्टमंडळ कॅनडाला पाठवण्यात आले. अहवाल अर्थातच अनुकूल आला. कॅनडा भौगोलिक आकारात भारताहून मोठा; मात्र इतर बाबी? तीन दिशांना समुद्र तर शेजारी अमेरिका हा निकटचा मित्र देश. त्यामुळे कॅनडा-भारत अशी कुठलीच तुलना संरक्षण क्षेत्रात होऊ शकत नाही. अहवाल अनुकूल येणारच होता. सुदैवाने त्यावर पुढे फारसे काही घडले नाही.

भारताचे स्वातंत्र्यापासूनचे संरक्षणमंत्री पाहिले म्हणजे याविषयीचे महत्त्व किती कमी होते हे लक्षात येते. पहिले सरदार बलदेवसिंग. गर्भश्रीमंत, सज्जन, खानदानी उदारमतवादी वागणूक. शिखांमधे खळबळ होती, सैन्याचा जवळपास ३५ टक्के भाग शिखांचा होता हे त्यांच्या मंत्रिपदाचे कारण. त्यांना मंत्रालयात रस नव्हता. सर्व कारभार 'बाबू' मंडळींच्या हाती गेला. गोपालस्वामी अय्यंगार फार काळ त्या पदी नव्हते, काही महिन्यांतच त्यांचा मृत्यु झाला. महावीर त्यागींना पक्षात थोडे वजन होते पण ते पहिल्या फळीतले नेते नव्हते. कैलासनाथ काटजू यशस्वी वकील; पण थकत चाललेले, ऐकू कमी येत असे. बटालियन व डिव्हिजन या सैन्यसंज्ञांमधला फरकही त्यांना उमगला नव्हता. लष्कराच्या एका महत्त्वाच्या सभेत त्यांनी मानस सरोवराच्या संरक्षणाची नीट तयारी आहे ना असा प्रश्न वरिष्ठ सेनाधिकाऱ्यांना विचारला. "रक्षामंत्रीजी, मानस तिबेटमधे आहे, तिबेट चीनचा भागच आहे हे आपण मान्य केले आहे. तेव्हां जर मानसचे रक्षण भारताने करावे असा चीनचा प्रस्ताव असेल व तो आपण स्वीकारला असेल तर तसे आदेश द्या, मानसची संरक्षण व्यवस्था आखून मंजुरीसाठी आपणाला सादर करू" असे सेनाधिकाऱ्याने सांगितले. तो दुसरे काय सांगणार?

या पार्श्वभूमीवर सैन्यामध्ये आपल्याकडे दुर्लक्ष होते आहे ही भावना बळावली. १९५७ च्या निवडणुकीनंतर नेहरूंचे सर्वात निकटचे स्नेही व्ही. के. कृष्णमेनन संरक्षण खात्याचा कार्यभार सांभाळू लागले. आता सरळ आपल्या मागण्या नेहरूंपर्यंत नीट आग्रहाने मांडल्या जातील, कामे होतील असे उत्साहाचे वारे सैन्यात वाहू लागले. मात्र भ्रमनिरास काही महिन्यांतच झाला. मेनन यांचा अहंकार, त्याचे परिणाम हा भाग आहेच; मात्र इथे एवढेच पुरे की त्यांना खात्यात फ़ारसा रस नव्हता. परराष्ट्र व्यवहार, राष्ट्रसंघ इथल्या चर्चा यात ते सतत रस घेत. ज्याला नेहरूंचा पाठिंबा असे. मेनन यांच्या काळात संरक्षण उत्पादनात नवे कारखाने स्थापन झाले, उत्पादनात वाढ झाली हे खरेच आहे. मात्र हा संरक्षण व्यवस्थेचा एक भाग झाला. इतरत्र त्यांच्या अहंकार - दुसऱ्याचा अकारण अपमान करणे या स्वभावामुळे सैन्यात अस्वस्थता, निराशा पसरली. मेनन यांना राज्यकर्त्या पक्षात काहीच स्थान नव्हते. नेहरूंच्या अतीव विश्वासातले असल्याने त्यांना उघड विरोध कुणी करत नसे, कारण मेनन यांच्या मताच्या विरोधी कुणी मत मांडायला गेले तर नेहरू दुर्लक्ष करत, उडवून लावत वा संतापत. मेननना विरोध म्हणजे आपल्यालाच विरोध अशी त्यांची मानसिकता तयार झाली होती.

आणखी एक संलग्न क्षेत्र हेरव्यवस्थेचे आहे. स्वातंत्र्याआधी आयबी (इंटलीजन्स ब्युरो) ही एकच








हेरगिरी करणारी यंत्रणा भारतात होती. अर्थातच एक मोठे साम्राज्य जतन करण्याच्या यंत्रणेतला एक हिस्सा. भारत सोडायचा हा निर्णय ब्रिटिशांनी घेताच या संस्थेचे सर्व महत्त्वाचे कागदपत्र नष्ट करण्यात आले. जे उरले ते पाकिस्तानकडे गेले. आयबीला पुन्हा बऱ्याचशा कोऱ्या पाटीवर सुरुवात करावी लागली. देशात व परदेशात हेरगिरीचे काम एकाच संस्थेकडे आले. १९५० ला घटना स्वीकृत झाल्यावर, निदान १९५२ साली पहिली निवडणूक पार पडल्यावर परदेशासंबंधात हेरगिरीसाठी निराळ्या संस्थेची निर्मिती करणे आवश्यक होते पण ते करण्यात आले नाही. १९६२ मध्ये याही त्रुटीमुळे नुकसान झाले. 'रॉ' ही स्वतंत्र व्यवस्था १९६८ साली जन्माला घातली गेली - स्वातंत्र्यानंतर २१ वर्षांनी. ज्यातला १७ वर्षांचा काळ हा नेहरू काळ आहे.

सत्तेच्या केंद्राभोवती लाभार्थी जमताताच. सत्ताधाऱ्यांशी जवळीक ही त्यांची शक्ती-ऊर्जा असते. इथे नेहमीच धोका असतो. नेहरूंभोवती काही 'ब्लाईंड स्पॉटस्' होते. यांना नेहरूंचा पाठिंबा गृहीत असे, बाहेरच्या जगाला ते जाणवे. ही माणसे लाडकी असल्याने त्यांना अतोनात संरक्षण असे कारण त्यांचेबद्दल काहीही नेहरूंपर्यंत आग्रहाने मांडणारे धैर्य कुणाकडे नव्हते म्हणा किंवा नाहीतरी ऐकून घेणारच नाहीत मग कशाला हात दाखवून अवलक्षण पदरी घ्या असा विचारही होई. मेनन यांचा उल्लेख वर आला आहे. आणखी नावे आहेत, (उदाहरणार्थ नेहरू भगिनी विजयालक्ष्मी पंडित) मात्र या '१९६२' प्रकरणाशी संबंधित दुसरे नाव आहे ले. ज. ब्रिजमोहन कौल यांचे.

ले. ज. कौल यांचा उदयास्त स्तिमित करणारा आहे. आझाद हिंद सेनेच्या तीन अधिकाऱ्यांविरूद्ध जो खटला ब्रिटिशांनी भरला त्याची कायदेशीर बाजू भुलाभाई देसाई हे नामवंत कायदेपंडित सांभाळत होते-त्या अधिकाऱ्यांच्या वतीने. मात्र त्यांच्या भावना-कृतीमागे देश उभा आहे हे पुढे आणणे कॉंग्रेसचे कर्तव्य होते. हा पाठिंबा दर्शवण्यासाठी नेहरू बॅरिस्टर म्हणून उभे राहिले. 'बंडाचा अधिकार (राइट टू रिबेलियन), हे भुलाभाईंचे बचावाचे भाषण गाजलेले आहे. या खटल्याच्या काळात कौल यांनी सेनामुख्यालयातली एक फाईल पंडित नेहरूंना वाचायला दिली. खरे तर हा शिस्तभंग होता. आझाद हिंद सेना, नौदलातले बंड यातल्या मंडळींना सैन्यदले राजकारणापासून अलिप्त असावी हा मुद्दा ठसवण्यासाठी स्वातंत्र्यानंतर पुन्हा सैन्यापासून दूर ठेवणाऱ्या नेहरूंना कौल यांचा शिस्तभंग आक्षेपार्ह वाटला नाही. ते कौल होते, काश्मिरीही होते, नेहरूंच्या दूरच्या नात्यातले होते. अशी अनेक कारणे अनेकांनी नोंदली आहेत.

या फाईल प्रकारानंतर कौल यांची वाटचाल थक्क करणारी आहे. त्याचा आढावा सर्वश्रुत आहे. त्यांना पुढे चालून भूसेना प्रमुख करण्यासाठी नेहरूंनी आपली सर्व प्रतिष्ठा वापरली. सैन्यात दुफळी माजली. थिमय्यांवर उठाव करण्याचा कट रचल्याच्या वावड्या उडवण्यात आल्या, माणेकशॉंवर लष्करी न्यायालय नेमून खटला भरला गेला. (कोर्ट मार्शल). १९६२ ला कामेंग डिव्हिजन (नेफा) इथे थागला इथून चिनी सैन्याला 'हाकलण्यासाठी' लष्करी तयारी अपुरी आहे हे पुराव्यासह मांडणाऱ्या अधिकाऱ्याचे कार्यक्षेत्र कमी करून 'कोअर क्र. चार' रातोरात निर्माण करत कौल यांना त्याचे सेनापतित्व देण्यात आले. तिथे ते आजारी झाल्यावर दुसरा सेनापती (ले. ज. हरबक्षसिंग) नेमले पण चारच दिवसांनी नेहरूंनी भूदल प्रमुखांवर दबाव आणून पुन्हा कौल यांना चार कोअरचे, प्रमुखपद देण्यास भाग पाडले. हा सेनेच्या कारभारात अनावश्यक, युद्ध न समजणाऱ्या प्रधानमंत्र्याचा आक्षेपार्ह हस्तक्षेप होता. भूदल प्रमुख या दबावापुढे झुकले. (ज. थापर). जर थिमय्या वा थोरात असते तर त्यांनी नकार दिला असता, वेळ आल्यास त्यागपत्र दिले असते. थिमय्या, थोरात, वर्मा यांच्या सारख्या तज्ज्ञ, कार्यक्षम पण होयबा नसणाऱ्या अधिकाऱ्यांना अपमानास्पद स्थितीत सेना सोडावी लागली होती. हे सर्व कौल यांना प्रमुख करण्यासाठी. हे नेहरूंचे कौलप्रेम इतके उतू चालले होते की युद्ध संपताना (चीनने जाहीर केलेली एकतर्फी युद्धबंदी आणि 'नेफा' मधून माघार) मेनन यांचा राजिनामा अत्यंत अनिच्छेने स्वीकारणाऱ्या नेहरूंनी भूदल प्रमुखांनी राजीनामा देणे हे घडल्यावर कौल यांना भूदल प्रमुख करण्याचा पवित्रा घेतला. राष्ट्राध्यक्ष राधाकृष्णन् यांनी ठाम नकार दिल्याने ती आपत्ती राष्ट्रावर

ओढवली नाही.

ज. अेस. डी. वर्मा यांनी देशी बनावटीची स्वयंचलित बंदूक विकसित करून सर्व चाचण्या पार पाडत भारतीय सैन्याला कालबाह्य ३०३ (पहिले महायुद्ध १९१४/१८) मधून आधुनिक काळात आणण्याची तयारी पूर्ण केली. १९५९ साली उत्पादनाला सुरुवात करत १९६२ पर्यंत सैन्य हे हत्यार वापरण्यात तरबेज झाले असते. मात्र मेनन यांनी हे उत्पादन होऊ दिले नाही. युद्ध पेटताच मात्र जी शस्त्रास्त्र-मदत परराष्ट्रांकडे मागण्यात आली त्यात पहिला क्रमांक या स्वयंचलित बंदुकींचा होता. लडाखमध्ये भारतीय सैन्य मजबूत स्थितीत आहे या नेहरूंच्या लोकसभेत केलेल्या विधानाला हरकत घेत वस्तुस्थिती तशी नाही हे स्पष्टपणे मांडणाऱ्या याच वर्मा यांना पदोन्नती नाकारण्यात आल्याने त्यांनी त्यागपत्र दिले जे सेनादलांच्या परंपरेला धरून होते. थोरातांनी नेफामध्ये चिनी आक्रमण झाले तर कुठल्या मार्गाने व टप्प्यांनी होईल, किती शक्ती चीन रणांत उतरवेल याचा तंतोतंत अंदाज बांधून त्याला यशस्वी उत्तर देण्याची त्रिस्तरीय योजना तपशिलात मांडली होती, मात्र तीवर विचारच झाला नाही. अशी काही योजना आहे हे प्रधानमंत्र्यांना युद्ध संपल्यावर कळले. थोरातांना भूदल प्रमुख करण्याऐवजी थापर यांना प्राधान्य दिल्यामुळे थोरातांनी त्यागपत्र दिले.

हे असे का घडत होते? वर्मा - थोरात हे वरिष्ठ सेनाधिकारी होते. त्यांचे म्हणणे प्रधानमंत्र्यांपर्यंत पोहोचूही नये अशी पावले उचलण्याचे धैर्य (की माज) मेनन यांना कुठून आले? एक तर नेहरूंचा ब्लाईंड स्पॉट. दुसरे कारण व्यवस्थेत आहे.

भारतात संसदीय लोकशाही रुजावी म्हणून अथक प्रयत्न नेहरूंनी केले. हे वादातीत आहे. संसदेला ते पुरेसा वेळ देत, प्रश्नोत्तरांच्या तासावर, महत्त्वाच्या चर्चांवर ते बारीक नजर ठेवत. याबद्दल देशाने कृतज्ञ राहायला हवे. मात्र त्यांच्या, पक्षाची बंधने ओलांडणाऱ्या, लोकप्रियतेचा एक परिणाम असा झाला की अनेक महत्त्वाचे निर्णय मंत्रिमंडळापुढे येत, तिथे निर्णय होण्याऐवजी नेहरू निर्णय घेत, जाहीर करत. मंत्रिमंडळात नंतर औपचारिक शिक्कामोर्तब होई. हळूहळू ही सवय मंत्रिमंडळातल्या इतर सहकाऱ्यांनी आपलीशी केली. त्यामुळे मंत्रिमंडळाची संरक्षण समिती या संस्थेची नीट वाढ होणे, परंपरा रुजणे हे झालेच नाही. (आजही, काही अपवाद वगळता, हीच स्थिती आहे. संरक्षण खात्याच्या अर्थसंकल्पीय तरतुदींवर संसदेत सखोल चर्चा कधी झाली याचा शोध घ्यायला बहुधा महाभारताचा काळ गाठावा लागेल.)

एक मुद्दा नेहरूंनी मांडला जो महत्त्वाचा आहे. संरक्षण या प्रयत्नामागे एक मोठे कारखानदारीचे जाळे उभे लागते. आधुनिक सैन्याला जी शस्त्रे, रसद लागते त्यामागे असंख्य वस्तू निर्माण करणारी अत्याधुनिक कारखानदारी उभी हवी. असे चित्र नसल्यास आयात हा एकच मार्ग उरतो. कळीच्या, आणिबाणीच्या वेळी आयात जिथून होते ते देश आंतरराष्ट्रीय राजकारणाच्या ताणतणावात नाकेबंदी करू शकतात. त्यामुळे स्वयंपूर्णतेकडे वाटचाल हवी.

भारतात आधुनिक कारखानदारीचा पाया भरण्यासाठी नेहरूंनी खूप मोठे योगदान दिले. १९६४ (नेहरूंचा मृत्यु) यानंतर जे घडले त्यासाठी नेहरूंना जबाबदार धरता येणार नाही. एक मुद्दा राहातो. ही किमान पायाभरणी करण्यासाठी कितीही वेगात काम झाले तरी निदान एक पिढी म्हणजे २०/२५ वर्षे लागणार हे स्पष्ट होते. कुठल्याही गटात सामील न होणे (तटस्थता नव्हे) हे परराष्ट्र धोरण एकदा ठरल्यावर जी शस्त्रात्रे लागणार ती परकीय चलन मोजूनच घ्यावी लागणार, तीही संबंधित देश विकतील, अटी काय हे यक्षप्रश्न होते. या मधल्या २०/२५ वर्षात भारताला कुठल्याही युद्धाला सामोरे जावे न लागणे असे एका बाजूला; तर संरक्षण साहित्याचे उत्पादन - आधुनिकीकरण या क्षेत्रात झपाट्याने प्रगती या पूर्वअटी होत्या. १९५३/५४ पासून पाकिस्तान लष्करी करारात सामील झाल्यावर पाकिस्तान लष्कराचे आधुनिकीकरण विनामूल्य मिळालेल्या शस्त्रमदतीवर झाले. सर्व संरक्षण उत्पादने फक्त शासकीय क्षेत्रात ठेवणे यातून संशोधन - निर्मिती पुरेशा वेगाने होणे शक्य होत नव्हते. त्या व्यवस्थेत ते आपोआप घडते. या शासकीय संस्थांनी काहीच केले नाही असे नव्हे.

मात्र राष्ट्राचा जो पैसा व प्रशिक्षित माणूसबळ यात गुंतले त्या तुलनेत यातून परतावा फार कमी मिळाला ही वस्तुस्थिती आहे.

त्यामुळे पुरेशी तयारी नसताना जर कुणी युद्ध लादलेच तर शस्त्रे - रसद तयारीचे काय हे प्रश्नचिन्हच राहाते. सोबत जी कारखानदारी भारतात खाजगी क्षेत्रात होती तिला संरक्षण उत्पादनात सामील न होऊ देणे हे वस्तुस्थितीकडे दुर्लक्ष करत विचारधारेला प्राधान्य देणे आहे. 'कमांडिंग हाइटस् ऑफ इकॉनॉमी' चा विचार अती टोकाला नेण्याचीही किंमत १९६२ ला चुकवावी लागली.

एका बाबतीत नेहरूंचा निर्णय अत्यंत योग्य होता पण अंमलबजावणीत तो दुर्लक्षित करण्यात आला असे दिसते. हा 'फॉरवर्ड' पॉलिसीशी संबंधित आहे. ज्या वेळी अक्साई चीनमध्ये चीनने रस्ता बांधल्याचे उघड झाले व चीन भूमी व्यापत पुढे येत आहे हे कळले तेव्हा भारताने आपल्याही चौक्या तिथे उभाराव्या, त्या भागात गस्त सुरू करावी हा विचार पुढे आला. याचे जनकत्व कुणाचे हे आजही स्पष्ट नाही. एका टप्प्यावर ज. कौल ही कल्पना आपली अशी शेखी मिरवत. पण प्रकरण अंगाशी आले म्हटल्यावर त्यांनी हे बाळ आपले नव्हे असा विश्वामित्री (?) पवित्रा घेतला. तो वाद नजरेआड केला तरी अशा चौक्या स्थापण्याचा निर्णय झालाच. तो निर्णय घेतेवेळी नेहरूंच्या सूचना स्पष्ट होत्या. १) रसद पुरवठा नीट ठेवता येईल अशाच जागा निवडाव्या. २) गरज पडल्यास त्या चौकीला तातडीने मदत देता आली पाहिजे. या दोन्ही सूचना प्रत्यक्षतः पाळल्या गेल्या नाहीत. याला एक अप्रत्यक्ष कारण म्हणजे 'चीन युद्ध सुरू करणार नाही' हा आपला आशावाद/श्रद्धा नेहरूंमुळे इतकी ठाम पसरली की, होयबा मंडळी त्यावर आधारुन सर्व सूचना नजरेआड करून कुठेही चौक्या वसवू लागली. हे महाग पडले.

चीनला स्वत:चे अंतर्गत प्रश्न खूप आहेत व त्यामुळे चीन युद्धाला उतरणार नाही हा अंदाज त्यांनी इतक्या जणांना वर्गात तास घेतल्याप्रमाणे सांगितला होता (परदेशातही) की, हे परमेश्वरी वचन झाले. त्यावर आधारुन मेनन, कौल, आयबी प्रमुख मलिक ... सर्वच जण तोच पाढा आळवू लागले. १९४९ ला चीनमध्ये कम्युनिस्ट सत्तेवर आले, १९५० ला त्यांनी तिबेट व्यापला. ठीक. सैनिकी क्षेत्रात तिबेट नगण्य होता. मात्र कोरिया? तिथे तर चीन अमेरिकेच्या विरोधात रणात ताकदीने उतरला होता. १९३७ ते १९४५ चीन जपानविरूद्ध लढतच होता. फर्स्ट रेट लँड पॉवर. असा देश युद्धात उतरणे टाळेल याला आधार काय? चीनमधली माओप्रणित 'ग्रेटलीप फॉरवर्ड' ही फसलेली उडी व सोबत 'सांस्कृतिक क्रांतीत' बळी (मृत्यु) पडलेले जवळपास तीन कोटी लोक. यामुळे अस्वस्थ चीन. असा चीन युद्धाची वेळ येऊ देणार नाही ही बांधलेली अटकळ. सोबत जिनिव्हा येथे 'लाओस' वरून चाललेल्या आंतरराष्ट्रीय रस्सीखेचीच्या परिघावर रशियाचे नेते क्रुश्चाव्ह यांच्या मध्यस्तीतून चीनचे सरसेनापती मार्शल चेन सी यांनी युद्धाचा पर्याय आमच्यासमोर नाही असे मेनन यांना दिलेले आश्वासन.

यात दोन गोष्टींकडे पाहाणे आवश्यक आहे. एक म्हणजे दलाई लामांचे १९५९ साली भारतात आश्रयाला येणे. या आगमन-आश्रयामुळे सर्व संदर्भ बदलले. दुसरे म्हणजे राष्ट्र जेव्हा अंतर्गत प्रश्न उग्र झाल्याने अस्वस्थ होते त्यावेळी 'परकीय हात' हा मुद्दा जनतेचे लक्ष अंतर्गत समस्येवरून दुसरीकडे वळवण्यासाठी वापरला जातो. शिवाय आंतरराष्ट्रीय राजकारणात दिलेला शब्द प्रसंगी दुर्लक्षित केला जातो वा फिरवला जातो. 'Trust in God but keep your powder dry' हे ऑलिव्हर क्रॉमवेलचे उद्गार त्रिकालाबाधित आहेत. १९६२ इकडे दुर्लक्ष केल्याने दारुण पराभव दाखवणारे ठरले. हा धडा पुन्हा विसरला गेला श्रीलंकेत हस्तक्षेप केला, त्या वेळी.

१९५० ला चीनने तिबेट व्यापणे घडल्यावर सरदार पटेलांचे नेहरूंना विस्तृत पत्र; १९५४ च्या 'पंचशील' कराराच्या वाटाघाटींच्या वेळी यात सीमा ठरवणे ही गिरिजाशंकर बाजपेयींची आग्रही सूचना अव्हेरणे; मात्र या करारानंतर एक आदेश काढत एकतर्फी सीमा घोषित करत यावर कुणाशीही चर्चा नाही असा नेहरूंचा पवित्रा;- — थोडक्यात १९४९ ते १९६२ या १३ वर्षांच्या घटनाक्रमांचा आढावा या लेखात टाळला आहे. यावर

खूप लिखाण उपलब्ध आहे, शिवाय २०१२ साली (१९६२-पन्नास वर्षे) हे तपशिल पुन्हा एकदा विस्ताराने चर्चिले गेले आहेत.

दोन घटकांचा थोडक्यांत उल्लेख मात्र आवश्यक आहे.

सीमेवर तणाव निर्माण झाल्याचे उघड होताच विरोधी पक्षाच्या खासदारांनी संसदेत गदारोळ माजवायला सुरुवात केली. हे होणे स्वाभाविक होते. मात्र यात दुतोंडीपणाही होता. पन्नाशीच्या दशकात भारताचा संरक्षण खात्याचा अर्थ-संकल्प ३५० कोटींच्या आतबाहेरचा. कशाला एवढा खर्च, हा कमी करा अशी मागणी पूर्वी करणारे काही खासदारच आता तयारी नीट का नाही असे शिरा ताणून विचारु लागले. थोडक्यात नीट अभ्यास ना सत्ताधाऱ्यांनी केला, ना विरोधकांनी.

सैन्याची खरी परिस्थिती काय आहे, युद्ध अंगावर घेण्यासारखी स्थिती आहे का याची स्वतंत्रपणे अभ्यासावर आधारित मांडणी करणे हे माध्यमांपैकी फक्त आघाडीच्या इंग्रजी वृत्तपत्र समूहांनाच शक्य होते. मात्र बातम्या, अग्रलेख, विश्लेषण यातून अस्मितेला गोंजारत वस्तुस्थिती समोर आणण्याकडे दुर्लक्ष झाले. जबाबदार माध्यमांमधे येणारे लिखाण लोकमत घडवण्यास मदत करते. मात्र या एरवी सक्षम माध्यमांनी 'संरक्षण' या प्रश्नाचा अभ्यासच टाळला. साहजिकच ते वाहात गेले.

सुरुवातीच्या काळात नेहरूंनी सीमाप्रश्न - ताणतणाव देशाच्या निदर्शनाला आणले नाहीत, संसदेला अंधारात ठेवले अशीही टीका झाली आहे. मात्र या टप्प्यापर्यंत गुप्तता बाळगणे यात नेहरूंना दोष देता येत नाही. परराष्ट्र व्यवहार हा काही अंशी पडद्याआडच चालायला हवा. फळ पिकले की उघड करावे नाहीतर उथळ गदारोळात दिशा हरवते. १९५७ नंतर, विशेषतः १९५९ नंतर हे वाढत्या प्रमाणांत झाले.

अलिकडे उघडकीला आलेल्या माहितीवरून असे दिसते की १९६२ युद्धापर्यंत न्यायला चौ-एन-लाय सहमत नव्हते पण चीनच्या अंतर्गत प्रचंड क्षोभाचा रेटा दुसरीकडे वळवण्यासाठी माओ-त्से-तुंग यांनी हे पाऊल उचलले. आता हेही स्पष्ट झाले आहे की, १९६० साली चौ-एन-लाय नेहरू वाटाघाटीवेळी अक्साई-चीन वरचा दावा सोडून नेफावर स्वामीत्व चीनकडून मान्य करून घेण्याचा चीनचा प्रस्ताव नेहरूंना मान्य होता, पण मंत्रिमंडळात एकवाक्यता नव्हती. खास करून मोरारजींच्या नेतृत्वाखाली हा विरोध संघटित झाला होता. १९६० पर्यंत लोकमतही पुरेसे प्रक्षुब्ध होते. यामुळे त्यांनी त्या अटींवर करार टळला.

आज जवळपास त्याच अटींवर करार करण्यास भारत तयार आहेसे जाणवते. पण चीनला जे हवे होते ते त्याच्या ताब्यात आहे, (तवांग पट्टा सोडून). सैनिकी-आर्थिक-कारखानदारी क्षेत्रात १९६२ च्या तुलनेत आता पारडे पूर्णपणे चीनच्या बाजूला झुकलेले आहे. आता चीनला घाई नाही.

'नेहरू - १९६२' हा विषय खरे तर एका विस्तृत पुस्तकाचा आहे. इथे फक्त काही मुद्देच घेता आले आहेत. या पराभवाच्या धक्क्याने पंडित नेहरूंसारखा 'भीती ठाऊक नसणारा' (वर्णन चर्चिलाचे) माणूस कोसळला. त्यांचा मृत्यु अलिकडे ओढला गेला. कुठल्याही माणसाला हळहळ वाटेलच. मात्र इतका मानहानिकारक पराभव होण्यास सर्वस्वी तेच जबाबदार नसले तरी मोठा वाटा त्यांचाही आहे हे नाकारता येत नाही.



# जवाहरलाल नेहरू आणि नियोजित आर्थिक विकास

माधव दातार.

जवाहरलाल नेहरू यांच्या निधनाच्या अर्धशताब्दी निमित्ताने आधुनिक भारताच्या संकल्पनेत आणि निर्मिती प्रक्रियेत त्यांचे योगदान काय होते याबाबत चर्चा होणे सहज आहे. नेहरूंचे योगदान (वा ओझे) व त्याचे परिणाम या बाबत आजवर अनेक प्रसंगी विस्तृत लिखाण/चर्चा झाली आहे. मे १९६४ मध्ये त्यांचे निधन झाल्यानंतर लगेच त्यांचा वारसा अगर त्यांची कामगिरी याचे तटस्थ मूल्यमापन होणे कठीण झाले असले तरी नंतर विविध संदर्भात असे प्रयत्न सुरू असल्याचे आढळते. नेहरूंची कागदपत्रे व अप्रकाशित साहित्य २००७ पर्यंत प्रकाशित होणे चालू होते. नेहरूंची नवीन चरित्रे लिहिणे सतत चालू राहिले. (उदा., अकबर, १९९०; गोपाल, १९७६-८४, ब्राउन, २००३). १९८९ साली त्यांच्या जन्मशताब्दीच्या निमित्ताने नेहरूंचा वारसा व समकालीन महत्त्व याबाबत विस्ताराने चर्चा झालेली दिसते (उदा., बिपन चंद्र, १९९०; सरदेसाई व मोहन (संपा.) १९९०) तुलनेत कमी प्रमाणात का असेना मराठीतही ही प्रक्रिया चालू होती. (उदा., राजूरकर व कुरुंदकर, १९७३; परांजपे ह. कृ., १९८९)

या चर्चेत लोकशाही, धर्मनिरपेक्षता व समाजवाद या तीन महत्त्वाच्या परिमाणांचा समावेश तर झाला आहेच पण भारताची संरक्षण सिद्धता, परराष्ट्र धोरण, नियोजन, यांबाबतही चर्चा झालेली आढळते. यांपैकी कोणत्याही मुद्दयावर नव्याने चर्चा करताना त्याचे समकालीन महत्त्व किंवा नवीन माहिती उपलब्ध झाल्याने फेरविचाराची आवश्यकता स्पष्ट नसेल तर ती फक्त उत्सवाची एक बाब राहील. स्वतंत्र भारताने जी आर्थिक धोरणे अनुसरली त्यावर जवाहरलाल नेहरूंचा मोठा प्रभाव होता ही वादाची बाब नाही. नेहरूंनी आर्थिक धोरणांना जी विशिष्ट दिशा व गती दिली त्याचे देशाच्या आर्थिक स्थितीवर दीर्घकालीन परिणाम काय झाले? ते चांगले होते का विपरीत? याबाबत वाद होते व ते अजूनही काही अंशी कायम आहेत. नियोजित अर्थव्यवस्थेचा पुरस्कार करणारे नेहरू बाजारपेठेचे महत्त्व अधोरेखित करत शासनाने अर्थव्यवहारात ढवळाढवळ करू नये अशी वर्तमानात भूमिका घेणाऱ्या उजव्या गटांच्या टीकेचे लक्ष्य ठरले यात काहीच नवल नाही. पण नेहरूंचे डावे टीकाकारही त्यांनी भांडवलशाहीचा पुरस्कार केला व त्यांच्या धोरणाने भारतात भांडवली व्यवस्था बळकट झाली असा त्यांच्यावर आरोप करतात. एकाच वेळी डाव्या आणि उजव्या गटांच्या टीकेचे लक्ष ठरलेल्या नेहरूप्रणीत आर्थिक धोरणाचा संदर्भ वर्तमान आर्थिक धोरणे व समस्या याबाबतच्या चर्चेतही अटळपणे येतो.

नेहरूंच्या आर्थिक विचारधारेचा कालौघात कसा विकास झाला याचा काहीसा विस्तृत आढावा प्रस्तुत लेखकाने इतरत्र घेतला आहे (दातार, १९९२). इथे नेहरूंच्या वारश्याच्या आर्थिक परिमाणाचा अधिक नेमका विचार योजला आहे. आर्थिक विकासाचे साधन या स्वरूपात भारताने नियोजनाचा स्वीकार केला ही घटना लक्षणीय आहे. आर्थिक नियोजन ही कल्पना केंद्रस्थानी ठेवून तिचा स्वीकार व भारतातील विवक्षित आविष्कार यात नेहरूंचे योगदान काय होते? या नियोजन पद्धतीत कालानुरूप बदल झाले नसतील तर तसे न होण्याचा दोषारोप विशिष्ट परिस्थितीत घेतलेल्या भूतकालीन निर्णयावर करणे योग्य ठरते का? नेहरूंच्या विशिष्ट धोरणनितीचे कोणते दीर्घकालीन परिणाम आजही जाणवतात? अशा काही प्रश्नांचा विचार केला आहे. स्वातंत्र्यपूर्व काळ, त्यानंतर १९६४ पर्यंतची नेहरू कारकीर्द व शेवटी त्यानंतरचा काळ या क्रमाने हे विवेचन केले आहे. यापैकी तिसऱ्या कालखंडाचा विचार मुख्यत: १९९१-९२ नंतरच्या आर्थिक सुधारणा व त्यांचे परिणाम या संदर्भात केला आहे.

**नेहरूंचा वारसा**

लोकशाही, धर्मनिरपेक्षता, आंतरराष्ट्रीय दृष्टिकोन, समाजवाद आणि आर्थिक नियोजन ही नेहरूप्रणीत








विचारांची प्रमुख परिमाणे मानली तर शेवटच्या दोहोंचा (किंवा तिघांचा) विचार आर्थिक संदर्भात होणे स्वाभाविक मानता येते. मात्र असे असले तरी या भिन्न परिमाणातील आंतरसंबंध दुर्लक्षित करता येत नाहीत. उदा., धर्मनिरपेक्षते अभावी लोकशाहीचे कार्य सदोष राहू शकते तर समाजवाद आणि आर्थिक नियोजन यांचा अनुक्रमे उद्दिष्ट व साधन असा स्वीकार यांचे समर्थन लोकशाही व्यवस्थेत मिळणाऱ्या जनादेशातून होऊ शकते. नेहरूंचा आर्थिक वारसा औद्योगीकरण किंवा केंद्रीय नियोजन यांचा त्यांनी केलेला पुरस्कार यामुळे अधोरेखित झाला तरी तो लोकशाही व सामान्य लोकांच्या समस्या यापासून कधीच भिन्न नव्हता. भारताचा शोध घेतानाही स्वराज्य म्हणजे फक्त गोरे राज्यकर्ते जाऊन त्याजागी स्वकीय (सावळे) राज्यकर्ते येणे नव्हे तर लोकांचे, लोकांसाठी व लोकांनी चालवलेले राज्य आणि आपल्या दारिद्र्य व दुःखाचा शेवट या दोहोंचा त्यात समावेश असला पाहिजे याबद्दल नेहरू ठाम होते. स्वातंत्र्याची चळवळ चालू असताना समाजातील सर्व घटकांना इतर आर्थिक, सामाजिक व धर्मभेद विसरून एकत्र आणण्याचा गांधीजींचा प्रयत्न होता. नेहरूंनी गांधींचे नेतृत्व मान्य केले असले तरी समाजाच्या विविध वर्गांचे हितसंबंध परस्परविरोधी असल्याने, स्वातंत्र्यमिळे पर्यंत वर्गसंघर्ष टाळण्याचा काँग्रेसचा प्रयत्न असला तरी भविष्यात असा संघर्ष अटळ आहे असे नेहरूंना एकेकाळी वाटे. या संघर्षात काँग्रेसने कामगार व शेतक-घेतली पाहिजे अशी त्यांची ठाम भूमिका होती. समाजवादाचा राष्ट्रीय उद्दिष्ट असा स्वीकार करण्यात १९२७ साली सोव्हिएत युनियनला त्यांनी दिलेल्या भेटीचा प्रभाव किती होता हे ठरविणे कठीण असले तरी धीम्या मार्गाने समाजवादाकडे जाण्यासाठी केंद्रीय नियोजनाचा साधन असा स्वीकार करण्यात सोविएत यशस्वी अनुभवाचा प्रभाव पडला हे नक्की. १९३३-३६ च्या सुमारास नेहरूंनी समाजवादाचा स्पष्ट व कडवा पुरस्कार केलेला आढळतो. Whither India या लेखमालेत "सामाजिक व आर्थिक समानतेचे महान मानवी उद्दिष्ट किंवा एका राष्ट्राने दुसऱ्या राष्ट्राची किंवा एका वर्गाने दुसऱ्या वर्गाची पिळवणूक थांबवणे आणि राष्ट्रीय स्वातंत्र्य ही उद्दिष्टे आंतरराष्ट्रीय सहकारी समाजवादी जागतिक संघातच पूर्ण होतील" असा विश्वास व्यक्त केला. १९३६ साली लखनऊ काँग्रेसच्या अध्यक्षीय भाषणात समाजवादाचा उघड पुरस्कार "जगाच्या सर्व समस्यांच्या व भारताच्या सर्व समस्यांच्या सोडवणुकीचा एकमेव मार्ग समाजवाद आहे अशी माझी खात्री पटली आहे. मी जेव्हा समाजवाद म्हणतो ते काहीसे अस्पष्ट व मानवतावादी नसते तर ती आर्थिक वैज्ञानिक पद्धतीने वापरलेली संज्ञा असते – भारतासमोरील गरिबी, प्रचंड बेकारी व लोकांचे दैन्य व गुलामी संपविण्याचा समाजवादा शिवाय दुसरा मार्ग नाही. – त्यासाठी मर्यादित अपवाद वगळता खाजगी मालमत्ता समाप्त करावी लागेल व सध्याच्या नफाधारित पद्धती ऐवजी सहकारी सेवेचे उच्च उद्दिष्ट स्वीकारावे लागेल" असे सांगून वर्तमान परिस्थितीचे स्पष्टीकरण समाजवाद व मार्क्सवाद याव्यतिरिक्त कोणत्याच मार्गाने होणार नाही अशी ग्वाही त्यांनी दिली. समाजवादाचा हा कडवा पुरस्कार सिद्धांततः बरोबर असला तरी भारतीय परिस्थितीत समाजवाद कसा प्रस्थापित करायचा हा गहन प्रश्न होता. गांधीजींचे नेतृत्व झुगारून काहीही करणे नेहरूंना रुचणारे/पटणारे नसल्याने समाजवादाची वाटचाल स्वातंत्र्यप्राप्तीनंतरच व तीही धीम्या गतीने होईल अशी त्यांची धारणा बनली. केवळ समाजवादी व्यवस्थेत नियोजन शक्य आहे असे न समजता, फक्त नियोजनाचा स्वीकार करून समाजवादा पर्यंत पोचता येईल असे ते मानू लागलेले आढळतात. स्वातंत्र्य मिळाल्यानंतर भारताची आर्थिक वाटचाल कशी व्हावी याचा विचार करण्यासाठी काँग्रेसने नेमलेल्या राष्ट्रीय नियोजन समितीचे ते अध्यक्ष होते.

भारत स्वतंत्र झाल्यावर जलद आर्थिक विकासासाठी औद्योगीकरण आवश्यक ठरेल व ते काम नफ्यावर आधारलेली बाजारपेठानुसार चालणारी भांडवली व्यवस्थेद्वारे होऊ शकणार नसल्याने राष्ट्रीय नियोजन आवश्यक ठरेल अशी नेहरूंची धारणा बनत गेली. गांधीप्रणीत स्वयंपूर्ण खेडी व ग्रामोद्योगांचा विकास या कल्पनांशी ते जुळणारे नव्हते. अवजड भांडवली उदयोगाना प्राधान्य व सरकारी मालकीच्या सार्वजनिक क्षेत्रांत अशा उद्योगांची उभारणी ही नेहरूप्रणीत विकासनीतीची खास वैशिष्ट्ये (जी दुसऱ्या पंचवार्षिक योजनेत प्रतिबिम्बित

झाली) सोव्हिएत युनियनने यशस्वीरित्या अनुसरली होती.

**स्वातंत्र्यपूर्व काळ आणि नियोजन**

सुभाषचंद्र बोस काँग्रेस अध्यक्ष असताना राष्ट्रीय नियोजन समितीची स्थापना झाली. त्यात पुरुषोत्तम ठाकूरदास, ए. डी. श्रॉफ व वालचंद हिराचंद या उद्योगपतींचा समावेश होता.[१] भारताला औद्योगिकक्रांतीची गरज आहे; प्रश्न फक्त ही क्रांती ब्रिटनप्रमाणे धीम्या गतीने का सोव्हिएत युनियनप्रमाणे जलद गतीने होईल असा प्रश्न आहे व या देशात हे जलद गतीने करावे लागेल अशी मला भीती वाटते असे नमूद करत सुभाषचंद्र बोस यांनी पुढील दिशा-दर्शवली. या समितीचे काम अपूर्ण राहिले असले तरी या निमित्ताने नियोजनाची आवश्यकता व स्थान यावर सविस्तर विचार झालेला दिसेल. युद्धकाळात आपद्धर्म म्हणून सुरू झालेले नियोजन व नियंत्रण युद्ध संपल्यावर संपुष्टात न आणता समाजवादी नियोजन तंत्र निर्माण झाले पाहिजे असे जवाहरलाल नेहरूंचे मत होते. खाजगी मालकी कायम राहिली तरी ती नियंत्रित असावी व योजनेच्या उद्दिष्टांशी व्यवस्थित सांधली जावी असा त्यांचा मानस होता. मूलभूत उद्योग सरकारी मालकीचे असावेत असे बहुसंख्य सभासदांचे मत होते तर काही सदस्यांच्या मते फक्त सरकारी नियंत्रणे पुरेशी ठरतील. इंजिनियरिंग उद्योगाबाबत विचार करणाऱ्या उपसमितीला विकास व संरक्षणाशी संबंधित उद्योग सरकारी मालकीचे असायला हवे होते तर निर्माणी उद्योगाचा विचार करणाऱ्या दुसऱ्या समितीला असे वाटले की सार्वजनिक हिताला बाधा आणणाऱ्या मक्तेदारी उद्योगांवर सरकारची मालकी असली पाहिजे. युद्ध सुरू झाल्यावर १९४० साली नेहरूंची रवानगी तुरुंगात झाल्यावर समितीचे काम तुरुंगातून चालविण्याची नेहरूंची तयारी सरकारला मान्य नसल्याने या समितीचे काम संपले. मात्र नियोजनाचे महत्व फक्त काँग्रेस पक्षापुरते मर्यादित नव्हते. १९४३ साली मुस्लिम लीगच्या कराची अधिवेशनात पाकिस्तानात समाविष्ट होणे अपेक्षित असलेल्या प्रांतात विकास व औद्योगिकरण करण्यासाठी एक समिती नेमली होती. या समितीने सुचविलेल्या उपायात गरिबी निर्मूलन, जमीन सुधारणा याबरोबरच काही उद्योगांचे राष्ट्रीयीकरण करायची शिफारसही समाविष्ट होती.

नेहरूंच्या राष्ट्रीय नियोजन समितीचे कामकाज स्थगित झाल्यावर नियोजित अर्थव्यवस्था प्रत्यक्षात आणण्याचा मुद्दा बड्या उद्योगपतींनी पुढे रेटला. यासंदर्भात विचार करण्यासाठी जे आर. डी. टाटा यांनी उद्योगपतींची सभा भरवून युद्धोत्तर आर्थिक विकासाचा विचार करण्यासाठी पुरुषोत्तमदास ठाकूरदास यांचे अध्यक्षतेखाली एक समिती नेमली. या समितीने जानेवारी १९४४ मध्ये भारताच्या आर्थिक प्रगतीची एक योजना बनवली जी Bombay Plan या नावाने प्रसिद्ध पावली. या योजनेत सरकारने उद्योगांवर नियंत्रण ठेवण्यास पाठिंबा दिला होता. खाजगी मालकीद्वारे राष्ट्रीय उत्पन्नाचे रास्त वाटप होण्यात अपयश आले आहे याची कबुली देत उत्पन्न आणि संपत्तीच्या वाटपातील असमानता कमी करत पुढील पंधरा वर्षांत दरडोई उत्पन्न दुप्पट करण्याचे उद्दिष्ट ठेवले होते. उद्योग क्षेत्रात अवजड उद्योगांना प्राधान्य देण्यास मान्यता दिली होती. ऊर्जा व भांडवली वस्तू यांचे उत्पादन वाढवण्याची गरज मान्य होती. इतर उद्योगांच्या तुलनेत मूलभूत उद्योगांना प्राधान्य दिले नाही तर आपण परकीयांच्या कृपेवर अवलंबून राहू असेही त्यात नमूद केले होते. युद्धकाळात नियंत्रणाची देशाला संवय झालीच आहे फक्त त्यात अधिक सुसूत्रता व प्रशासकीय सुधारांची गरज प्रतिपादन केली होती. संरक्षण व इतर सार्वजनिक हिताचे महत्त्वाचे उद्योग सरकारच्या मालकीचे असावेत याचा पुरस्कारही केला होता.

बड्या उद्योगपतींच्या या योजनेला पर्यायी योजना मांडण्यात आल्या त्यात मानवेंद्रनाथ रॉय यांच्या पुढाकाराने बनलेला Peoples Plan तसेच गांधीवादी प्रतिमानाचा पुरस्कार करणारी पर्यायी योजना पुढे आली. यावरून नियोजनाच्या कल्पनेला व्यापक पाठिंबा होता असे दिसते. Bombay Plan व राष्ट्रीय नियोजन समितीचे विचार यांतील साम्य लक्षणीय आहे. औद्योगिकरणाचे महत्व, सार्वजनिक क्षेत्रात मूलभूत अवजड उद्योगांचा विकास, उद्योगांवर सरकारी नियंत्रणे व विषमता कमी करणे या नियोजनाच्या संदर्भातील सर्व महत्वाच्या मुद्दयांना बड्या उद्योगपतींचा स्पष्ट पाठिंबा होता. Peoples Plan










मध्ये कामगार हिताला प्राधान्य दिले होते. गांधीवादी विचारसरणीचा अपवाद वगळता औद्योगिकरणातून जलद विकास, मूलभूत उद्योग उभारण्यात सार्वजनिक क्षेत्राची खास भूमिका याबाबत व्यापक मतैक्य असल्याचे दिसते.

**मिश्र अर्थव्यवस्था आणि नियोजन**

लोकशाही मूल्ये व सोव्हिएत नियोजन पद्धती यांचा मिलाफ घडवण्याच्या प्रयत्नांतून "मिश्र अर्थ व्यवस्था" ही कल्पना पुढे आली. यात सरकारी मालकीच्या सार्वजनिक क्षेत्राचा मोठा वाटा असणार होता. केंद्रीय स्तरावर नियोजन मंडळाची स्थापना, त्याचे वाढते महत्त्व यातून सोव्हिएत नियोजन पद्धतीचा प्रभाव जाणवला तरी पंचायत राज कार्यक्रमाद्वारे लोकशाहीत अभिप्रेत असलेले विकेन्द्रीकरण स्थानिक प्रशासनाचे महत्त्व वाढविण्यातून अधोरेखित होते.

पंतप्रधान होण्यापूर्वी अनेकवेळा सोविएत अनुभव भारतासाठी आदर्श ठरेल असे मत नेहरूंनी अनेकदा व्यक्त केलेले आढळेल. भारतीय नियोजन पद्धतीवर सोव्हिएत युनियनचा प्रभाव वैचारिक पातळीवर होता तसाच व्यावहारिक पातळीवरही तो प्रभावी ठरला. दुसरी पंचवार्षिक योजना महालोनोबिस यांच्या ज्या प्रतिमानावर आधारित होती ते १९२० च्या सुमारास फेल्डमन यांनी प्रथम विकसित केले होते. दुसरी योजना चर्चिली जात असताना इतर देशातील अर्थतज्ज्ञांबरोबर ज्या सल्लामसलती झाल्या त्यात टिंगबरजन, बेथलहम, फ्रिश्च व जोन रॉबिन्सन यांबरोबरच पोलिशतज्ञ ऑस्कर लांग व सोविएततज्ञ रुबिंस्टीन यांचाही समावेश होता. दुसऱ्या महायुद्धानंतर अनेक देशांत देशी उद्योगाना संरक्षण देत देशी उद्योग सुरू करण्याचे प्रयत्न करण्यात आले. अशा संरक्षित वातावरणात एकतर ग्राहकोपयोगी उपभोग्य वस्तु निर्माण करणे शक्य होते. दुसरा पर्याय ग्राहकोपयोगी उपभोग्य निर्माण करण्यासाठी जी यंत्रसामग्री लागते ती निर्माण करणे हा होता. या पर्यायाचा स्वीकार केला तर ग्राहकोपयोगी उपभोग्य वस्तुंची उपलब्धता लगेच वाढणार नाही पण कालांतराने आवश्यक यंत्रसामग्रीचा देशी पुरवठा वाढला की या वस्तुंचे उत्पादन जास्त वेगाने वाढेल. ग्राहकोपयोगी उपभोग्य वस्तु निर्माण करण्यासाठी जी यंत्रसामग्री लागते तिच्या निर्मितीला आवश्यक यंत्रसामुग्री बनवणे हा तिसरा पर्याय ही उपलब्ध होता. यापद्धतीत ग्राहकोपयोगी उपभोग्य वस्तु आणखी उशीरा पण अधिक वेगाने प्राप्त होणे अपेक्षित होते. सोविएत युनियनने हा तिसरा पर्याय निवडला व भारताच्या दुसऱ्या पंचवार्षिक योजनेत असाच पर्याय निवडला त्यात सोविएत वैचारिक प्रभाव होताच. शिवाय या मूलभूत, अवजड उद्योगांच्या उभारणीस रशिया व इतर साम्यवादी देशांकडून तांत्रिक सहकार्य व मदत मिळाली. स्वयंपूर्णतेच्या मार्गाने जाण्यास आवश्यक ते तंत्रज्ञान देण्यास पाश्चात्त्य देश सहजी तयार नव्हते. या स्थितीत सोविएत मदत योजनेच्या अंमलबजावणीत उपयुक्त ठरली. त्याशिवाय सोविएत मदतीच्या शक्यतेमुळे पाश्चात्त्य देशांबरोबर वाटाघाटी करण्याची भारताची ताकद वाढली.[२]

दुसऱ्या पंचवार्षिक योजनेची अंमलबजावणी करण्यापूर्वी व त्यानंतरच्या काळात या योजनेबाबत देशात व्यापक चर्चा झाली. अवजड उद्योगाला प्राधान्य न देता शेती व इतर ग्राहकोपयोगी वस्तुंच्या निर्मितीला प्राधान्य दिले तर भांडवलाची उत्पादकता वाढेल, रोजगार निर्मिती होईल. वस्तुंचा पुरवठा अल्पावधीतच वाढल्याने भाववाढ कमी प्रमाणात होईल हा विचार वकील आणि ब्रह्मानंद यानी मांडला. तसेच बी. आर. शेणोय यानीही अर्थतज्ज्ञांच्या गटात महालोनोबिस यांच्या प्रतिमानाला विरोध नोंदवला होता. दुसऱ्या पंचवार्षिक योजनेतील प्राधान्यक्रमाचे काही परिणाम अटळ होते. मूलभूत, भांडवली उद्योगांचा विकास करण्यास परदेशी तंत्रज्ञान, यंत्रे व अवजारे यांची आयात करण्यासाठी परदेशी चलनाची गरज लागणार होती व स्वयंपूर्णता हे मुख्य उद्दिष्ट असल्याने परदेशी भांडवलास उत्तेजन मिळण्याचा संभव नव्हता. या स्थितीत उपलब्ध परदेशी चलनाचा काटेकोर पद्धतीने नियंत्रित उपयोग झाला नाही तर योजनेची अंमलबजावणी धोक्यात येणार होती. भाववाढ होण्याची शक्यता तर वर्तवली होतीच. व प्रत्यक्षात तसे झालेही. परकीय चलनाची टंचाई निर्माण झाल्याने योजनेला कात्री लावावी लागली. दुसऱ्या योजनेत उद्योग व वाहतूक या क्षेत्रातील गुंतवणूक वाढल्याने शेती व सिंचन या क्षेत्रातील नियोजित गुंतवणुकीचे प्रमाण पहिल्या योजनेच्या तुलनेत कमी असणे अटळ होते.

भारताने स्वयंपूर्ण विकासाच्या मार्गावर जलद गतीने








वाटचाल करायला हवी; त्यासाठी वर्तमानात त्याग करायला तयारी असली पाहिजे. पण विचारवंतांचा वर उल्लेखिलेला समकालीन विरोध वगळता नेहरू-धोरणांच्या ढोबळ दिशेबाबत सामान्य सहमती होती असे म्हणता येते. उद्योगाधारित जलद विकास, सार्वजनिक क्षेत्राला मूलभूत उद्योगांच्या विकासात महत्त्वाचे स्थान, खाजगी उद्योगावर नियंत्रणांची आवश्यकता या गोष्टी भांडवलदारांनाही मान्य होत्या.[३]

या काळात अर्थव्यवस्था रुळावर आली याबाबतही फारसा वाद नव्हता. नियोजनाची खरी सुरुवात दुसऱ्या योजनेपासून झाली, त्याचा परिणाम औद्योगिक विकासाच्या वाढीव गतीत प्रतिबिंबित झाला. विकासाचा दर लक्ष्यापेक्षा कमी असला तरी विकासाची पायाभरणी होत आहे याची दृष्य चिन्हे आश्वासक वाटली असावी. नेहरू कालखंडातील आर्थिक प्रगतीचे समकालीन मूल्यमापन सामान्यपणे अनुकूल असे. नेहरूंचे योगदान तपासताना राजकीय, परराष्ट्रधोरण, तटस्थतेचे धोरण या घटकांना प्राधान्य मिळत असे. आर्थिक आघाडीवरील कामगिरीबद्दल असमाधान ही बाब मुख्यतः अर्थतज्ज्ञांनी नोंदवली आहे व ती नंतरच्या काळातील घटना आहे. शेतीचा विकास असमाधानकारक असणे, आर्थिक विषमता वाढणे याबाबींची नोंद उत्तरकालीन घटना आहे.[४]

स्वातंत्र्य मिळतानाच देशाची सुरक्षा व एकात्मता यांना राजकीय नेतृत्वाने प्राधान्य दिले होते. तसेच आंतर राष्ट्रीय व्यापार व गुंतवणूक याद्वारे देशाची प्रगती होण्यास फारशी मदत होईल याबाबत विश्वास वाटत नव्हता व ही साशंकता केवळ भारतापुरती मर्यादित नव्हती. १९३० च्या दशकातील मंदीचा अनुभव ताजा असल्याने आंतरराष्ट्रीय व्यापारातील वाढ मर्यादित राहील अशी सार्वत्रिक भावना असताना भारताने स्वयंपूर्ण होण्यास पर्याय नाही व त्यासाठी वर्तमान उत्पादनवाढ पुढे ढकलली जाण्याची किंमत देणे स्पष्ट व बहुतेकांना मान्य होते. १९५१-६५ या काळात राष्ट्रीय उत्पन्नात दरसाल ४.१% या गतीने झालेली वाढ ब्रिटिश राजवटीतील वाढीच्या तुलनेत (०.५%) समाधानकारक होती. याच काळात उद्योग क्षेत्रात ५% वाढ झाली तर शेती क्षेत्रातील उत्पन्न २% वेगाने वाढले. नेहरूंच्या धोरणांवर टीका होण्यास प्रारंभ झाल्यावरही असमाधानाचे मुद्दे सामान्यतः राजकीय, संरक्षण, परराष्ट्र धोरण याबाबत असत. शेती क्षेत्राकडे दुर्लक्ष झाले हा मुद्दा मांडला जात होताच व पुढील काळात अन्न धान्याची टंचाई निर्माण झाल्यावर हा मुद्दा अधिक ठळक बनला. मात्र शेतीकडे दुर्लक्ष हा मुद्दा फक्त दुसऱ्या व तिसऱ्या योजनेतील गुंतवणुकीचे प्रमाण यावर आधारणे बरोबर नाही. शेतीतील अपयशाचा मुद्दा शेती उत्पादकतेकडे पुरेसे लक्ष न जाणे व जमीन सुधार कायद्यांची सदोष अंमलबजावणी या घटकांचाही विचार करणे आवश्यक ठरते. शेती उत्पादकता वाढवण्याचा मुद्दा 'हरितक्रांती'च्या धोरणात अधोरेखित झाला व त्याचे परिणाम उत्तरेतील राज्यात व गहू आणि तांदूळ पिकांबाबत अनुभवास आला पण त्यामुळे धान्योत्पादनात वाढ झाली तरी ग्रामीण भागातील विषमता वाढीस लागली. जमीन सुधारणा करण्याचे प्रयत्न अपयशी ठरले. हे जसे नेहरू-कारकीर्दीबद्दल खरे आहे तसेच नंतरच्या काळाबाबतही. शेती हा राज्य सरकारच्या अखत्यारीतला विषय असल्याने जमीन सुधारांचे यशापयश राज्यानुसार निराळे असले तरी जमीन मालकांचा शासनयंत्रणेवरील प्रभाव हा समान घटक होताच.

नेहरू कालखंड संपल्यानंतरच्या काळात (१९६५-८१) राष्ट्रीय उत्पन्नाचा दर ३.२% असा घसरला व लोकसंख्येतील वाढ लक्षात घेता दर डोई उत्पन्न वाढीतली घसरण अधिक बोचक ठरली. याच काळात द. कोरिया, जपान या राष्ट्रांनी लक्षणीय प्रगती साध्य केल्याने भूतकालीन धोरणाची टीका अधिक प्रच्छन्न बनत गेली.

**नेहरूंनंतर**

आर्थिक समस्या आणि धोरणे यांचा विचार करताना कोणाही एका व्यक्तीचे महत्त्व मर्यादित असते. पण गेल्या पन्नास वर्षांत आर्थिक धोरणांचा फेर विचार करण्याचे प्रसंग निर्माण झाले तेव्हा विकासाचे नेहरू-प्रतिमान व धोरणे यांचे मूल्यमापन होणे अपरिहार्य ठरत असे. कधी ग्रामीण भाग व शेतीक्षेत्राकडे दुर्लक्ष हा मुद्दा असे तर कधी स्वयंपूर्णत्वास अवाजवी महत्त्व देत देशी उद्योगांना संरक्षण दिल्यामुळे आंतर- राष्ट्रीय व्यापाराकडे दुर्लक्ष होऊन भारतीय उद्योग स्पर्धाक्षम बनू शकले नाहीत हा टीकेचा मुद्दा असे. अवजड उद्योगांना प्राधान्य देण्यामुळे








रोजगार निर्मिती होऊ शकली नाही याबद्दल नेहरू प्रतिमानाला जबाबदार ठरवले जाते.

नेहरू ज्या कालखंडात वावरले त्या काळातील घटनांचा परिणाम त्यांच्या विचारांवर (उदा., समाजवाद किंवा रशियन नियोजन) झाला होता. नंतरच्या काळात ज्या घटना घडल्या त्यानुसार आपल्या धोरणात नेहरूंनी बदल केले असते का नाही? समाजवाद वा नियोजन याबाबत त्यांच्या विचारात लक्षणीय बदल झाले. आपल्या समोरील समाजवादाची कल्पना वैज्ञानिक असल्याचा दावा करणारे जवाहरलाल पुढील काळात नियोजनातून समाजवादाकडे जाता येईल असे प्रतिपादन करू लागले. वर्गविरहित समाजव्यवस्थेचे त्यांना आकर्षण वाटले तरी अशी व्यवस्था निर्माण करताना होणारी (कामगारांची) हुकुमशाही व वैयक्तिक स्वातंत्र्यावर येणारी बंधने त्यांना मान्य नव्हती. १९५८ मध्ये तर "देशातील प्रत्येक व्यक्तीला विकासाची समान संधी मिळणे याला आपण समाजवाद मानतो" अशी त्यांची भूमिका होती.[१] समाजवादाची ही 'सुधारित' कल्पना योग्य आहे का याबाबत मतभेद असणे शक्य आहे व या वैचारिक बदलांबाबत त्यांच्यावर टीकाही संभवते; पण नेहरू बदलत्या परिस्थितीनुसार आपल्या मतांत बदल करत होते हे नाकारता येत नाही. त्यामुळे स्वातंत्र्य मिळाल्यानंतर ज्या धोरणनीतीचा त्यांनी पुरस्कार केला तो स्थल काल निरपेक्ष होता हे स्वत: नेहरू देखील मानत होते असे समजण्यास काही आधार नाही. नेहरू नेहमीच भारताचा जागतिक संदर्भात विचार करत व भारताने जगापासून तोडून घ्यावे असेही ते मानत नव्हते. भारताच्या विकासाला पाश्चिमात्य देश मदत करणार नाहीत या धोक्यातून स्वयंपूर्णतेची गरज निर्माण झाली. या मार्गावर सोविएत रशियाची मदत मिळाल्याने इतर देशांशी व्यवहार करणे सुलभ झाले याचा उल्लेख झालाच आहे. १९७० च्या दशकात जागतिक व्यापार वेगाने वाढत असताना निर्यात व्यापाराला प्रोत्साहन देत स्पर्धात्मक उद्योगांचा विकास शक्य आहे हे स्पष्ट झाल्यावर अग्रक्रम बदलणे हे नियोजन वा समाजवादाशी विसंगत असते असे मानण्याचे कारण नाही.

पूर्व आशियातील देश खुल्या आर्थिक वातावरणात आवश्यक ते बदल करत असताना, इंदिरा गांधी यांच्या 'गरिबी हटाओ' या कार्यक्रमात आर्थिक वाढ का समानता असा विरोध महत्त्वाचा मानला गेला. सरकारच्या प्रत्यक्ष हस्तक्षेपात लक्षणीय वाढ झाली ज्यामुळे अर्थव्यवहारातील अंतर्गत व बाह्य स्पर्धा मर्यादित झाली. सरकारच्या अतिरिक्त, अवाजवी हस्तक्षेपाचा मुद्दा खरे तर, इंदिरा गांधी यांच्या कारकीर्दीला अधिक लागू पडतो. पुढे जनता पक्षाचे सरकार सत्तेवर आल्यानंतर नेहरूवादी धोरणे टीकेचे लक्ष ठरलेली आढळतात. शेती क्षेत्राकडे दुर्लक्ष, उद्योग/नागरी क्षेत्र यांना झुकते माप मिळाले असा आक्षेप घेतला गेला.

अलिकडच्या काळात संगणक व संदेशवहन क्षेत्रातील तंत्रशास्त्रीय बदलांमुळे जग जवळ येत असून अंतर्गत बाबतीत जागतिक घडामोडींचा प्रभाव टाळणे कठीण बनले आहे. शिवाय १९९१ नंतर झालेल्या आर्थिक धोरणातील बदलांमुळे आंतरराष्ट्रीय व्यापार व गुंतवणूक तसेच स्पर्धात्मक बाजार यांचे महत्त्व वाढले आहे. धोरणात्मक बदलांस २३ वर्षे उलटून गेली असताना या बदलांचे नेहरूंच्या आर्थिक दृष्टिकोनाशी काय नाते आहे याचा विचार करणे उपयुक्त ठरेल. ही नवी धोरणे नेहरूंच्या विकासनीतीचा पुढील भाग मानता येतील का, ती त्यापासून फारकत घेतात असे समजायचे?

हा प्रश्न महत्त्वाचा आहे कारण भांडवली व्यवस्थेच्या अपयश/पेचप्रसंग या पार्श्वभूमीवर आर्थिक नियोजन व स्वयंपूर्ण विकास याबाबतचा सोविएत रशियाचा अनुभव नेहरूंना व इतर अनेकांना महत्त्वाचा वाटला. १९५० नंतर आंतरराष्ट्रीय व्यापार व गुंतवणूक यातील लक्षणीय वाढ होत असताना काही देशांनी विकासाचा निराळा मार्ग अनुसरला. जपान, द. कोरिया, तैवान यांसारख्या देशांनी निर्यात व्यापारातील यश हा निकष वापरून कोणते उद्योग उभारायचे ते ठरवले. या देशांतील अनुभव भिन्न प्रकारच्या नियोजनाचे यश दर्शवितो. भारतात या बदलत्या आर्थिक घटकांची दखल उशीरा घेतली गेली. प्रथम ही सर्व उदाहरणे लहान देशांची असल्याने ती भारतीय संदर्भात गैरलागू आहेत असे मानले गेले. पण अनेक वैशिष्ट्ये भारतासमान असलेल्या 'समाजवादी' चीनने १९७८ पासून आर्थिक धोरणे बदलण्यास प्रारंभ केल्यानंतर भारतातील धोरण वातावरण बदलण्यास प्रारंभ

झाला. भारतातील धोरण बदल होण्यास विलंब का झाला याचा विचार येथे करता येणार नाही पण त्याचा संबंध केवळ नेहरू कालखंडात स्वीकारलेल्या विवक्षित धोरण समुहाशी जोडता येत नाही. १९९० नंतर जगात जे बदल झाले त्यातून खुला व्यापार व गुंतवणूक यांचे महत्त्व वाढले पण आंतरराष्ट्रीय बाजार महत्त्वाचे असले तरी ते आदर्श नाहीत हा मुद्दा २००७-०८ च्या वित्तीय पेचप्रसंगाने परत एकदा अधोरेखित झाला. सामान्य स्वरूपात जागतिक संदर्भात भारताचा विचार, लोकशाही पद्धतीने योग्य अग्रक्रमाची निवड आणि त्यानुसार उपलब्ध साधनांचा योजनाबद्ध वापर ही नेहरू विचारांची आर्थिक परिमाणे मानली तर त्याच्याशी स्पर्धात्मक बाजार, खुला व्यापार यांचा पुरस्कार करणाऱ्या आर्थिक सुधारणा विसंगत मानता येत नाहीत. आर्थिक सुधारणा करताना नियोजनाचे स्वरूप बदलते/बदलले पाहिजे पण त्यामुळे नियोजनाचा अंत होत नाही. चीनची प्रगती ही स्पर्धात्मक बाजार व खुला व्यापार यांची अटळ देणगी समजता येत नाही तर त्यामागे गतिमान चिनी योजकता व नियोजन आहे. भारतीय नियोजन भारतातील भिन्न घटकांच्या संदर्भात निराळे, बदलते असेल. या बदलत्या संदर्भात अग्रक्रम जसे बदलतील त्याचप्रमाणे गुंतवणुकीचे क्षेत्रीय स्वरूप बदलेल पण त्यामुळे नेहरूंच्या धोरणसमुहाचे सातत्य संपले असे मानण्याचे कारण नाही.

तुमच्यासमोरील सर्वात मोठे आव्हान कोणते? या आन्द्रे मोर्ले यांच्या प्रश्नाला न्याय्य मार्गाने न्याय्य शासनाची स्थापना असे नेहरूंचे उत्तर होते. शांततापूर्णमार्गाने नियोजनाद्वारे समाजवाद येईल हा नेहरूंचा आशावाद शासनसंस्था सदैव सामुहिक हितासाठी हस्तक्षेप करेल या गृहितावर आधारला होता. शासनसंस्थेवर वर्गहितसंबंधांचा काहीच परिणाम होणार नाही असे मानणे अनेक विश्लेषकांना मान्य नव्हते. सार्वजनिक क्षेत्राला अपेक्षित भूमिका पार पाडता आली नाही हे भारतीय नियोजनाच्या अपयशाचे एक कारण मानले जाते.

नेहरूंची सैद्धांतिक भूमिका व प्रत्यक्ष कृती यातील विरोधाभास भारतीय परिस्थितीचा विचार करता मार्क्स यांच्या सिद्धांतनात बदल करण्यातून दूर होऊ शकत होता. ग्रामसी यांनी इटलीच्या संदर्भात जे वैचारिक कार्य केले ते नेहरू भारताच्या संदर्भात करू शकले नाहीत अशी खंत बिपन चंद्र यांनी व्यक्त केली आहे[६]. भांडवलशाहीत होणाऱ्या बदलांच्या संदर्भात पारंपरिक मार्क्सवादी विचारधारेत बदल करण्याचे आव्हान अनेक वर्षांपासून कायम आहे व त्याला भारताचा अपवाद नाही. समाजात क्रांतिकारक बदल होणे आवश्यक आहे याची गरज नेहरूंना मान्य असली तरी हे परिवर्तन हिंसेच्या मार्गाने, बळजबरीने करण्यास त्यांची मान्यता नव्हती. स्वतंत्र भारताचे लोकनियुक्त शासन आपल्या प्रागतिक धोरणाद्वारे शांततामय पद्धतीने समाजातील सर्व व्यक्तींना विकासाची समानसंधी प्राप्त करून देऊ शकेल ही नेहरूंची अपेक्षा पूर्ण झाली नाही हे खरे पण त्याबाबत नेहरूंना जबाबदार धरणे सोपे वाटले तरी उपयोगाचे नाही. नेहरूंनी जो माध्यम मार्ग स्वीकारला तो न स्वीकारता ते त्यांच्या समाजवादी मित्रांबरोबर काँग्रेस बाहेर पडले असते तर समाजवादी क्रांती यशस्वी ठरली असती असे मानता येत नाही. याउलट सरकारने अर्थ व्यवहारात हस्तक्षेप न करता बाजारपेठेवर सर्व मदार ठेवावी असे भांडवलदारांनाही वाटत नव्हते. व तरीही नेहरूंनी हा मार्ग पत्करला असता तर यश मिळाले असते असा विश्वास असेल तरच नेहरूंना त्यांनी जे केले त्याबद्दल दोष देता येईल. पण कम्युनिस्ट राजवटींचा अंत आणि जागतिक वित्तीय पेचप्रसंग या पार्श्वभूमीवर लोकशाही पद्धतीने परिवर्तनाचे आव्हान अधिक गहिरे व गडद झाले आहे. अमेरिकेतील Occupy आंदोलन, अरब देशातील जन आन्दोलने व आपल्या देशातील भ्रष्टाचार विरोधी आन्दोलने यांतून लोकशाही परिवर्तनाचे नवे प्रयोग उलगडतात. न्याय्य मार्गाने न्याय्य शासन संस्थेची निर्मिती करण्याचे आव्हान स्वीकारण्यात नेहरू पूर्णतः यशस्वी झाले नसतील पण त्यांच्या कथित अपयशातून लोकशाही परिवर्तनाच्या नव्या शक्यतांचा शोध करताना काय बोध घेता येईल हा खरा प्रश्न आहे.

**तळटीपा :**

१. या भागातील तपशील Lockwood (२०१२) तून घेतले आहेत.








२. पहा. Mehrotra Santosh यांचा Soviet Union and Development Strategy हा Sardesai & Mohan Anand (eds) (1992) मधील लेख. पृ. १८९-९०.

३. पहा. Michael Brecher यांचा Nehru's Place in History हा Sardesai & Mohan Anand (Eds) (1992) मधील लेख पृ. ५१-७१.

४. पहा. K. S. R. Murthy यांचा Jawaharlal Nehru's Impact on India's Economic Development and Performance हा Sardesai & Mohan Anand (eds) (1992) मधील लेख पृ. १५१-८१.

५. मायकेल ब्रेचर यांच्या पुस्तकातील हे विधान रणदिवे, १९८४, पृ. १७५३ वरून उद्धृत केले आहे.

६. पहा. Bipan Chandra (1990) पृ. २२-२३.

**संदर्भ :**

Akbar M. J. (1990) **Nehru; The making of India Penguin.**

**Brown Judith (2003) Nehru; A Political Life Yale University Press, New Haven**

Chandra Bipan; Jawaharlal Nehru and the Capitalist Class, 1936 in Chandra Bipan (1979) **Nationalism and Colonialism in Modern India,** Orient Longmans, **New Delhi.**

Chandra Bipan (1990) **Jawaharlal Nehru in Historical Perspective** University of Mumbai, Mumbai.

Gopal S **Jawaharlal Nehru : A biography** (1976-84) Vol. 1-3, Oxford University Press. Lockwood David (2012) Was the Bombay Plan a Capitalist Plot? **Studies in History** 28 (1) pp. 99-116

Nehru Jawaharlal (1960) **The Discovery of India** Meridian Books Ltd. London.

Patnaik Prabhat (1998) Some Indian Debates on Planning *in* Byres T. J. (ed) **The Indian Economy; Major Debated since Independence** Oxford University Press, Delhi.

Ranadive K.R. (1984) Planning for a Just Society; Illusion and Reality **Economic and Political Weekly** XIX (40) October 6, 1984.

Sardesai & Mohan Anand (eds) (1992) The Legacy of Nehru; A Centennial assessment Promilla and Co. Publishers, New Delhi.

Tharror Shashi (2003) Nehru; The Invention of India, Penguin, New Delhi.

दातार माधव (१९९२) जवाहरलाल नेहरूंचे आर्थिक विश्व **साधना** १६,२३ व ३० मे, १९९२.

परांजपे ह. कृ. (१९८९) नेहरू आणि भारतीय नियोजन **साधना** २० मे, १९८९.

राजूरकर न. गो. व कुरुंदकर नरहर (१९७३) पं. नेहरू : एक मागोवा **साधना प्रकाशन**, पुणे.



# पं. नेहरू आणि भारतीय संघराज्याची जडणघडण

अशोक चौसाळकर

भारतीय संघराज्याच्या जडणघडणीमध्ये पं. नेहरूंनी महत्त्वाची भूमिका बजावली. भारताचे राष्ट्रीय ऐक्य आणि भारतातील विकसित होत असलेल्या प्रादेशिक अस्मिता यांच्यात मेळ बसवून त्यांनी असे संघराज्य निर्माण केले जे काळाच्या कसोटीवर योग्य प्रकारे टिकून राहिले.

भारतात संघराज्य निर्मितीचा प्रश्न हा भाषावार प्रांतरचनेशी जोडला होता. कारण भाषेच्या आधारावर प्रांतांची फेररचना करावी अशी मागणी १९४७-४८ पासून करण्यात येत होती. भारत हे संघराज्य असेल तर त्याच्या घटकराज्यांचे स्वरूप काय हा प्रश्न विचारला जात होता व भाषिक राज्ये हीच संघराज्याची घटक राज्ये असतील ही गोष्ट स्पष्ट होती.

(१)

भारतात भाषेच्या व त्यातल्या अस्मितेच्या आधारावर प्रादेशिक भाषा गट निर्माण व्हावयास इ. स. च्या बाराव्या शतकापासून सुरुवात झाली व प्रत्येक भाषेचे - आसाम, बंगाल, ओरिसा, गुजरात, पंजाब, सिंध, काश्मीर, महाराष्ट्र, कर्नाटक, आंध्र, मद्रास व केरळ हे भाषिक प्रदेश निर्माण झाले. याशिवाय संस्कृत, उर्दू व हिंदी भाषा बोलणारा एक विस्तीर्ण भूप्रदेश गंगा-यमुनेचे खोरे व मध्यप्रांत यात होता. महाराष्ट्राचा अपवाद वगळता या प्रदेशात राजकीय स्वातंत्र्य प्राप्त होऊन स्वतःचे राज्य स्थापन करण्याची संधी या प्रदेशांना मिळाली नाही तरी त्यांच्यात भाषिक व सांस्कृतिक पृथगात्मता होती व मुस्लीम राजवटींच्या काळात त्यांचा विकास होतच होता. कारण या सर्व प्रांतात भाषिक चळवळ प्रभावी होती. इंग्रजांचे राज्य स्थापन झाल्यानंतर या सर्वच प्रांतांत प्रबोधनाच्या व पुनरुज्जीवनाच्या चळवळी सुरू झाल्या. गद्य वाङमयास सुरुवात झाली व आधुनिक अर्थाने भाषिक राजकीय अस्मिता निर्माण झाल्या, त्यांचा विकास होऊ लागला.

इंग्रजांनी प्रशासकीय सोयींचा विचार करून प्रथम बंगाल, मुंबई व मद्रास हे अक्राळविक्राळ बहुभाषिक प्रांत तयार केले. नंतर त्यानी पंजाब, संयुक्त प्रांत व मध्यप्रांत आणि वऱ्हाड हे तीन नवे प्रांत आपल्या राज्यांचा विस्तार झाल्यानंतर तयार केले. संयुक्त प्रांत वगळता हे सर्व प्रांत हे बहुभाषिक प्रांत होते. बाकीचा १/३ भारत हा ५६२ संस्थानांनी व्यापलेला होता. प्रशासकीय 'सोयीच्या' दृष्टीने १९०३ साली बंगालची फाळणी भाषिक दृष्टीने न करता धार्मिक दृष्टीने केल्यामुळे इंग्रज सरकारला माघार घ्यावी लागली. १९११ साली बिहार-ओरिसा हा नवा प्रांत तयार झाला. त्यानंतर १९३६ पर्यंत सरहद्द प्रांत, सिंध, ओरिसा व आसाम ही नवी राज्ये तयार झाली व एकूण प्रांतांची संख्या ११ झाली. याचा अर्थ असा की पूर्व भारताची भाषिक आधारावर प्रांतरचना झाली, त्याचप्रमाणे उत्तर पश्चिम भारतात पण भाषेच्या आधारावर राज्ये निर्माण झाली. आता प्रश्न होता तो दक्षिण भारत व पश्चिम भारतातील राज्यांच्या फेररचनेचा.

भारतात राज्यांची भाषेच्या आधारावर फेररचना व्हावी अशी मागणी प्रथम लोकमान्य टिळक यांनी केली. काँग्रेसने नंतर त्यास पाठिंबा दिला. १९२० साली आपल्या काँग्रेस डेमॉक्रॅटिक पक्षाच्या जाहीरनाम्यात टिळकांनी पुनः भाषावार प्रांतरचनेचा पुरस्कार केला. म. गांधींचा पण त्यास पाठिंबा होता. त्यांच्या पुढाकाराने काँग्रेसपक्षाच्या प्रदेश संघटनांची रचना भाषेच्या आधारावर करण्यात आली. भारतीय भाषांचा काँग्रेस पक्षाने जास्तीत जास्त वापर करावा, असे म. गांधींचे सांगणे होते. राष्ट्रीय चळवळ जनतेपर्यंत न्यावयाची असेल तर प्रादेशिक भाषांचा वापर करा असे त्यांचे म्हणणे होते.

राष्ट्रीय चळवळीच्या अंतर्गत भाषिक विग्रहांचे राजकारण पण जन्म घेत होते. पंजाबात पंजाबी भाषा कोणत्या लिपीत लिहावयाची याबाबत संघर्ष होता. मुसलमान अरबी लिपीत शीख गुरूमुखीत तर हिंदू नागरी लिपीत ती लिहिण्याचा आग्रह धरत होते व यास धार्मिक

अनुक्रमणिका






विग्रहाचे अंग होते. उत्तर भारतात हिंदी-उर्दू हा संघर्ष होता. उर्दू भाषा अरबी लिपीत लिहिली जायची व तिच्यात अरबी व पार्शियन भाषेतील शब्द मोठ्या प्रमाणात होते. दोन्ही भाषांचा उगम एकाच ठिकाणचा. व्याकरण तेच पण धार्मिक विग्रह वाढला कारण उर्दूच्या तुलनेमध्ये हिंदी अविभाजित भाषा होती. पण हिंदीचा पुरस्कार करणाऱ्या पंडितांनी तिच्यासाठी नागरी लिपीचा स्वीकार केला व पार्शियन शब्दांच्या जागी संस्कृत शब्द वापरावयास सुरुवात केली, त्यामुळे उत्तर भारतात हिंदी-उर्दूचा वाद रंगला आणि त्यातून हिंदी भाषेच्या विकासास सुरुवात झाली.

मद्रास प्रांतात तेलगू व तमिळ भाषिकांमध्ये मोठ्या प्रमाणात वाद होता व तेलगू भाषिकांना त्यांचे राज्य हवे होते. आसामी व बंगाली भाषिकांत आसामात वाद होता कारण बंगाली भाषिक आसामी भाषेस वेगळा दर्जा देण्यास तयार नव्हते. राष्ट्रीय चळवळ सुरू असतांना हे वाद काही प्रमाणात सौम्य स्वरूपात होते कारण मुख्य उद्देश स्वातंत्र्य मिळविण्याचा होता. हे सर्व संघर्ष आणि वाद स्वातंत्र्य मिळाल्यानंतर तीव्र स्वरूपात प्रकट होणार होते.

(२)

भारतीय राज्यसंस्थेचे स्वरूप, भारताची बहुविविधता आणि विस्तार लक्षात घेता एकात्म स्वरूपाचे असणार नाही, ते संघराज्यात्मकच असेल याची भारतीय नेत्यांना जाणीव होती, लो. टिळकांनी ही गोष्ट मान्य केली. कॉंग्रेसने स्थापन केलेल्या मोतीलाल नेहरू समितीने संघराज्याची कल्पना मान्य केली होती पण भारताचा शेकडो वर्षांचा पारतंत्र्याचा इतिहास लक्षात घेता केंद्रसत्ता प्रबळ असावी आणि शेषाधिकार राज्यांकडे असावेत अशी भूमिका त्यांनी मांडली होती. पं. नेहरूंना ही भूमिका मान्य होती. मात्र मुस्लीम लीगची मागणी फेडरेशनची होती. त्यांना हवे असणारे फेडरेशन कॅबिनेट मिशनने सुचवले होते. त्यास कमजोर केंद्र, बळकट राज्य सरकारे व राज्यांचे ३ विभाग अशी रचना होती. पं. नेहरूंना ही योजना मान्य नव्हती. पण तरीही फाळणी जर टळत असेल तर राज्यांना अधिक अधिकार देणारे फेडरेशन ज्यात शेषाधिकार हे राज्यांकडे असतील, मान्य करायची त्यांनी मनाची तयारी केली होती पण लीगने स्वतंत्र राज्याची मागणी केली आणि इंग्रजांनी ती मान्य केली.

स्वतंत्र भारताच्या संविधानसभेने संघराज्याची व्यवस्था मान्य केली पण घटनाकारांना बळकट केंद्रशासन हवे होते. पं. नेहरू, पटेल, डॉ. आंबेडकर व डॉ. राजेंद्र प्रसाद हे बळकट केंद्राच्या पाठीमागे उभे होते. त्यामुळे विस्तृत चर्चेनंतर मान्य करण्यात आलेल्या राज्यघटनेत संघराज्य व एकात्म शासनव्यवस्थेचे एकीकरण करण्यात आले होते. त्यात न्यायव्यवस्था, राज्यसभा, अधिकार विभागणी आणि न्यायालयीन पुर्नविलोकन या संघराज्यांच्या वैशिष्ट्यांचा समावेश करण्यात आला होता. पण त्याचबरोबर राज्यांच्या सीमा बदलण्याचा व नवे राज्य तयार करण्याबाबतचा संसदेचा अधिकार, आणीबाणी विषयक अधिकार, विशेषतः कलम ३३४ मधील तरतूद आणि शेषाधिकार केंद्राकडे असणे या तरतुदी एकात्म राज्यव्यवस्थेस पोषक असणाऱ्या तरतुदी होत्या.

(३)

भारत स्वतंत्र झाला त्यावेळी पंजाब, आसाम, प. बंगाल, उत्तर प्रदेश, बिहार आणि ओरिसा या ६ राज्यांची रचना भाषेच्या आधारावर झाली होती. १९४९ पर्यंत ५६२ संस्थाने संघराज्यात विलीन झाली होती. त्यातील हैद्राबाद, जम्मू व काश्मीर, म्हैसूर, त्रावणकोर, भोपाळ, पेप्सु यांची स्वतंत्र राज्ये बनविण्यात आली होती. त्यातील पहिल्या चार संस्थानांचा आकार राज्याएवढा होता. राज्यांची विभागणी वेगवेगळ्या गटात करण्यात आली होती. त्यामुळे राज्यांची ही व्यवस्था तात्पुरती होती. त्यांची नव्याने फेररचना करणे गरजेचे होते.

भाषावार प्रांतरचनेचा प्रश्न दक्षिण भारतात महत्त्वाचा बनला कारण तेथे ६ समृद्ध व विकसित अशा भाषा बोलणारे समूह होते आणि त्यांना आपापल्या भाषेचा प्रभाव असणारी भाषिक राज्ये हवी होती. राजस्थान व मध्यप्रदेश या आताच्या दोन राज्यांची फेररचना करणे पण गरजेचे होते. पण द. भारतात स्वातंत्र्य मिळाल्या बरोबर भाषिक अस्मिता अधिकाधिक टोकदार व्हावयास सुरुवात झाली.

भारतीय संघराज्याची फेररचना भाषेच्या आधारावर






करावी लागेल याची काँग्रेस नेत्यांना आणि पं. नेहरूंना जाणीव होती पण ताबड-तोबीने व घाईघाईने हा प्रश्न हाताळावा असे त्यांस वाटत नव्हते. कारण देशापुढे फाळणीनंतर अनेक प्रश्न निर्माण झाले होते. दुष्काळाचा व अन्नधान्य दुर्भिक्षाचा तो काळ होता. अजून नव्या राज्याची व्यवस्थित अशी घडी बसावयाची होती. पण लोकांची मागणी वाढत होती. म्हणून या प्रश्नाचा विचार करण्यासाठी एक सदस्यीय पद आयोगाची स्थापना करण्यात आली. तिने राज्यनिर्मिती साठी मुख्यतः चार घटकांचा विचार करावा असा उल्लेख करण्यात आला होता. त्यात भाषा, भौगोलिक सलगता, सांस्कृतिक ऐक्य आणि राज्याची आर्थिक कुवत या बाबींचा समावेश करण्यात आला होता. १९४८ साली आयोग स्थापन करण्यात आला. आयोगाने यासंदर्भात लोकांच्या साक्षी घ्यावयास सुरूवात केली. त्यातून येणाऱ्या विविध मागण्यांनी नेहरू अस्वस्थ झाले व त्यांनी आयोगास साक्ष न घेण्यास सांगितले. आयोगाने आपल्या अहवालात भाषावार प्रांतरचना करण्यास विरोध दर्शवला. त्यानंतर काँग्रेस पक्षाने जवाहरलाल, वल्लभभाई व पट्टाभि सीताराम यांची जे व्ही. पी. समिती नेमली व या समितीने देखील भाषावार प्रांतरचनेच्या विरोधात आपला कौल दिला. काँग्रेसची एकूण भूमिका अशी होती की तत्वतः त्यांना भाषावार प्रांतरचना करणे मान्य आहे पण आज तो अग्रक्रमाचा प्रश्न नाही. एकदा देशाची घडी व्यवस्थित बसल्यानंतर त्याचा शांतपणे विचार करता येईल. अर्थात् भाषावार प्रांतरचनेची मागणी करणाऱ्या लोकांना हा युक्तिवाद मान्य नव्हता. त्या प्रक्रियेत २६ जानेवारी १९५० रोजी भारताची राज्यघटना लागू करण्यात आली. त्या प्रमाणे भारत हे राष्ट्र लोकसत्ताक गणराज्य म्हणून घोषित करण्यात आले. १९५२ च्या सुरुवातीस राज्यविधानसभा व लोकसभेसाठी निवडणुका घेण्यात आल्या. या निवडणुकांत काँग्रेस पक्षाचा विजय झाला पण पक्षाला मद्रास या महत्त्वाच्या प्रांतात व त्रावणकोर-कोचिन मध्ये विधानसभेत बहुमत मिळाले नाही. मद्रास प्रांतात तेलगू भाषिकांची वेगळे राज्य स्थापन करण्याची मागणी होती. त्यांना नव्या राज्यात मद्रास शहराचा समावेश व्हावा असे वाटत होते. पण त्यास मुख्यमंत्री राजगोपालाचारी आणि इतर नेत्यांचा विरोध होता. भाषेच्या प्रश्नावर महाराष्ट्र, पंजाब, आंध्र व कर्नाटक या सध्याच्या प्रांतांमध्ये वातावरण तापायला सुरुवात झाली होती.

(४)

पं. नेहरूंना भाषावार प्रांतरचनेचा प्रश्न काही काळाने सोडवावा असे वाटत होते कारण या प्रश्नातील काही गुंते त्यांना माहीत होते. हे गुंते खालील प्रमाणे होते -

१) आंध्र प्रदेशाची निर्मिती करण्याचा प्रश्न तसा सोपा होता पण एकदा आंध्रप्रदेशाची स्थापना झाली की विशाल आंध्रची मागणी जोर धरणार होती व त्यासाठी हैद्राबाद संस्थानाचे विघटन होणे अपरिहार्य होते. भारताच्या संमिश्र राष्ट्रीय संस्कृतीचा विचार करता त्या संस्थानचे विघटन करणे त्यांना मान्य नव्हते. पण हैद्राबादचे विघटन केल्याशिवाय कर्नाटक, महाराष्ट्र व आंध्र ही तीन राज्ये पूर्णत्वाने तयार होत नव्हती.

२) मराठी भाषिक लोक हे मुंबई, मध्यप्रांत व हैद्राबाद या तीन राज्यात विभागलेले आहेत. या मराठी भाषिक राज्यात मुंबई शहराचा समावेश करावयास गुजराती भाषिक तयार नव्हते. मुंबईच्या आर्थिक नाड्या त्यांच्या ताब्यात होत्या. वल्लभभाई, म. गांधी व इतर काँग्रेस नेते मुंबईचा महाराष्ट्रात समावेश करावयास तयार नव्हते. महाराष्ट्राच्या बाबतीत मुंबईचा प्रश्न महत्त्वाचा होता कारण, तेथे मराठी भाषिकांची संख्या शे. ४३ टक्क्यांच्या आसपास होती.

३) अविभाजित पंजाबात शिखांची संख्या शे. १३ टक्के होती. पंजाबचे विभाजन झाल्यानंतर त्यांची संख्या शे. ३० टक्क्यांच्या आसपास होती. स्वातंत्र्य मिळाल्यानंतर पंजाबी हिंदूंनी हिंदी ही आपली मातृभाषा आहे असे सांगितले तर शिखांनी पंजाबी आपली मातृभाषा आहे असे सांगितले. त्यानंतर अकाली दलाने पंजाबी भाषिकांसाठी पंजाबी सुभ्याची मागणी केली. प्रथम मास्टर तारासिंग व नंतर संत फत्तेहसिंग यांनी त्यास पाठिंबा दिला व त्यासाठी हिंसक चळवळ सुरू केली. येथे धर्म व भाषा यांचा मिलाफ होता व भाषावार प्रांतरचनेच्या नावाने ही चळवळ राष्ट्रहितासाठी धोकादायक बनण्याची शक्यता होती.








४) मद्रास प्रांत हा पूर्णतः तमिळ भाषिकांचा झाल्यानंतर तेथे प्रबळ असणारी द्रविड कळघम व द्रविड मुनेत्र कळघमची चळवळ जास्त विभाजनवादी होण्याची शक्यता होती कारण दरवर्षी २६ जानेवारीस ते भारतीय राज्य-घटनेची पाने जाळून निषेध करीत असत. त्यांचा हिंदी विरोध व उग्र प्रांतवाद अधिकाधिक तीव्र बनण्याची शक्यता होती.

हे प्रश्न महत्त्वाचे होते आणि त्यांची सोडवणूक शांतपणे व पूर्ण विचारांनी केली पाहिजे. आक्रमक चळवळी करून किंवा आगखाऊ भाषणे करून त्यांची सोडवणूक होणार नाही. उलट त्यामुळे प्रांता-प्रांतात वाद निर्माण होतील, एका भाषेत बोलणारे लोक दुसऱ्या भाषेस शत्रू मानू लागतील, दुसऱ्या प्रांतातील लोकांना आपल्या राज्यात ते कामधंदा करण्यासाठी येऊ देणार नाहीत. त्यामुळे या प्रश्नाबाबत सावधपणे आपण वाटचाल केली पाहिजे असे नेहरूंचे मत होते.

पं. नेहरू इतिहासाचे व संस्कृतींच्या विकासाचे खोल अभ्यासक होते. भारतीय संस्कृतीच्या विकासात भारतातील भाषांनी महत्त्वाची भूमिका बजावलेली आहे ही गोष्ट त्यांना मान्य होती. त्याचप्रमाणे या विकासात संस्कृत, उर्दू व इंग्रजी या भाषांची भूमिका पण महत्वाची होती. या भारतीय भाषा अलग अलग असल्या, त्यांची लिपी वेगवेगळी असली तरी त्यांच्यामध्ये एक मूलभूत ऐक्य आहे. एकच विचार व तत्त्वज्ञान त्यांच्यात कार्यरत आहे आणि ही सर्व भाषांची मूलभूत सांस्कृतिक एकताच भारतीय राष्ट्रीयत्वाचा आधार आहे असे त्यांचे मत होते.

(५)

पण पं. नेहरूंना या प्रकारची उसंत द्यावयास आंध्रचे लोक तयार नव्हते. तेथे ज्येष्ठ स्वातंत्र्यसैनिक व गांधीवादी नेते पी. श्रीरामुलु यांनी उपोषणाचा मार्ग स्वीकारला आणि या उपोषणामुळे त्यांचे डिसें. १९५३ मध्ये निधन झाले. त्यानंतर, आंध्र भागात लोकांचा प्रक्षोभ तीव्र झाला. लोकांनी मोठ्या प्रमाणात हिंसाचार केला. शेवटी पं. नेहरूंनी आंध्रच्या लोकांची मागणी मान्य केली व १९५३ साली मद्रास प्रांतातील १२ तेलगू भाषिक जिल्ह्यांना वेगळे करून आंध्र प्रांताची स्थापना केली पण तेलगू लोकांची मद्रास शहराची मागणी अमान्य करण्यात आली. नव्या राज्याची कर्नुल ही राजधानी झाली व आंध्र केसरी श्री. प्रकाशम् त्या राज्याचे पहिले मुख्यमंत्री झाले. शेवटी नेहरूंना लोकमताच्या दबावाखाली झुकावे लागले. पण या निर्णयामुळे सर्वच प्रांतांत मोठ्या प्रमाणात चळवळींना सुरुवात झाली.

या नव्या परिस्थितीस तोंड देण्यासाठी शेवटी केंद्रसरकारने न्या. फाझल अली यांच्या अध्यक्षतेखाली राज्यपुनर्रचना आयोगाची स्थापना केली. इतिहासकार सरदार पणिक्कर व उदारमतवादी नेते व सामाजिक कार्यकर्ते श्री. पं. हृदयनाथ कुंझरू हे त्याचे सभासद होते. समितीने भाषा, प्रशासकीय व आर्थिक कुवत, भौगोलिक सलगता आणि संस्कृती यांचा विचार करून आपल्या शिफारसी कराव्यात अशा सूचना देण्यात आल्या होत्या. समितीपुढे अनेक लोकांनी साक्षी दिल्या. त्यास हजारो निवेदने सादर करण्यात आली. सं. महाराष्ट्र समितीने तयार केलेले निवेदन त्या दृष्टीने अत्यंत अभ्यसनीय असे होते. भाषावार प्रांतरचनेचा पुरस्कार करणाऱ्या विचारवंतांचे मत असे होते की भारतीय संघराज्याच्या भवितव्यासाठी भाषेच्या आधारावर प्रांतरचना करण्यात यावी.

याबाबत नेहरूंची भूमिका अशी होती की जे जनसमूह शेकडो वर्षांपासून एकत्र राहात आले आहेत, तेथे त्यांनी त्यांचे सामाजिक, सांस्कृतिक जीवन विकसित केले आहे, त्यांच्या जीवनात भाषेसारख्या एखाद्या मुद्दयाच्या आधारावर एकदम मूलगामी असे परिवर्तन घडवून आणणे अयोग्य आहे. या परिवर्तनासाठी त्यांना आपण पुरेसा वेळ दिला पाहिजे.

राज्यपुनर्रचना आयोगाने आपला अहवाल दिल्यानंतर २१ डिसेंबर १९५५ रोजीच्या आपल्या लोकसभेतील भाषणात नेहरूंनी आपले यासंबंधीचे विचार व्यक्त केले. त्यांच्या या भाषणात खालील मुद्दे महत्वाचे होते-

१) लोकशाहीच्या विकासाचा विचार केला तर भाषेच्या आधारावर प्रांतरचना करणे चुकीचे नाही पण हे करीत असतांना व्यापक राष्ट्रीय हित व राष्ट्रीय ऐक्य यांच्याकडे पण दुर्लक्ष करून चालणार नाही. त्यामुळे राज्या-राज्यातील

अनुक्रमणिका

सीमावाद संयमाने हाताळले पाहिजेत.

२) भाषेचा विचार करतांना आपण ही गोष्ट लक्षात ठेवली पाहिजे की प्रत्येक प्रांतात भाषिक अल्पसंख्यांक असणार आहेत. प्रत्येक प्रांताच्या सीमेवर अशा समूहांची संख्या मोठी असणार आहे. या लोकांच्या भाषिक व सांस्कृतिक अधिकारांचे रक्षण करण्याची जबाबदारी बहुसंख्यांकांची आहे. भाषिक राज्ये ही बहुसंख्यांकांची आहेत. भाषिक राज्ये ही बहुसंख्यांकांची हुकुमशाही बनवणे चुकीचे आहे.

३) प्रत्येकाने आपल्या भाषेचा विकास करावा. शिक्षण प्रशासन व इतर सर्व मानवी व्यवहारात मातृभाषेचा उपयोग लाभदायक असतो. पण प्रत्येक प्रांतात काही द्वैभाषिक व त्रैभाषिक विभाग असणारे आहेत. त्याच प्रमाणे भारत हा एक देश असल्यामुळे कामधंद्यासाठी एका प्रांतातून दुसऱ्या प्रांतात लोकांचे स्थलांतर होणे स्वाभाविक आहे. त्यावेळी आपल्या प्रांताभोवती संरक्षक भिंत उभारुन व त्यात इतरांना प्रवेश न देण्याची भूमिका घेतली जाऊ शकते. या संकुचित प्रादेशिकवादाचा आपणांस धोका आहे.

४) राज्यांनी आपल्या प्रांतातील प्रमुख भाषेबरोबरच त्या राज्यात बोलल्या जाणाऱ्या इतर भाषिक लोकांच्या भाषांच्या विकासाला पण उत्तेजन दिले पाहिजे. त्यांची स्वतःची अशी भूमिका होती की एक भाषिक समाजात राहाण्यापेक्षा बहुभाषिक, कमीत कमी द्वैभाषिक समाजात राहाणे माणसाच्या सांस्कृतिक विकासास जास्त उपकारक ठरेल.

५) भाषिक व धार्मिक अल्पसंख्याकांच्या अधिकारांचे रक्षण करण्याची जबाबदारी ही बहुसंख्यांकांची आहे. बहुसंख्यांक हे बहुसंख्यांक असल्यामुळे त्यांना विशेष संरक्षणाची गरज नाही. त्यांचे ते स्थान कोणीही हिरावून घेणार नाही. जे समाज आपल्या अल्पसंख्यांक समाजांना उदारतेने व समंजसपणाच्या भावनेने वागवतात तेच समाज सुशिक्षित समजले जातात. आपल्या राज्यघटनेत त्याबाबत तरतुदी करण्यात आल्या आहेत. त्यांची व्यवस्थित अंमलबजावणी झाली पाहिजे.

६) राज्याराज्यांत संकुचित प्रांतवाद निर्माण होऊन शेजारच्या राज्याविरूद्ध विषारी प्रचार केला जाईल. त्यास सर्वांनी विरोध केला पाहिजे.

(६)

फाझल अली आयोगाने आपला अहवाल दिला. त्या अहवालाप्रमाणे मध्य प्रदेश, राजस्थान केरळ व कर्नाटक या राज्यांची कुठल्याही वादाशिवाय फेररचना झाली. आयोगाने पंजाबच्या बाबतीत निर्णय दिला नाही. आयोगाच्या खालील तीन सूचना वादग्रस्त ठरल्या.

१) हैद्राबाद हे स्वतंत्र राज्य ठेवावे. तेलंगणाच्या नऊ जिल्ह्यांचा त्यात समावेश व्हावा. मराठवाड्याचे ५ व कर्नाटकचे ३ जिल्हे मुंबई व म्हैसूर राज्यात समाविष्ट करावे. तेलंगणाचा आंध्रप्रदेशात समावेश करावयाचा की नाही हे १९६२ च्या निवडणुकीनंतर लोकमताचा विचार करून ठरवावे.

२) विदर्भाचे स्वतंत्र राज्य करावे.

३) मुंबई राज्यात मराठवाडा व सौराष्ट्र व कच्छ यांचा समावेश करुन महाराष्ट्र व गुजरात यांचे संयुक्त राज्य करावे. या राज्याची मुंबई ही राजधानी असेल.

आयोगाच्या या तिन्ही प्रस्तावांना मोठ्या प्रमाणात विरोध झाला. पहिल्या दोन प्रस्तावांच्या मागे काही कारणे होती पण तिसरा प्रस्ताव एक प्रकारचा समझोता होता. सरकारला हैद्राबाद राज्य स्वतंत्र ठेवता आले नाही. शेवटी त्याचा आंध्रात समावेश करावा लागला कारण त्यावेळी तेलंगणाचे नेते तेवढे आग्रही नव्हते. विदर्भातील एक मोठा गट सं. महाराष्ट्राच्या बाजूने आल्यानंतर तो प्रश्न पण निकालात निघाला. पण मुख्य प्रश्न मुंबई राज्याचा होता व तो चार पाच वर्षे पं. नेहरूंच्यासाठी मोठीच डोकेदुखी ठरला. कारण मुंबई हे भारतातील सर्वात महत्त्वाचे शहर. भारताची आर्थिक राजधानी. मुंबईचे गुजराती भाषिक व तेथील भांडवलदार यांचा मुंबई महाराष्ट्राला देण्यास टोकाचा विरोध होता कारण मराठी भाषिक राज्यकर्त्यांबद्दल त्यांच्या मनात अविश्वास होता. मुंबई महाराष्ट्रात गेली तर तिचे कॉस्मॉपॉलिटन स्वरूप कायम राहणार नाही आणि मुंबईच्या आर्थिक सुबत्तेचा फायदा एकट्या महाराष्ट्राला मिळेल असे त्यांचे म्हणणे होते. त्यावेळच्या महाराष्ट्रीय कॉंग्रेसच्या राजकीय नेत्यांबद्दल, त्यांच्या कार्यक्षमतेबद्दल नेहरूंच्या मनात अविश्वास होता. त्यामुळे मुंबईवरच्या महाराष्ट्राच्या दाव्यात जास्त तथ्य आहे ही गोष्ट मान्य असूनही त्याबाबतीत

तातडीने निर्णय घेण्यास ते तयार नव्हते.

मुंबईच्या भवितव्याबद्दल पं. नेहरूंनी या काळात तीन महत्त्वाचे प्रस्ताव तयार केले आणि ते मराठी नेत्यांपुढे ठेवले-

१) मुंबईला भारताची राजधानी करावी.

२) मुंबई, महाराष्ट्र व गुजरात यांची तीन स्वतंत्र राज्ये करावी. मुंबई हे शहर राज्य असेल.

३) मुंबई शहर हे काही वर्षांसाठी केंद्र शासित प्रदेश करावा व गुजरात व महाराष्ट्र ही दोन स्वतंत्र राज्ये करावी.

त्यातील पहिल्या प्रस्तावाची मोठ्या प्रमाणात चर्चा झाली नाही. कारण महाराष्ट्राच्या पुढाऱ्यांनाच तो मान्य नव्हता. दुसरा प्रस्ताव चर्चेसाठी आला त्या वेळी मुंबईच्या कामगारांनी प्रचंड संघर्ष केला. गोळीबारात अनेक लोक मारले गेले. त्यामुळे सरकारला माघार घ्यावी लागली. मुंबई केंद्रशासित प्रदेश करण्याची घोषणा केल्यानंतर त्यासही प्रचंड विरोध झाला. एकूण हिंसाचारात ८४ लोकांचा बळी गेला. संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीत एकूण १०५ लोकांना आपल्या प्राणांचे बलिदान करावे लागले.

मुंबई राज्याचे मुख्यमंत्री मोरारजी देसाई व गुजरातच्या नेत्यांना फाझल अली आयोगाने सुचविलेला मुंबई प्रांत हवा होता. ज्यामध्ये गुजरात व महाराष्ट्र यांत मुंबई शहर एक प्रकारे समतोल ठेवत होते. पण पं. नेहरूंना यातून मार्ग काढायचा होता. महाराष्ट्र काँग्रेसच्या नेत्यांना मुंबई आपल्या ताब्यातून जाईल अशी भीती वाटत होती. त्यामुळे ज्यावेळी लोकसभेत अशोक मेहता व इतरांनी महाद्वैभाषिकाचा प्रस्ताव आणला. त्या वेळी त्यांनी त्यास पाठिंबा दिला आणि मोरारजींना मान्य नसताना ४३ जिल्ह्यांच्या नव्या मुंबई राज्याची १ नोव्हें १९५६ रोजी स्थापना झाली. यशवंतराव चव्हाण हे या नव्या राज्याचे मुख्यमंत्री झाले.

मुंबई महाराष्ट्रास देणे न्यायाचे आहे याची पं. नेहरूंना जाणीव झाली होती पण त्यास असणारा निकराचा विरोध कसा कमी करायचा हा त्यांच्यापुढचा प्रश्न होता. १९५७ साली प. महाराष्ट्रात काँग्रेसचा पराभव झाला आणि १९६२ साली गुजरात व महाराष्ट्रात काँग्रेसचा मोठा पराभव होणार याची चिन्हे दिसू लागली. त्यावेळी स. का. पाटील यांच्यासारखे विरोधक पण याबाबत पुनर्विचार करावा असे म्हणू लागले. दिल्लीच्या राजकीय पुढाऱ्यांना याबाबत पुनर्विचार करण्यास श्री. यशवंतराव चव्हाण यांनी राजी केले. शेवटी १ मे १९६० रोजी महाराष्ट्र व गुजरात ही दोन राज्ये झाली व भारतीय संघराज्याची फेररचना पूर्ण झाली. पंजाबचा प्रश्न नेहरूंनी पुढे ढकलला कारण त्यामधून धर्मावर आधारलेला आक्रमक शीख जातीवाद पुढे येईल अशी भीती त्यांना वाटत होती.

(७)

भारतीय संघराज्याच्या रचनेची तीन महत्त्वाची वैशिष्ट्ये होती व ती खालील प्रमाणे-

१) भाषेच्या आधारावर तयार करण्यात आलेली घटकराज्ये हा संघराज्याचा आधार होता. एका भाषेची अनेक घटकराज्ये असतील पण ती मुख्यत्वे करून एक भाषिकच असतील.

२) ही घटकराज्ये मुळात बनलेली नसून ती संसदेची निर्मिती आहे, त्यामुळे राज्यांच्या स्वरूपात बदल करण्याचा, नवी घटक राज्ये निर्माण करण्याचा अधिकार संसदेस आहे.

३) घटक राज्ये व केंद्र यांच्यातील अधिकार विभागणी तीन सूचींच्या आधारे करण्यात आलेली आहे पण शेषाधिकार मात्र केंद्राकडेच ठेवण्यात आले. मधील काळात केंद्राचे अधिकार जास्त वाढलेले आपणास दिसतात.

भारतीय संघराज्यांच्या घटकराज्यांना अमेरिकी संघराज्याच्या घटकराज्यांसारखी स्वायतत्ता नाही कारण त्यांनी स्वतःची अशी पृथगात्म अस्मिता प्राप्त केलेली नाही असे तज्ज्ञांचे मत होते.

१९६० नंतर भारतीय संघराज्याची जडणघडण पूर्ण झाली. प्रश्न पंजाबचा होता व मास्टर तारासिंग व संत फतेहसिंह हे सातत्याने पंजाबी सुभ्याची मागणी करीत होते. त्यात नाव पंजाबी भाषेचे असले तरी उद्देश शीख धर्मियांच्या बहुसंख्येचे राज्य स्थापन करणे हा होता. नेहरूंनी त्यास दाद दिली नाही पण १९६६ साली इंदिरा गांधींनी पंजाबची मागणी मान्य केली. शिखांची

अनुक्रमणिका






शे. ६० टक्के लोकसंख्या असणारा पंजाबी सुभा मान्य करण्यात आला. त्याचबरोबर प. पंजाबच्या हिंदी भाषिक प्रदेशाचा हरियाना नावाचा नवा प्रांत निर्माण करण्यात आला. पंजाबच्या काही भूभागाचा समावेश करून हिमाचल प्रदेश हे नवे राज्य निर्माण करण्यात आले. संघराज्याच्या घटकराज्यांच्या निर्मितीची प्रक्रिया सुरूच राहिली. आता भाषेपेक्षा संस्कृतीवर व पृथगात्म अस्मितेवर भर होता. त्यातून अरुणाचल, नागालँड, मेघालय, मिझोराम, मणीपूर व त्रिपुरा ही छोटी राज्ये निर्माण झाली. नागालँडची निर्मिती करून या प्रक्रियेस नेहरूंनीच सुरुवात केली होती.

इ. स. २००० नंतर मोठ्या राज्यांचे (एकभाषिक) विभाजन करून छोटी राज्ये निर्माण करण्याची प्रक्रिया सुरू झाली व त्यातून उत्तराखंड, झारखंड आणि छत्तीसगड ही राज्ये तयार झाली. २०१४ मध्ये तेलंगाणा हे नवे राज्य निर्माण झाले. राज्याचा मागासपणा, जनतेची इच्छा व आदिवासी भागांची स्वयंशासनाची मागणी यातून ही निर्मिती झाली. आता विदर्भ राज्याची मागणी होत असतांना आपणास दिसते.

आज ६० वर्षानंतर नेहरूंच्या याबाबतच्या मतांची समीक्षा केली असतांना काय दिसते? नेहरूंच्या मनात भाषावर प्रांतरचनेतून निर्माण होणाऱ्या प्रवृत्ती बद्दल ज्या शंका निर्माण झाल्या होत्या त्या खऱ्या ठरलेल्या आपणास दिसतात. भाषिक व प्रादेशिक संकुचितता कर्नाटक, तमिळनाडू या राज्यात मोठ्या प्रमाणात वाढली. महाराष्ट्रात परप्रांतियांच्या विरूद्ध आक्रमक भूमिका घेणारे, हिंसाचार करणारे राजकीय पक्ष निर्माण झाले. परप्रांतियांच्या स्थलांतरास त्यांनी विरोध सुरू केला. ज्या आंध्रप्रदेशात भाषावार प्रांतरचनेची चळवळ सुरू झाली त्याच आंध्रात त्याच्या विघटनाची चळवळही सुरू झाली. २०१४ साली या प्रांताचे विभाजन झाले. यासंबंधात राज्य पुनर्रचना आयोगाने केलेली सूचना समंजसपणाची होती पण त्याकडे दुर्लक्ष झाले. वेगळ्या विदर्भाच्या चळवळीला अजून जनमताचा मोठा पाठिंबा नाही. तेथील हिंदी भाषिकांचा त्यास मोठा पाठिंबा असला तरी अजून मराठी भाषिकांचा त्यास तेवढा पाठिंबा नाही आणि मराठी भाषिकांचा पाठिंबा नसल्यामुळे तेथे मोठे आंदोलन उभे राहात नाही पण वेगळ्या राज्यामुळे आर्थिक स्वायतत्ता मिळते व केंद्राकडून मोठी आर्थिक मदत मिळते हे लक्षात आल्यानंतर परिस्थिती बदलू शकते. कारण तेलंगाणा झाल्यानंतर आता भाजपच्या कार्यक्रम पत्रिकेवर विदर्भाचाच क्रमांक आहे.

भारतीय संघराज्याची रचना भाषावार प्रांतरचनेच्या आधारे करण्यात पं. नेहरूंची महत्त्वाची भूमिका होती. भाषेचे तत्त्व प्रमाण मानत असतांना इतर गोष्टीही महत्त्वाच्या आहेत. याची त्यांना जाण होती आणि त्याबाबतची आपली मते त्यांनी त्या काळात मांडली होती. लहान राज्यांचा पुरस्कार करून प्रादेशिक अस्मितेवर आधारलेल्या घटकराज्यांचे महत्त्व कमी करण्याचा प्रयत्न नजिकच्या काळात होण्याची शक्यता नाकारता येत नाही, पण या प्रश्नामागे असणारी गुंतागुंत त्यांच्यासारख्या खोल इतिहास दृष्टी असणाऱ्या माणसाच्या लक्षात आली होती ही गोष्ट आपणास नाकारता येणार नाही. पण त्यातही भाषावार प्रांतरचना करण्याची अपरिहार्यता त्यांच्या लक्षात आल्यानंतर त्यांच्याकडून काही ठाम निर्णय घेण्याची अपेक्षा होती. पण त्यांनी तसे निर्णय घेतले नाहीत. त्यांनी तयार केलेली संघराज्याची चौकट बऱ्याच प्रमाणात कायम आहे पण पुढील काळ त्यासाठी कसोटीचा ठरू शकतो.



## लेखकांचा परिचय

**डॉ. प. रा. दुभाषी**

उच्च पदाला पोचलेले सेवानिवृत्त सनदी अधिकारी. गोवा विद्यापीठाचे माजी कुलगुरू. भारतीय विद्याभवनाच्या पुणे केंद्राचे अध्यक्ष. पी. एच. डी. व डी. लिट पदव्यांनी विभूषित.

***पत्ता :—*** 'पद्मसिंधू', फ्लॅट नं २६, ५ वा रस्ता सहवास सोसायटी, पुणे ४११ ०४९. फोन नं. (०२०)२५४४०२७२

**श्री. आनंद हर्डीकर**

स्वातंत्र्य-लढ्याच्या इतिहासाचे अभ्यासक असून त्यांनी अनेक पुस्तके लिहिली आहेत.

**पत्ता:-** अ-६, सागर अपार्टमेंट, अखिल श्रीमान परिसर, कर्वेनगर, पुणे ४११ ०५२. फोन नं (०२०)२५४२१६६८ भ्रमणध्वनी : ९१५८६३४२१३

**प्रा. डॉ. अशोक कृष्णाजी जोशी**

इंग्रजी या विषयाचे प्राध्यापक (निवृत्त.) गोवा विद्यापीठ. सौंदर्यशास्त्र, समीक्षा, तत्त्वज्ञान या विषयांचे अभ्यासक.

**पत्ता:-** बी १ व्यंकटेश रिव्हिएरा, शाहू कॉलनी, गल्ली नं.२, कर्वेनगर, पुणे ४११ ०५२ भ्रमणध्वनी : ९४२२०६४९७५.

**प्रा. श्री. मा. भावे**

माजी प्रपाठक व विभागप्रमुख, गणित विभाग, नौरोजी वाडिया कॉलेज, पुणे; गणित व तत्त्वज्ञान या विषयांत पीएच. डी. व पदव्युत्तर संशोधन; शिक्षकचळवळीत सहभाग; शिक्षण, गणित व तत्त्वज्ञान या विषयांवर २५ शोधनिबंध.

***पत्ता :—*** ३३/२०, ४ थी गल्ली, प्रभात रोड, पुणे – ४११००४. दूरध्वनी :– (०२०) २५६७४०९३.

**डॉ. किशोर महाबळ**

राज्यशास्त्र व प्रशासकीय व्यवस्था या विषयांचे गाढे अभ्यासक.

***पत्ता :—*** प्राध्यापक, राज्यशास्त्र विभाग, रा. तु. म. नागपूर विद्यापीठ, नागपूर. भ्रमणध्वनी : ९८२२७०३०१९.

**श्री. माधव गोडबोले**

उच्चपदस्थ सनदी अधिकारी होते. ते १९९२ मध्ये केंद्रशासनाचे गृहीसचिव व न्याय सचिव या पदावरून निवृत्त झाले. त्यांची मराठी व इंग्रजी मिळून १६ पुस्तके प्रसिद्ध झाली आहेत. त्यांच्या अनेक पुस्तकांना विविध पुरस्कार मिळाले आहेत.

***पत्ता :—*** 'सांगाती', ७३-२-२, भक्तिमार्ग, एरंडवन, पुणे - ४११ ००४. दूरध्वनी : (०२०) २५४६५१८२

**श्री. विश्वास दांडेकर**

संरक्षण या विषयाचे अभ्यासक आहेत.

**पत्ता:-** 'मालवती', १७, कांगा कॉलनी, सातारा - ४१५ ००२ दूरध्वनी (०२१६२) २३५२५४.

**श्री. माधव दातार**

**पत्ता:-** एफ/५३, मेकर कुंदन गार्डन, जुहू रस्ता, सांताक्रूज (पश्चिम) मुंबई -४०० ०४९. भ्रमणध्वनी : ९८२१३३४४४१

**प्रा. डॉ. अशोक चौसाळकर**

राजकीय उपपत्ती व राजकीय चळवळी या दोन्हीचेही मर्मज्ञ अभ्यासक.

**पत्ता:-** ४१६, आर. के. नगर हौसिंग सोसायटी क्र. ६ पाचगांव - कोल्हापूर ४१६०१३. दूरध्वनी : (०२३१) २६३९४८५.

## आवाहन

'नवभारत' हे वैचारिक मासिक सुरू होऊन आता ६६ वर्षे झाली. साहजिकच मासिकाच्या मूळ कर्त्यांनी जे उद्देश डोळ्यांपुढे ठेवले होते, ते उद्देश स्वीकारून लिहिणारे लेखक व त्या उद्देशांविषयी आस्था बाळगणारे वाचक आता कमी होत चालले आहेत. तरीदेखील वैचारिक आदानप्रदानाचे समर्थ व्यासपीठ म्हणूनच 'नवभारता' ने कार्य करीत राहावे, असाच आमचा संकल्प आहे.

भारतीय परंपरेची ओळख व परिष्करण करून देणारे लेख येतच राहतील. परंतु, विज्ञान, अर्थकारण, तत्त्वज्ञानातील आधुनिक विचारप्रवाह, इतिहासलेखनाला आलेले नवे रूप इत्यादी विषयांची भाष्यरूपाने ओळख करून देणे, नवीन ग्रंथांची समीक्षा करणे, लोकसाहित्य, दलित वाङ्मय यांना जी काळानुरूप वळणे मिळत आहेत त्यांचा मागोवा ठेवणे या विषयांवर भर देणे अगत्याचे झाले आहे. लघुकथा, ललित लेख व कविता या 'नवभारता'ने पूर्वीही कक्षेबाहेर ठेवल्या नव्हत्या व आताही त्या कक्षेबाहेर ठेवलेल्या नाहीत.

आज तालुक्याच्या ठिकाणी महाविद्यालये निघाली आहेत. येथील शिक्षण मराठी भाषेतून चालते व ते योग्यच आहे. तथापि, इंग्रजी वा अन्य भारतीय भाषांतील विचारप्रवाहांशी या शिक्षणाचा संबंध राहू नये, ही खेदाची गोष्ट आहे. या महाविद्यालयांतील ग्रंथालयात अद्ययावत पुस्तके येत नाहीत व आली तरी ती वाचून सकस चर्चा करतील, असे अभ्यासूंचे गटही सहसा असत नाहीत. आमचे अनेक विद्यार्थी या महाविद्यालयांतून प्राध्यापक व प्राचार्य आहेत. त्यांनी ही व्यथा आमच्यापाशी बोलून दाखविली व असेही सांगितले की, 'नवभारता'तील काही लेखांच्या छायांकित प्रती काढून त्यांनी विद्यार्थ्यांना आवर्जून वाटल्या.

आमची अशी खात्री आहे की, महाविद्यालये, तेथील प्राध्यापक व विद्यार्थी तसेच गावोगावी विखुरलेले अभ्यासू नागरिक यांना 'नवभारत' वाचण्याची व त्यातील लेखांवर चर्चा करण्याची सवय लागून जाईल. या सर्वांनी आपले दर्जेदार लेख 'नवभारत' कडे अवश्य पाठवावेत.

यासाठी 'नवभारता'चा प्रसार झाला पाहिजे. आमची वाचकांना अशी विनंती आहे की, त्यांनी 'नवभारता'ला वर्गणीदार मिळवून देण्याची मोहीम चालवावी. जो वाचक पाच वर्गणीदार मिळवून देईल, त्याने सहाव्या व्यक्तीचे नाव व पत्ता कळवावा. त्या सहाव्या व्यक्तीला 'नवभारता' चे अंक वर्षभर आमच्याकडून विनाशुल्क पाठवले जातील. वर्गणीदार कोणत्याही महिन्यापासून होता येते.

वर्षाची वर्गणी रु. ३००/- असून वर्गणी, चेक/डी.डी./मनिऑर्डर यांच्याद्वारे 'नवभारता'च्या पत्त्यावर पाठवावी. चेक/डी.डी. 'नवभारत' मासिक, या नावाने ३१५, गंगापुरी, वाई ४१२८०३ या पत्त्यावर पाठवावे.

– संपादक मंडळ

## लेखकांस आवाहन

*'नवभारत' मासिकामध्ये दर्जेदार वैचारिक लेखनाचे आम्ही नेहमीच स्वागत करतो. पण 'नवभारता' कडे आपले लेखन पाठविण्यापूर्वी काही काळजी घ्यावी, अशी विनंती आहे.*

*१. आपले लेखन सुवाच्य अक्षरात कागदाच्या एकाच बाजूस असावे.*

*२. आपण लेखनासाठी जे संदर्भ वापरले असतील, ते लेखाच्या शेवटी काही टीपा असल्यास त्यांसह द्यावेत.*

*३. महत्त्वाचे म्हणजे आपण आपला लेख यापूर्वी कुठल्याही नियतकालिकात प्रसिद्धीसाठी पाठविलेला नाही, याची स्पष्ट कल्पना 'नवभारत' च्या संपादकांना द्यावी.*

*४. 'नवभारत' मध्ये लेख छापण्यापूर्वी तो संपादक मंडळाच्या योग्य त्या सदस्याकडे वाचनासाठी व अभिप्रायासाठी पाठविला जातो. त्यामुळे तो लेख कुठल्या महिन्यात 'नवभारत' मध्ये येईल किंवा येणार नाही, हे यथावकाश कळविले जाईल, याची लेखकांनी कृपया नोंद घ्यावी.*

*आपल्या सहकार्याबद्दल संपादक मंडळ आपले आभारी आहे.*

*- संपादक मंडळ*

आपल्या ग्रंथालयात अवश्य हवीत अशी

## प्राज्ञपाठशाळा मंडळ ग्रंथमालेची

### संग्राह्य वैचारिक मराठी प्रकाशने

| | सुधारित किंमत २० नोव्हेंबर २००६ पासून लागू |
|---|---|
| वैदिक संस्कृतीचा विकास (तिसरी आवृत्ती) । तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी | ३०० रु |
| अद्वैतसिद्धीचे मराठी भाषांतर (पूर्वार्ध) । ब्र. स्वामी केवलानंद सरस्वती | २०० रु |
| पुरोहितवर्गवर्चस्व व भारताचा सामाजिक इतिहास । डॉ. सुमंत मुरंजन | १२० रु |
| हिंदी साहित्यविचार । प्रा. प्यारेलाल गोहेल | २५ रु |
| श्री. यशवंतराव चव्हाण अभिनंदन ग्रंथ | ६० रु |
| संशोधन साधना । डॉ. वसंत स. जोशी | ६० रु |
| आर्यांच्या सणांचा प्राचीन व अर्वाचीन इतिहास । ऋग्वेदी | १५० रु |
| वागीश्वरी । डॉ. गो. के. भट | ६० रु |
| प्रस्थानभेद (प्राचीन १४ विद्यांची माहिती) पुनर्मुद्रण । गं. वा. लेले | ५० रु |
| गिर्यारोहण परिचय । अच्युत खोडवे | ४० रु |
| इतिहासाचे तत्त्वज्ञान (दुसरी आवृत्ती) । सदाशिव आठवले | १३० रु |
| शाहीर हैबती । डॉ. शिवाजीराव चव्हाण | ४० रु |
| गीताचिकित्सा । भाऊ धर्माधिकारी | १४० रु |
| तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी (चरित्र) । सौ. मालती देशपांडे | २५ रु |
| बौद्ध धर्माचा अभ्युदय आणि प्रसार । प. ल. वैद्य | ५० रु |
| हिंदू धार्मिक परंपरा आणि सामाजिक परिवर्तन (संवर्धित दुसरी आवृत्ती) । मे. पुं. रेगे | १६० रु |
| पाच पुस्तक-परीक्षणे । वा. म. कुलकर्णी | ६० रु |
| भेदविलोपन : एक आकलन । अशोक केळकर | ३० रु |
| कॉलिंगवुडची कलामीमांसा - एक भाष्य । रा. भा. पाटणकर | १०० रु |
| धर्मश्रद्धा : एक पुनर्विचार । दि. के. बेडेकर | ३० रु |
| आचार्य शं. द. जावडेकर : व्यक्तित्त्व आणि विचार | १०० रु |
| तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, कार्य आणि विचार | १५० रु |
| इहवाद आणि सर्वधर्मसमभाव । मे. पुं. रेगे | १२० रु |
| प्राज्ञपाठशाळा आणि तिची परंपरा | २०० रु |
| चार्वाक : इतिहास आणि तत्त्वज्ञान (तृतीयावृत्ती) । सदाशिव आठवले | १०० रु |
| विनोबांची संस्कृत साम्यसूत्रे (रसग्रहणात्मक मराठी अनुवाद) । वसंत नारगोलकर | १२० रु |
| नागरी समाज, राज्यसंस्था आणि लोकतंत्र : भारतीय संदर्भात विवेचन । द. ना. धनागरे | ४० रु |
| प्राचीन भारत : समाज आणि संस्कृती (निवडक मौलिक लेखांचा संग्रह) । डॉ. म. अ. मेहेंदळे | ५५० रु |
| हिंदुधर्माची समीक्षा आणि सर्वधर्मसमीक्षा (दुसरी आवृत्ती) : तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी | २२५ रु |
| पाश्चात्य नीतिशास्त्राचा इतिहास (दुसरी आवृत्ती) : प्रा. मे. पुं. रेगे | १६० रु |
| साहित्याचे तर्कशास्त्र संपादक : सीताराम रायकर, द. दि. पुंडे, पंडित टापरे. | ७५० रु |

१) ग्रंथालये व संस्थांना किंमतीत १० टक्के सूट. पोस्टेजचा खर्च वेगळा पडेल. २) व्ही. पी. ची पद्धत नाही.
३) पैसे मनिऑर्डरने वा ड्राफ्टने पाठवावेत.

*संपर्कासाठी पत्ता* : चिटणीस, प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५ गंगापुरी, वाई ४१२८०३(जि.सातारा)फोन:(०२१६७)२२०००६

हे मासिक प्रा. यशवंत कळमकर यांनी के'सागर ग्राफिक्स ॲण्ड प्रिंटर्स, गणपती आळी, वाई, पिन : ४१२८०३ येथे छापून सरोजा भाटे यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.

अनुक्रमणिका






